गुणलुब्धाः स्वयमेव संपदः।

## महाराष्ट्र-कुटुंब-माला

पुष्प २८ वें

# रक्त

(सरस्वतीकुमार यांच्या गोष्टींचा संग्रह, भाग २ रा)

लेखक

श्री. सरस्वतीकुमार

आवृत्ति पहिली

मार्च १९३९

किंमत एक रुपाया

# महाराष्ट्र-कुटुंब-माला

पुष्प २८ वें

# रक्त

(सरस्वती कुमार यांच्या गोष्टींचा संग्रह, भाग २ रा.)


लेखक—सरस्वतीकुमार

प्रस्तावना-लेखक—शंकर कृष्ण देवभक्त

संपादक—नारायण विनायक कुलकर्णी



प्रकाशक—विठ्ठल रामचंद्र खाडिलकर

मुद्रक—

कृ. ह. सहस्रबुद्धे, श्री ज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.

कव्हर डिझाइनचें कल्पक—

राजाराम दत्तात्रेय देवधर, कोल्हापूर.

मुंबईचे प्रमुख एजंट—

मेसर्स परचुरे, पुराणिक आणि मंडळी

प्रमुख प्रचारक—

विश्वनाथ बाळाजी मोडक, कोल्हापूर-शाहूपुरी,

प्रकाशन-स्थल—

महाराष्ट्र-कुटुंब-माला कचेरी, ३९२, नारायण पेठ, पुणें.

## मालेची वर्ष अखेर— ‘रक्ता’ची निशाणी!

मालेचें ७ वें वर्ष आज संपलें. आरंभीं कठोर परिस्थितीनें ‘माले’च्या हृदयाचा चेंदामेंदा केला, तेव्हांच ‘ **कुस्करलेलें हृदय** ’ या पुस्तकाचा जन्म झाला!–पण त्या वेदनांनीं हाल न थांबतां दुष्ट परिस्थिति ‘ मालेला ’ खग्रास ग्रहण लावणार, असेंच वाटायला लावलें. त्यांतून शर्थीनें सुटका करून घेतली, तेव्हांच “ **ग्रहणापूर्वी सुटका** ” मालेला वाचकांच्या हातीं देतां आली. अशी ‘सुटका’ झाली असें वाटलें खरें तरी त्याकरितां झगडतांना जे श्रम झाले, त्या श्रमातिरेकानें ‘माले’च्या पोटांत आर्थिक आवश्यकतेची कोण भूक पेटली! भुकेकरितां इतकी धडपड करावी लागली कीं, परिस्थितीच्या काटेरी कुंपणांतून आणि खड्या-धोंड्यातून वणवण करीत हिंडतांना पायांचीं बोटें फुटलीं भोंवळ येऊन खडक–कपाऱ्यावर पडल्यानें शरीर रक्तबंबाळ झालें; तेव्हां ‘ **भूक** ’ वाचकांना सादर झाली.

आणि नेमकें याच वेळीं, मालेच्या चालू परिस्थितीचें चिरस्मारक व्हावें म्हणूनच कीं काय, महाराष्ट्रांतले प्रख्यात लेखक, नाटककार व कै. राम गणेश गडकरी यांचे सच्चे चेले श्री. **सरस्वतीकुमार** यांनीं ‘ मालें’त प्रसिद्ध करावयास दिलेल्या आपल्या प्रस्तुत कथासंग्रहाला “रक्त–” असेंच कसें ठळक व अचूक नाव दिलें! विलक्षण योगायोग!

श्री. सरस्वतीकुमार यांच्या कवितांचा, कादंबऱ्यांचा, नाटकांचा आणि कथावाङ्मयांचा महाराष्ट्रांत फार मोठा चाहता आणि भोक्ता वर्ग आहे; त्याला सदर कथासंग्रह कायम ग्रंथरूपांत ‘ माले’नें ग्रथित केल्यानें खास आनंद होईल.

रक्त पाहून मूर्च्छना न येणारा तसाच निढावलेला असला पाहिजे. तोच धीरानें जखम्याची जखम पुढें सरसावून बरी करूं शकेल!

परिस्थितीनें केलेली अशी रक्तबंबाळ अवस्था 'माले'नें अनेक महाभागांच्या निदर्शनास अनेकवेळां आणली. 'माले'ची जखम धनिक दात्यांनीं पाहिली. कित्येकांना चक्कर आली. कित्येक दूर पळाले. कितीक जखम बांधण्याचें आश्वासन देऊन दिलेलें आश्वासनच विसरलें.

धनिकांनीं पगड्या फिरविल्या. या बोटावरची थुंकी त्या बोटावर नेली. कित्येकांनीं अनेक खेटे घालण्याची गमतीनें शिक्षा देऊन 'कशी गंमत केली,' असें म्हटलें व जीवाची करमणूक करून घेतली, हें कितीही खरें असलें तरी 'माले'ला अजून आपल्या जीविताबद्दल दांडगा विश्वास आहे. जनताजनार्दन अत्यंत सावकाशपणें 'माले'कडे सहानुभूतीनें, प्रेमानें पहात आहे.

७ व्या वर्षांत **दोनच महाभागांनीं** कां होईना, 'माले'कडे अनाहूत पत्रें पाठवून कायम ग्राहकांच्या यादींत नाव घालण्याविषयीं कळविलें आहे. हा एवढाच सकृद्दर्शनीं दिसायला अत्यल्पसा, पण परिणामीं भरभक्कम किल्ल्याचा पायाच होणारा आधार—मालेचें ८ वें वर्ष धडाडीनें सुरू कराच, असें आम्हांला सांगत नाहीं काय ?—

सर्वांचा नम्र
**वि. रा. खाडिलकर**
प्रकाशक,
महाराष्ट्र-कुटुंब-माला, पुणें.

**महाराष्ट्र-कुटुंब-माला**
३९२, नारायण, पुणें २

# सप्रेम

प्रो. **सत्यबोध बालकृष्ण हुदलीकर** एम्. ए.

सादर सप्रेम सा. न. वि. वि.

प्रिय मामासाहेब,

पस्तीस एक वर्षे होऊन गेलीं त्या गोष्टीला; आपण मला पुण्या-
मराठी भाषांतराचें एक पुस्तक होतें. कितीदां तरी तीं पुस्तकें मी वाचून
फार जुनी आहे. वाङ्मयांतील कथा-विभागाकडे माझें लक्ष वेधून, त्याची

नंतरही वेळोवेळीं माझे आपण वाङ्मय-वाचनाचे मार्गदर्शक
जर्मन-फ्रेंच यांसारख्या भाषांतील कथा अथवा त्यांतील इतर वाङ्मयां-
किंवा चर्चिली नाहींत, असें क्वचितच घडतें.

माझ्या लिखाणाचेंही आपण अव्वलपासून आतांपर्यंत कौतुकच
वजनच अधिक असतें, हें मी जाणून आहें. त्याचबरोबर हें मी
नसतें, तर लेखनाची हौस मजमध्यें उत्पन्नच झाली नसती—झालीच असती
असती, सुकली असती, वाळूनही गेली असती !

आपल्या नजरेखालीं तयार झालेल्या माझ्या छोट्याशा वाङ्मय—
नम्रपणानें मी आपल्यापुढें उभा आहें. या फुलांची किंमत तितकीशी
णार नाहीं, असला तर थोडासाच असणारा त्यांचा गंध आपल्याला
असूनही हीं फुलें घेऊन मी आपल्याकडे आलों आहें. कारण, माझ्या
उत्साहवर्धक प्रोत्साहनासाठीं मी उत्सुक आहें; आणि माझी जवळ जवळ
वाटलीं तरी तीं माझीं आहेत, म्हणूनच आपण त्यांचा प्रेमभरानें स्वीकारच
आहे कीं, आजवर माझे अनेक, नाहीं नाहीं ते हट्ट आपण पुरविले

सांगली

४ मार्च १९३९.

# समर्पण

मु. मुंबई यांसी—

हून कांहीं गोष्टींचीं पुस्तकें पाठविलीं होतीं; त्यांत इसापच्या गोष्टींच्या काढलीं. लहानांमध्यें वाचनाची गोडी उत्पन्न करण्याची आपली हातोटी मला आपणच प्रथम गोडी लावली.

झालं. अजूनही आपली व माझी भेट झाली आणि मला न समजणाऱ्या तील कथानकें आपण वाचून दाखविलीं नाहींत, अथवा सांगितलीं नाहींत,

केलें आहे. त्यांत टीकाकाराचा धारवाडी तोल नसून अमर्याद वात्सल्याचें जाणून आहें कीं, जर आपणाकडून वेळोवेळीं उत्तेजन मिळत गेलें अन्य कारणांनीं, तर ती आपल्या प्रोत्साहनाच्या अभावीं केव्हाच खुरटली

वाटिकेंतील हीं चार फुलें अंजलींत घेऊन, अर्पण करण्याच्या उद्देशानें पण नाहीं हें मी जाणतों; त्यांचें रंगरूपही तितकेंसें आकर्षक आपल्याला वाटसुखद होणारही नाहीं, या गोष्टीही मी ओळखून आहें; आणि असें कृतज्ञतेनें मला उद्युक्त केलें आहे; बरेच दिवसांत न मिळालेल्या आपल्या खात्री आहे कीं, माझीं हीं वाक्पुष्पें आपल्याला कितीही ‘ निर्गुणी ’ कराल. म्हणून मामासाहेब—काय म्हणूं ?—म्हणतोंच—माझा हट्टच आहेत; आणि या हट्टालाच आपण नकार कसा द्याल ? तें शक्यच नाहीं.

आपला नम्र
भगिनेय,
**सरस्वतीकुमार.**

# प्रसाद

अर्थात्

## ग्रहणापूर्वी सुटका भाग २रा

म
हा
रा
ष्ट्र
कु
टुं
ब
मा
ला
पु
ष्प
२९
वें



# प्रास्ताविक

प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें मिरजेस माझा मुक्काम असतांना माझे मित्र श्री. नरहर गणेश कमतनूरकर ऊर्फ "सरस्वतिकुमार" यांनीं त्यांच्या या कथासंग्रहाला मी प्रस्तावना लिहावी अशी इच्छा प्रदर्शित केली.

"सिंहस्थ आणि इतर गोष्टी" या त्यांच्या पहिल्या कथासंग्रहाशीं प्रकाशक या नात्यानें आलेल्या संबंधांचें पुनरुज्जीवन प्रस्तुत कथासंग्रहाचे वेळीं प्रस्तावनाकार या नात्यानें होत आहे हा एक अकल्पित योगायोगच.

तसा विचार केला तर कोणाही प्रस्तावनाकाराच्या मध्यस्थीनें वाङ्मयाप्रांतांत परिचय करून घेण्याची श्री. कमतनूरकर यांना मुळींच जरूर नाहीं. एकाद्या प्रथितयश लेखकाच्या प्रस्तावनेचा परवल दाखवून साहित्यप्रांतांत मुशाफरी करण्याचा जुना शिरस्ता सोडून स्वतःच्या धारदार लेखणीची चमक दाखवूनच आत्मविश्वासानें पुढें सरसावलेले असे ते एक बहादूर शिलेदार आहेत.

सुमारें पंचवीस–तीस वर्षांपूर्वीं महाराष्ट्रांत असा एक काळ होता कीं, त्या वेळीं अत्यंत उर्जितावस्थेंत असलेल्या मित्रांच्या मासिक मनोरंजनांत स्वतःचा लेख छापून यावा अशी प्रत्येक नवोदित लेख-

काची एक अंतस्थ महत्वाकांक्षा असे. मित्रांनीं सुरू केलेल्या वाङ्मय-यज्ञांत नामवंत ऋत्विजांबरोबर सहभोजनाचा मान मिळवण्याच्या ईर्षेनें, महाद्वारांतून प्रवेश मिळण्याची आशा नसलेल्या कित्येक वाग्भटांनीं आपल्या सोंवळ्या–भांड्यांचीं गांठोडीं गवाक्षांतून टाकून पाहिलीं होतीं. परंतु साभार परतीच्या सांत्वनाचा शिक्का बसून गेल्या वाटेनेंच तीं परत आल्यामुळें वेदांच्या मंगल घोषांऐवजीं नैराश्यगीताचीं कडवीं आळव-ण्याचेंच त्यांच्यापैकीं पुष्कळांच्या नशिबीं येत असे.

त्यावेळीं श्री. कमतनूरकर हे फर्ग्युसन कॉलेजमध्यें पहिल्या वर्षांत विद्यार्थी होते. कॉलेजच्या त्रैमासिकांत "घड्याळ" "जाहिरात" आणि "संम्याचें पत्र" हे त्यांचे लेख प्रसिद्ध होतांच त्यांच्या लेखणीची चमक केवळ तत्कालीन विद्यार्थ्यांच्याच नव्हे तर कॉलेजा-बाहेरील सर्वसाधारण वाचकांच्याही नजरेंत भरली. या गोष्टीचें प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे मनोरंजनाच्या महाद्वारांतून मित्रांनीं त्यांना सन्मानपूर्वक आंत नेऊन त्यांच्या गौरवाबरोबर स्वतःची गुणग्राहकताही व्यक्त करून दाखविली.

क. राम गणेश गडकरी यांच्यासारख्या वैभवशाली वाङ्मय–सम्राटाचा वरद हस्त आणि मित्रांच्यासारख्या गुणग्राही मित्राचा आपुल-कीचा हात अशा थाटांतच त्यावेळीं श्री. कमतनूरकरांचें साहित्यप्रांतांत पदार्पण झालें होतें. धारदार लेखनायुधाबरोबर ओजस्वी वक्तृत्वाचें अमोघ अस्त्रही त्यांच्या भात्यांत असल्यामुळें त्यांची त्यावेळीं चांगलीच छाप पडली होती. ललितकलेसारख्या अव्वल दर्जांत जमा होणाऱ्या नामवंत नाटक मंडळीनें स्वतःच्या रंगभूमीवर त्यांचीं नाटकें आणून त्यांच्या गुणांचा यथायोग्य गौरव केला होता.

वर्षानुवर्षे लेखण्या झिजवूनही यशानें तोंड उजळून निघण्या-ऐवजीं शाईनेंच बोटें काळीं झालेल्या लेखकांची संख्या प्रायः जास्त दिसून येते. परंतु या सामान्य नियमाचा अपवाद म्हणून श्री. कमत-नूरकर यांच्याकडे बोट दाखवावें लागेल.

"वाग्वैजयंति" व "नाटककार देवल" या पुस्तकांना त्यांनीं लिहिलेल्या प्रबंधवजा प्रस्तावनांवरून त्यांच्या समीक्षण बुद्धीची तीव्रता चांगलीच प्रत्ययास येते.

कवि, कथालेखक, नाटककार आणि टीकाकार अशा तऱ्हेचा चतुरस्र समन्वय त्यांच्या ठिकाणीं असूनहि चालू जमान्यांत रूढ असलेल्या "साहित्यिक" या शब्दाच्या व्याख्येच्या चौकटींत बसण्यासारखे साहित्यिक ते नाहींत ही गोष्टदेखील तितकीच सत्य आहे. याचें कारण साहित्यप्रांतांत प्रचलित झालेले कांहीं आधुनिक पद्धतीचे शिष्टसांप्रदाय पाळण्याची त्यांची तयारी नसावी हेंच होय. कृतीचीं आयाळें जडवून आणि गळा पुष्ट करून दुसऱ्यांवर गुरगुरण्याची किंवा तिन्ही त्रिकाळ स्वतःचीं स्तुतिस्तोत्रें मुक्तकंठानें गाऊन दुसऱ्यांवर छाप बसवण्याची कला त्यांनीं बदलत्या परिस्थितीबरोबर हस्तगत करून घेतली असती तर अलिकडे प्रत्यहीं चालू असलेल्या साहित्यिकांच्या झुणकाभाकर सहभोजनांत त्यांनीं केव्हांच मानाचें पान पटकावलें असतें.

परस्परं प्रशंसन्तौ या नाण्याच्या देवघेवीवरच सरसहा व्यवहार चालणाऱ्या साहित्यिकांच्या पेठेंत 'ब्रूते न चाटु मृषा' या वृत्तीचा अंगिकार करून वागणाऱ्या सडेतोड लेखकाची कुणी विचारपूस न केल्यास त्यांत विषाद मानण्याचें कांहींच कारण नाहीं.

गडकऱ्यांच्या पश्चात् गडकऱ्यांच्या गादीवर वारसाहक्क सांगणारे अनेक कल्याणस्वामी आणि उद्धवगोसावी तावातावानें पुढें सरसावले. या स्वयंभु शिष्यवरांपैकीं कांहींजणांनीं स्वतंत्र मठस्थापना करून आपल्या मानीव गुरूंची गादी चालवण्याचा आवही अंगांत आणून पाहिला. परंतु अनुप्रासांच्या बाराखड्या गिरवण्यापलिकडे किंवा गडकऱ्यांनीं केलेल्या हलव्यावर स्वतःच्या शहाणपणाचा पाक चढवून त्या हलव्याच्या दाण्याचे खडबडीत साखरफुटाणे करून दाखवण्यापलिकडे या शिष्यबुवांच्या हातून कोणतीच भरीव कामगिरी पार पडली नाहीं असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें.

तसें पाहिलें तर त्या वेळच्या नवोदित लेखकांपैकीं गडकऱ्यांच्या सहवासाचा भरपूर लाभ श्री. कमतनूरकरांना मिळाला असूनही पंजे नाचवून हैदोस धुल्ला घालण्याचा अचरटपणा त्यांनीं कधींच केला नाहीं. याच्या उलट गडकऱ्यांशीं बादरायण संबंध जोडून केवळ स्वतःचा मोठेपणा मिरवण्याच्या हेतूनेंच त्यांच्यासंबंधींच्या थोड्याशा ऐकीव आणि बऱ्याचशा काल्पनिक अशा आठवणींचीं पिकें स्वतःच्या सुपीक मेंदूतून काढून त्यांच्या स्वयंभु शिष्यांनीं वेळोवेळ आजपर्यंत पुष्कळांना झुलवलें आहे. असो.

प्रस्तुत कथासंग्रहांत एकंदर सात कथांचा समावेश करण्यांत आला आहे. अलिकडच्या काळांत महत्वाचें स्थान पटकावून बसलेल्या लघुकथेच्या तंत्रमापनानें मोजून पाहतां या संग्रहांतील एकही गोष्ट लघुकथेच्या सदराखालीं येणार नाहीं ही गोष्ट खरी असली तरी मनोरंजकतेच्या दृष्टीनें सर्वच गोष्टी सरस आहेत असें म्हटल्यासही अतिशयोक्ति होणार नाहीं. परंतु केवळ मनोरंजन हें एकच ध्येय

लेखकानें पुढें ठेवलेलें दिसत नाहीं. समाजांत वेळोवेळीं दिसून येणाऱ्या विकृत मनोविचारांच्या व्यक्तींचीं यथायोग्य स्वभावचित्रें रेखाटून लेखकानें स्वतःचे विचार मोठ्या मार्मिकतेनें वाचकांपुढें वेळोवेळीं मांडून दाखवले आहेत. हे विचार मांडत असतां विनोद आणि व्याजोक्ति या हुकमी अमोघ आयुधांचा लेखकानें वारंवार उपयोग केलेला आढळून येतो. क्वचित्प्रसंगीं, डोईजड चक्री पागोटें डोक्यावर चढवून लेखणी चालवण्याचा अट्टाहास बाळगल्यामुळें भाषेला पूर्वकालीन बोजडपणा प्राप्त झाला आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. तरी पण लेखकानें निर्माण केलेल्या या कथासृष्टींत प्रवास करीत असतां कल्पनावैभवाचीं कारंजीं, वर्णनकौशल्याच्या पुष्करणी, उपमाउत्प्रेक्षालंकाराच्या फुलवेली इत्यादि नयनमनोहर दृश्यें वाचकांच्या जागोजाग दृष्टोत्पत्तीस येतील याबद्दल शंकाच वाटत नाहीं. चिकित्सक दृष्टीनें पाहिलें असतां या संग्रहांतील प्रत्येक गोष्टीची उभारणी कोणत्या ना कोणत्या तरी तत्त्वाच्या आधारावर केली आहे असें आढळून येतें. " बुद्धीला ज्ञानाचे संस्कार झाले नसतांही हृदयाला भारून टाकील तीच खरीखुरी कला." अशा प्रकारच्या अभिजात कलेची किंमत सोन्यारुप्याच्या नाण्यांनीं किंवा हिरेमाणकांच्या ओंजळींनीं कधींच होत नसते ही मध्यवर्ति कल्पना " कलेचें मोल " या गोष्टींत आढळून येते. जनानी हावभाव आणि " अजिंठा छाप " अंगविक्षेप या भांडवलाच्या जोरावर कोणतीही तरुणी आपल्यावर बेहद्द खूष होईल अशी स्वतःच्या मनाची निष्कारण खात्री करून घेऊन ढुंगेगिरी (flirting) करणाऱ्या एका आचरट कागदी जवानाचें व्यंगचित्र " ताऱ्याची ओवाळणी " या गोष्टींत पहायला सांपडेल. भावी वैभवाच्या थयथयाटानें बेचैन होणाऱ्या भावनावश स्त्रियांच्या

वृत्ति परिस्थितीच्या योग्य आकलनानें स्थिरावल्यानंतर त्याच स्त्रियांच्या हातून क्वचित् प्रसंगीं केवढा मोठा स्वार्थत्याग होऊं शकतो या तत्त्वावर रंगवलेलें एक मनोविश्लेषणात्मक दृश्य "रक्त" या पत्रमय कथेंत दृष्टोत्पत्तीस येतें. केवळ वैवाहिक जीवनाची अनुषंगिक जबाबदारी टाळण्याच्या हेतूनें मातृपदाची नैसर्गिक आकांक्षा असणाऱ्या संसारांतील सहचरीवर संततिनियमनाची सक्ति करूं पाहणारे विवेकशून्य प्राणी खरोखरीच्या संसारसुखाला कसे पारखे होत असतात हें "मोडी" या गोष्टींत फारच कौशल्यानें दाखवलें आहे. "आंधळ्याची शाळा"—या वैचित्र्यपूर्ण गोष्टीच्या शेवटीं लेखकानें काढलेले निष्कर्ष खरोखरच मननीय आहेत. युक्तायुक्ततेकडे न पाहतां धर्माच्या नांवाखालीं डोळे मिटून दानधर्म करणाऱ्या अंधश्रद्धाळू भाविकांचे डोळे गोष्टींतला आंधळा खात्रीनें उघडील. शेवटच्या गोष्टीला लेखकानें दिलेलें "धर्माची टोपी" हें द्व्यर्थी शीर्षक किती यथायोग्य आहे याची खात्री गोष्टीचा शेवट झाल्यावरच तंतोतंत पटते. "धर्म म्हणजे टोपी. हवी तेव्हां घालावी आणि वाटेल तेव्हां काढावी. त्या टोपीवर कांहीं माणुसकी अवलंबून नाहीं." असें म्हणून माणुसकी हाच सर्व धर्मांचा आदिधर्म अशी धर्माची एक सूत्रबद्ध व्याख्या देण्याचा लेखकानें प्रयत्न केला आहे.

व्यक्ति तितक्या प्रकृति या म्हणीप्रमाणें लेखकानें जागोजाग मांडलेल्या विचारांबाबत कित्येकांचा मतभेद होण्याचाही संभव आहे. परंतु नवमतांच्या प्रवाहांना मतभेदांच्या खडकांतून नेहमींच मार्ग काढायचा असतो हें कधींच विसरून चालणार नाहीं.

प्रस्तावनेचा प्रांत संपला. पुस्तकांतील गुणदोषांचें विवेचन करण्याचें काम मार्मिक आणि सहृदय टीकाकारांवरच सोंपवणें रास्त.

माझे स्नेही व " महाराष्ट्र कुटुंब मालेचे " संचालक श्री. ना. वि. कुलकर्णी यांनीं हें कथासप्तक एकत्रित करून महाराष्ट्र रसिकांच्या हवालीं करण्यांत जें औचित्य दाखवलें आहे त्याबद्दल मी त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

१९८।१६ टिळकरोड
पुणें.
७।३।१९३९

शंकर कृष्ण देवभक्त

## १ कलेचें मोल

राजकन्या सुदतीच्या सतराव्या वाढदिवसानिमित्त राजवाड्यात गेले आठ दिवस समारंभावर समारंभ चालले होते. सुदतीच्या पित्याला आपल्या एकुलत्या एक मुलीच्या वाढदिवसाची हौस तर वाटत असेच; परंतु तो सतरावा वाढदिवस बापाच्या घरचा शेवटचाच असल्यानें, राजा धीमंताच्या व राणी पौर्णिमेच्या उत्सवप्रियतेला अमाप उचंबळा आला होता. लक्ष्मीला श्रीविष्णूच्या स्वाधीन करण्यासाठीं, आपल्या मणिमय प्रासादांतून बाहेर काढण्यापूर्वी रत्नाकराच्या उत्साहाला इतकी भरती आली होती कीं, तिच्यांत सारा भूभाग गडप होणार कीं काय, अशी सर्वांना भीति पडली होती म्हणतात. त्यात अद्‌भुत आणि अशक्य असें कांहींच नाहीं. अधिकारी श्रीमंताच्या उत्सवांत थोड्या गरिबांना होणाऱ्या पोट-भरीच्या फायद्याहून, अनेक गरिबांना कमींत कमी वेठीचा भूर्दंड तरी भरावाच लागतो. आज पाहायला मिळेल असल्या सत्याचें प्रत्यंतर—एखाद्या संस्थानांत जाऊन पाहण्याची तसदी मात्र घ्यायला हवी. राजाला एखाद्या पदवीची प्राप्ती झाली म्हणून होणाऱ्या समारंभापासून राणी-साहेबांच्या डोहाळजेवणासह युवराजांचें पडसें बरें झाल्याच्या अभिनंदना-साठीं भरलेल्या दरबारपर्यंतच्या प्रत्येक उत्सवासाठीं, प्रत्येक राजाच्या गरीब प्रजेला खुपीची सक्ति आपल्याच हातांनीं तोंड दाबून घेऊन पत्करावी लागते !

सुदतीच्या त्या वाढदिवसाला आणखी एक फारच मोठें महत्त्व प्राप्त झालें होतें. तिचा नियोजित वर राजकुमार वल्लभराज समारंभाच्या शेवटच्या दिवशीं सुदतीची भेट घेणार होता...अलीकडच्या पद्धतीप्रमाणें तो नुसता पाहून 'हो' म्हणणार नव्हता. त्या दिवसापासून लग्नदिवसा-पर्यंत, किंवा आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यन्त तो राजा धीमंताच्या राजवाड्यांतच राहणार होता, असें म्हटलें तरी चालेल. कारण, कुमार

वल्लभ राजपुत्र असून राज्याचा धनी नव्हता; त्याच्या बापाचें राज्य शत्रूंनीं हरण करून, त्याला देशोधडीला लावला होता, अशांतला कांहीं प्रकार नव्हता. देवानेंच कुमार वल्लभाला राज्यावांचून राजपुत्र बनविलें होतें. वल्लभ आपल्या बापाचा धाकटा मुलगा होता. अर्थातच बापाचें राज्य वल्लभाच्या थोरल्या भावाला मिळणार होतें. राजा धीमंतांच्या सर्व प्रजा-जनांना मनांतून खूप खूप वाटत असे कीं, युवराजाचें कांहीं बरेंवाईट व्हावें, आणि कुमार वल्लभ आपला राजा व्हावा. परंतु प्रजेच्या इच्छेवर राजाचें राजेपण थोडेंच अवलंबून असतें ? तसल्या उथळ कल्पनांचा प्रादुर्भाव आमच्या आर्यसंस्कृतिभूषण भरतखंडांत कधींच झाला नव्हता. राजाचा मोठा मुलगा राज्याचा धनी हें वेदवाक्य एकदां देव बोलून चुकला तो चुकला. मग देवाची नजर चुकवून जरी त्याचा एखादा 'प्रिय' प्राणी राजाच्या,–नव्हे राणीच्या उदरीं ठाव घेता झाला, तरी बापड्या प्रजेनें त्या बैलोबाचें राजेपण गुपचुपपणें मान्य केलेंच पाहिजे. आज जशी आमच्या देशात ही देवाज्ञा लोकमान्य आहे, तशीच ती राजा धीमंताच्या काळांतही असल्या कारणानें कुमार वल्लभाला बापाच्या राज्याची आशा स्वप्नांतही शिवली नाहीं.

कुमार वल्लभाला आपली लाडकी मुलगी सुदती देऊन त्याला आपल्या राज्याचा धनी करावयाचा असें राजा धीमंतानें ठरवून कुमार वल्लभाच्या पित्याची संमतिही मिळविली होती.

परंतु कुमार वल्लभ पडला अभिजात विक्षिप्त. 'बापानें पाहिलेली मुलगी बापानें करावी, मुलानें कां म्हणून पत्करावी ?' असें तो आपल्या आईजवळ म्हणाला. शेंडेफळ आईचें आवडतें. पतीच्या मनाचें कमल पूर्णपणें प्रफुल्ल असतां कुमार वल्लभाची मनीषा आईच्या अंतःकरणानें आणि आवडत्या पत्नीच्या लाड्यागोडया शब्दांनीं तिनें पतीच्या कानांवर घातली. इतकेंच नव्हे, तर वल्लभाला सुदती आवडली, तरच राजा धीमंताशीं केलेले ठराव अंमलांत आणावयाचे, असें तिनें पतीकडून कबूलही करून घेतलें.

बापाच्या राज्याचें आंदण घेऊन सुदतीसारखी सौंदर्यशालिनी माळ घालावयाला सज्ज असतां वल्लभ तिला धिक्कारील, असें होणारच नाहीं, असें वाटून राजानें राणीचें मागणें मान्य केलें; तिला तसें वचन दिलें.

आईला जितकें मुलाचें मन माहित असतें, तितकें बापाला नसतें. कुमार वल्लभाच्या आईला त्याचा मुलखावेगळा विक्षिप्त स्वभाव पूर्णपणें माहित असल्यामुळें आपला 'गुणी बाळ' असलें अमोलिक लग्न मोडून तर टाकणार नाहीं ना! अशी तिला भीति वाटूं लागली. एकदां तिला वाटे, 'उगीच आपण या भानगडींत पडलों—खरच वल्लभराजानं सुदतीशीं लग्न करण्याचं नाकारलं तर, आपल्यावर केवढं बरं टोपर येईल? राजा धीमंतासारख्या बळिवंताशीं जन्माची दावेदारी पत्करावी लागेल; कदाचित् आपलं आजचं राणीपणही नाहींसं होईल! काय करावं या पोराला?' पुढें पुनः केव्हां तरी तिची तीच आपल्या मनाची समजूत काढी. 'समजा, मी नसतें या भानगडींत पडलें आणि जर तो पोरगा म्हणाला असता, कीं तुम्ही जर माझं ऐकत नाहीं तर मीही तुमचं ऐकत नाहीं जा. तुम्ही काय करणार माझं? राज्य घेणार? देवानं मला राज्य दिलंच नाहीं; तर तुम्हीं पामरांनीं काय माझं राज्य घ्यावं! पण मी मनांत आणीन तर आज तुमचं राज्य हिसकावून घेईन. तुम्ही मला राजवाड्यांतून हाकलून द्या; मी बाहेर पडतों आणि लोकांना ओरडून सांगतों कीं, मला तुमचा राजा व्हायचं आहे. चला, द्या मला तें राज्य; एकूणएक सैनिक माझ्यासाठीं तुमच्यावर शस्त्र उगारील, आणि मी लोकाचा राजा होईन; आज मी नीट आहें, तर उद्यां दादामहाराज राजे होतील; नाहींतर—खरंच नाहीं का होणार त्याचं म्हणणं? तो लोकांच्या हृदयाचा लाल आहे, त्यापेक्षां त्याला आपली नवरी पसंत करण्याची परवानगी मिळवून दिली, तेंच चांगलं झालं. शेंकडा नव्वद हिश्शानीं धीमंतराजांची सुदती त्याला पसंत पडेलच—नाहींच असं तरी आज कसं म्हणावं?'

घराण्याच्या जुनाट वहिवाटीची सबब पुढें करून पित्यानें राजा धीमंताची संमति मिळविली.

धूर्त धीमंतानें आधींच ओळखलें होतें कीं घराण्याची जुनाट वहिवाट ही एक आपली कांहीं तरी सबब आहे. पाणी कोठेंतरी तिसरीकडेच मुरतें आहे. पण वाट काढून दिली आहे निराळ्याच दिशेनें! कसेंही झालें तरी तो उपवर मुलीचा बाप होता. ठरलेलें लग्न पार पडेतों त्याच्या जीवांत

जीव नव्हता. सुदती वल्लभराजाला मोह पाडील असा त्यालाही दृढ भरंवसा होता; भावी जावई मुलखावेगळा विक्षिप्त असला, तरी सुदतीचें सौंदर्य अलौकिक होतें; तिची विद्यासिद्धि पाहून पंडितांनींही माना डोलविल्या होत्या. नाग नेहमीं वांकड्या चालीनें जात असला तरी तो नादसौंदर्यानें नादावला म्हणजे आपली चाल बदलून तालात डोलूं लागतो, हें श्रीमंत ओळखून होता.

सुदतीच्या कानांवरही वधूपरीक्षेची कुणकुण गेली होतीच. त्या काळात तिला तो प्रकार विपरीतच वाटला. वधूनें वर पसंत करावयाच्या, पणाला लावून पहावयाच्या काळाचा जरी पूर्वीच अस्त झाला होता, तरी काळाकाळांच्या संधिप्रकाशांत पूर्वीच्या चालीरीतींचीं पुसटतीं चित्रें सुदतीच्या वेळीं अधुनमधून दिसत असतच; परंतु वल्लभाची अट म्हणजे पुरुषी सत्तेची प्रत्यक्ष निशाणीच असली, तरी सुदतीला ती जाणवली नाहीं. लग्न ठरलेलें, जवळ आलेलें, आणि कदाचित् फिसकटणार अशा भीतीच्या दारात बसलेलें! म्हणून तिची एकच धडपड चालली होती; सर्व बाजूंनीं अशी जय्यत तयारी ठेवावयाची कीं, आपल्या नवरदेवाला बोट दाखविण्यास दोषच सांपडूं नये. वल्लभाला मृगयेचा विलक्षण नाद, तर तीही शस्त्रविद्येंत तरबेज, तो रसिक, तर ती काव्यशास्त्रविनोदाची भोक्ती होती. वल्लभ हा संगीताचा शोकी–तर तेवढें मात्र सुदतीमध्यें वैगुण्य होतें. काय असेल तें असो, अगदीं बालपणापासून तिला संगीताची एका परीनें नावडच होती म्हटली तरी चालेल. गाणें आणि फुलें तिला मनापासून नको नसत. कोणीं कमळाचें सुंदर फूल आणून दिलें, तर खुशाल त्याच्या पाकळ्या तोडून टाकी, व मधल्या गड्डयातील ताजीं कच्चीं कमलबीजें खाऊन टाकी! पण तिच्या त्या खोडी, वल्लभाचा वधूपरिक्षेचा पण कळल्याबरोबर मंत्र घातल्याप्रमाणें एकाएकीं नाहींशा झाल्या; इतकेंच नव्हे, तर फुलांबद्दल तिच्या मनांत फुलांइतकाच कोमलभाव उत्पन्न झाला—निदान लोकांना तरी तसें वेळोवेळीं दिसून येऊं लागलें. राजसभेंतील संगीताचार्यांचीं वेतनें एकदम दसपटीनें वाढविण्यांत आलीं; परप्रांतांतील संगीतज्ञांची तर पोळी पिकली. कसें झालें तरी सुदती राजकन्या होती. घरचा उपाशीं मेला.

त्याच्याकडे ढुंकून पाहावयाचें नाहीं, परंतु बाहेरच्याला इतका चरिंदा द्यावयाचा, कीं त्यानें आपल्या नांवाची दवंडी सारा जन्म पिटीत राहिलें पाहिजे, अशी जी जन्मजात कीर्तिकफल्लक सर्व राजे लोकांची खोड असते, ती मुदतीच्या रक्तांत तरी कशी नसेल ? दाही दिशांचे संगीतकलेचे सेवक, अभ्यासक आणि मालक राजा धीमंताच्या राजधानींस गोळा होऊं लागले होते. त्या सर्वांचा आद्य हेतू काहीं राजकन्या मुदतीच्या उसन्या रसिकतेला संतुष्ट करण्याचा नव्हता. राजकुमार वल्लभ त्या राजधानींत बरीच मोठी वस्ती करून राहणार आहे, अशी वार्ता ऐकूनच ते तेथें गोळा होऊं लागले होते. वल्लभ म्हणजे संगीतकोविदांचा अनंत हातांचा आश्रयदाता. हा आतला, तो बाहेरचा असा राजशाही वाणा त्याच्या ठिकाणीं कधींच दिसायचा नाहीं, अशी त्याची दिगंत कीर्ती पसरलेली होती. म्हणूनच सारे संगीतशास्त्री धीमंत राजाच्या राजधानींत गोळा होऊं लागले होते.

मुदतीला आपल्या भावी पतीची कीर्ति ऐकून माहित होती आणि गवय्येबजवय्याच्या जमूं लागलेल्या गर्दीनें प्रचीतीही पटूं लागली होती. वल्लभाच्या त्या प्रकारच्या कीर्तीतही हार जावयाचें नाहीं, असे मनाशीं ठरवून ती आलेल्या परस्थ कलावंताचा परामर्ष मुक्तहस्तानें घेऊं लागली होती. एकदांचें आपलें विवाहमंगल उरकून जावें, म्हणून लग्नाला आलेल्या मुली काय काय ढोंगें करतील आणि सोंगें पत्करतील, याचा काहीं नियम नाहीं !

कलावंतांना मात्र मुदतीच्या रूपानें देवच आपल्या रक्षणाला धांवला असें वाटलें. त्यांची स्थिति धीमंताच्या राजधानींत येऊन मोठी चमत्कारिक झाली होती. ज्याच्या रसिकतेवर, औदार्यावर विश्वासून ते सारे जमले होते तो कुमार वल्लभच तेवढा तेथें आलेला नव्हता. त्याचे सारे दिमतीदार सरदार, मानकरी, खासे सैनिक कधींच राजा धीमंताचे पाहुणे होऊन राहिले होते. 'तुम्हीं पुढें व्हा, मी तेवढी वनजाईच्या अरण्यांत पिसाळलेल्या वाघिणीची मृगया करून लगेच येतों,' असें मधल्या मुक्कामालाच साऱ्यांना सांगून कुमार वल्लभ घोड्यावर बसून निघून गेला होता. कोणीही आपल्यांबरोबर आगूनमागून येतां नये, अशी

आज्ञा देऊन तो गेला होता. त्या गोष्टीला पंधराहून अधिक दिवस होऊन गेले होते. तरी कुमार वल्लभ येण्याचीं कांहीं चिन्हें दिसत नव्हतीं, वार्ता लागत नव्हती. त्याच्याबरोबरच्या लोकांनीं आज्ञाभंग करून, व राजा धीमंतानें धीटपणा पत्करून रानजाईच्या अरण्याकडे तपास करण्यास पुष्कळ दूत पाठविले. 'रानजाईच्या वनांत कधींच वाघीण पिसाळली नव्हती' असें आसपासचे लोक सांगत असल्याची वार्ता घेऊन ते सारे परत आले होते. अशा चिंताजनक अवस्थेंत कोणाला गाणे सुचणार? आणि कलावंताच्या उपाशी पोटाची दाद तरी कशी लागणार? कुमाराच्या एकाएकीं नाहींसं होण्याची वार्ता राजकुमारी सुदतीपासून गुप्त ठेवण्यांत आली होती, म्हणूनच केवळ, त्या राजधानींत आलेल्या कलावंतांची लाट लागत होती.

कुमार वल्लभाचे सारे अंतरंगी सरदारदरकदार राजा धीमंताला धीर देत होते. 'येतों' असे कुमारांच्या तोंडून वचन गेलें आहे, ते आल्याखेरीज राहावयाचे नाहींत. थोडें मागे पुढें होईल, इतकेंच... त्यांचे वागणें हें असेंच विचित्र असतें!...' असें ते धीमंतास पुनःपुनः सांगत होते. तेवढ्यावरच तोही बापडा आशा ठेवून होता.

[ २ ]

वाढदिवसाच्या समारंभाचा शेवटचा दिवस उगवला, तरी कुमार वल्लभ कांहीं उगवला नाहीं. तो दिवस कितीही उत्साहाचा असला तरी, केवळ आपला परीक्षक येत नाहीं, म्हणून सुदती अगदीं सकाळपासून रंजिस होती. उत्सवाचे ठराविक कार्यक्रम होत होते, सुदती त्यांत भागही घेत होती, पण ती अंतर्यामीं कष्टी होती, हें तिच्या मुद्रेवरून कोणासही कळून चुकलें असतें.

"आई, आज मला कसं तरीच होतं आहे सकाळपासून." राणी पौर्णिमेला सुदती म्हणाली, "आतां यापुढं नको मला कसल्या समारंभांत ओढूं; मला माझ्या मंदिरांत राहूं दे जरा स्वस्थपणानं. आठ दिवसाच्या धांगडधिंग्यानं जीव कसा अंबून गेला आहे."

राणी पौर्णिमा सार्थपणें स्मित करून म्हणाली, " कुणास ठाऊक बाई, तुला समारंभाच्या धांगडधिंग्यानीं गळून गेल्यासारखं होतं आहे, कीं..."

" हं ग काय आई! नको बोलूंस पुढं आणखी कांहीं. तूं असं कांहीं तरी बोलतेस आणि मग रसिका, गिरा, विद्या या माझ्या साऱ्या सख्या तेवढ्या आधारावर मला अगदीं नकोनको करून टाकतात. "

" रसिका?...रसिका कधीं बाई तुझी सखी झाली? विद्या एक म्हटली तर ठीक, आम्हींच तिला लहानपणापासून तुझ्याबरोबर वाढविली. गिरेला तूं जिव्हाळा दिलास. त्या तुझ्या खऱ्या कुलवताच्या सख्या. रसिका एक युद्धाच्या गर्दीत सापडलेली पोर! कुणास ठाऊक कोण कुणाची आहे ती. ती तुझी सखी असं पुन: म्हणालीस तर मला खपायचं नाहीं बघ. आपण कोण, आपली योग्यता काय, याचा विसर पडूं देऊं नकोस. असल्या हलक्या लोकांशीं बरोबरीनं वागणं, आपल्या मोठेपणाला तोलून दिसत नाहीं. "

" पण आई, आतां मला हा लहान, हा मोटा, तो श्रीमंत, हा गरीब असं करून चालायचं नाहीं. तुम्हां राजेलोकांच्या मानमरातबाच्या कल्पनांची कुमार वल्लभांना मनापासून चीड आहे, हं तुला माहीत का नाहीं?"

" त्यांच्या कल्पनाप्रमाणं आपल्या कल्पना बदलायला तूं का कोणा शेतकऱ्याची का मजूराची बायको होणार आहेस? कुमार वल्लभांचा तो दरिद्री ब्राह्मण गुरु त्यानें हे समानतेचे वेडेचार त्यांना शिकविले आहेत. चार दिवस चालतील त्याचे हे चाळे; पण ते या आमच्या राज्याचे धनी होणार आहेत उद्यां. त्यांना इथल्या परंपरेप्रमाणें आपले आचारविचार बदलले पाहिजेत—नव्हे आम्ही वल्लभाला आमच्या रीतीभातींनींच वागायला लावूं—घरजांवयाला स्वतःचं असं कांहींच नसतं, मग आचार-विचारांवर तरी त्याची सत्ता कशी असेल—चालूं कोण देईल...?"

राणी पौर्णिमेचें हें राजेशाहीच्या मोठेपणाचें प्रवचन आणखी किती तरी वेळ पुढें तसेंच चाललें असतें. परंतु मध्येंच सुदतीनें चिडक्याच

आवाजांत आपल्या दासीला हांक मारली आणि सांगितलें, " गिरा अन् विद्या यांना स्पष्टपणें बजावून सांग, आज—नव्हे पुनः माझी इच्छा होईतों त्यांनीं माझ्या मंदिरात येता कामा नये. आणि रसिकेला म्हणावं, तूं आजपासून माझ्या नजरेपुढून एक क्षणही हलतां कामा नये."

फणकाऱ्यानें आपल्या मंदिराकडे निघून जाणाऱ्या सुदतीकडे राणी पौर्णिमा आश्चर्यानें पाहातच राहिली. तिच्या लाडच्या लेकीनें आजपर्यंत तिची अशी अवज्ञा कधींच केली नव्हती.

[ ३ ]

" असं काय करतां महाराज? नुसतं घळघळां पाणी वाहतं आहे डोळ्यांतून. मनची गोष्ट मला सांगायची नसेल, तर विद्यादेवीजवळ सांगावी, अन् मन हलक करावं...बोलावणं पाठवूं का विद्यादेवींना?" काकुळतीनें रसिकेनें सुदतीला विचारलें.

मान हलवून सुदतीनें आपली नापसंति दर्शविली; आणि त्याच-बरोबर कुशीला वळून तिनें आपलें तोंड दोन्हीं हातानीं झांकून घेतलें, आणि ती हुदके देऊन रडूं लागली.

रसिकेला काय करावें, राजकन्येची समजूत कशी काढावी, हेंच कळेना. सुदती जरी तिला सखी समजत होती, तरी रसिका आपली त्या ठिकाणची योग्यता ओळखून असल्यानें, तिच्यामध्यें आणि राजकन्येमध्यें जिवाचा जिव्हाळा कधींच उत्पन्न झाला नव्हता!

राजकन्येला तशीच धुमसत ठेवून ती मुकाटपणें, जड मनानें पण हलक्या पावलानीं मंदिराच्या दुसऱ्या दालनात जाऊन एका आसनावर विमनस्कपणें बसली.

दिवस अगदीं मावळण्याच्या रंगाला आला होता. झाडावरून गळून पडण्याइतकें निःशक्त झालेल्या पानाप्रमाणें, किंवा मरणाच्या दारांत पाऊल टाकून राहिलेल्या मनुष्य प्राण्याप्रमाणें त्या दिवसापुरतें आपलें आयुष्य संपवीत आलेला सूर्यप्रकाश पुरता पिवळा पडला होता.

उभे अडीच तीन प्रहर झाले, राजकन्या सुदती आपल्या खोलींत पडून होती. राणी पौर्णिमेचा जीव त्यामुळें पिंजऱ्यात सांपडलेल्या पांखरा-

प्रमाणें फडफडूं लागला होता. कमीतकमी दहा वेळां तरी आपल्या प्रिय कन्येकडे ती येऊन गेली असेल. परतु सुदतीनें तिच्याकडे नुसतें वळूनही पाहिलें नाहीं; मग बोलणें, ऐकणें, समजूत करून घेणें दूरच राहिलें.

दिवस संपला. प्रकाशाच्या सावल्या तेवढ्या झुंजुमुंजुपणानें पृथ्वीवर रेंगाळत राहिल्या होत्या.

सुदती एखाद्या बालकासारखी सस्मित आपल्या मदिराच्या घुमटींत जाऊन उभी राहिली. काय तिनें आपल्या मनाची समजूत केली कोणास ठाऊक! स्त्रिया या नेहमीं दुसऱ्यावर अवलंबून राहणाऱ्या असल्यानें, जिवाचा आधार सुटल्यासारखा वाटतांच होऊं लागलेलें त्याच्या जिवाचें पाणी डोळ्यांतून वाहूं लागतें. परंतु, पुरुषापेक्षा त्यांना दैवाचा अज्ञात आधार लवकर सापडत असल्यानें, पर्जन्यानें ताजींतवानी होऊन सुंदर दिसूं लागलेल्या सृष्टीप्रमाणें त्या तावडतोब सतेज व प्रफुल्ल दिसूं लागतात. हो, बाकी सृष्टि झाली तरी स्त्रीच कीं नाहीं?

अश्रुसिंचनानंतर उल्हसित झालेली सुदती आपल्या सौधावर उभी असता, भोंवतालच्या रंगीबेरंगी संगमरवरी मंडपीमुळें एखाद्या कलासंपन्न कारागिराने घडविलेल्या देवीच्या सुदर मूर्तीप्रमाणें दिसत होती. निदान त्या दिवसापुरती तरी तिला देवतेची उपमा शोभून गेली असती. देवतेच्या नांवानें उत्सव, जत्रा चालत असतात, भरत असतात. पण देवतेच्या मूर्तीला त्याचें कांहीं असतें का? भक्तांनीं बांधून दिलेल्या गाभाऱ्याच्या कैदखान्यात, महिषींच्या पलीकडे, प्रभावळीच्या बंधनानीं जखडून टाकलेली मूर्ति निःश्चलपणे उभी असतेच कीं नाहीं? कसली देवता ती? दगडच कीं! माणसांनीं आपल्या मनाच्या हौसेसाठीं उत्सव आरंभले, जत्रा जमा केल्या, तर त्याचें त्या दगडाला काय होय? सुदती जरी दगडाची पुतळी नव्हती, तरी तिच्या हृदयावर त्या दिवशीं एखादी अजस्र शिळा ठेवल्याप्रमाणें तिला वाटत होतें. त्या भाराखालीं तिचें तें स्त्रीहृदय इतकें चेपून गेलें होतें कीं, उत्सवाच्या आनंदाने स्फुरण पावणें त्याला शक्यच नव्हतें. राजाघरचा उत्सव पाहून दृष्टिसुखानेंच धन्य होणारे हजारों प्रजाजन आपल्या थोड्याफार आनंदांत गर्क होऊन राज-

रस्त्यानें इतस्ततः फिरत असलेले सुदतीला दिसत होते; पण ती त्यांच्याकडे पाहात नव्हती. नवीन जन्माला आलेल्या बालकाच्या दृष्टीचा अस्थिरपणा तिच्या डोळ्यांत भरला होता. तिच्या जन्मदिवसाच्या निमित्तानें ठिकठिकाणीं चाललेला जल्लोष, हर्षकल्लोल तिला ऐकूं येत होता; पण त्यांचा तिच्या मनावर त्यावेळीं यत्किंचित्‌हि परिणाम होत नव्हता; म्हणूनच ती तेव्हा एखाद्या देवतेच्या योग्यतेला पोहोंचली होती, असें म्हटलें तरी चाललें असतें.

[ ३ ]

एका मंजुळ तंतुवाद्याचे ध्वनि दुरून कुठून तरी ऐकूं येऊं लागले. लोकांच्या गलबलाटातहि त्याच्या मधुरपणाकडे सुदतीचें लक्ष वेधलें. सौधाच्या अर्ध्या भितीवर वाकून रस्त्याच्या कोणत्या दिशेनें ते सूर येत आहेत, याचा ती कानोसा घेऊं लागली. तेव्हां एक अमंगळ भिकारी गळ्यांत सतार अडकवून तिच्यावर एक कोमलस्वरी रागिणी छेडत जात असलेला तिला दिसला.

त्या भिकाऱ्याच्या डोकीवरचे केस त्याच्या मानेपर्यंत अस्ताव्यस्त पणं पसरले होते. तोंडावरचे केंसही बरेच वाढलेले स्पष्टपणें दिसत होते. कंबरेपासून गुडघ्यापर्यंत पोहोंचणाऱ्या एका मळकट वस्त्राखेरीज त्याच्या अंगावर दुसरें कांहीं शरीररक्षणाचें साधन दिसत नव्हतें. पाठीवर मात्र कसल्या तरी खांद्यावर अडकविलेल्या लांबटशा पिशव्या त्याच्या पावलाबरोबर हलत होत्या.

आपल्याच नादात तल्लीन असलेला तो भिकारी सुदतीच्या सौधाखालून पुढें निघून गेला.

“ असला कसला हा भिकारी ? इतके लोक जमले आहेत त्यांच्याकडे पाहतसुद्धा नाहीं ! नाहीं तर हे वाजवत हिंडणारे भिकारी रस्त्यानं कांहीं कुणाला सोडीत नाहींत. पुढं दिसेल त्याच्यामागें लागून चार कवड्या तरी पदरीं पाडून घेतातच. ”

आपल्या सख्या नेहमींप्रमाणें आपल्या अवतींभोंवतीं असतील अशा संवयीच्या कल्पनेनें सुदती मोठ्यानें म्हणाली.

तिची कल्पना कांहीं चुकीची नव्हती.

“ पण किती छान वाजवितो आहे, नाहीं ? इतके तंतुकार पाहिले, पण हा हाताचा गोडवा कांहीं औरच आहे नाहीं, महाराज ? ” किती तरी वेळ मुकाट्यानें मागें येऊन उभी राहिलेली रसिका म्हणाली.

“ खरंच बाई ! ” आवाजावरून मागें कोण आहे याचा अंदाज येऊन सुदती म्हणाली, “ कांहीं औरच काम दिसतं आहे खरं. पण हा नुसता हिंडतो आहे कां असा ? तीनचार जणांनीं त्याला कांहीं देण्यासाठीं हात पुढें केलेला मीं पाहिला; पण हा आपला ढम् ! त्यांच्याकडं पाहिलं-सुद्धां नाहीं त्यानं ! ”

“ कलेनं श्रीमंत असलेले हे भिकारी पैशाला लालचावलेले नसतात. कला आणि तिचं मोल, असा बाजार करणारा कारागीर कितीहि विद्यासंपन्न असला, तरी तो आपल्या कलेशीं एकरूप झालेला कलावंत होऊं शकत नाहीं सोन्याचा भाव करणारा व्यापारी अगर सोन्याचे अद्‌भुत प्रकारचे अलंकार करणारा सुवर्णकार हे जसे सोनें होऊं शकत नाहींत, तसंच या व्यापारी कलावंतांचं आहे. त्यांच्यांत आणि कलेंत द्वैताचं अंतर असल्यानें ते थोडेफार कां होईना कलेपासून दूर असतात ! आणि कलेशीं एकजीव झालेला असला लाखांतील एखादा भिकारी कलावंत, आपल्या कलेचं मोल होऊं देत नाहीं. नव्हे पृथ्वीच्या तोलानं जरी त्याच्या कलेचं मोल केलं, तरी त्याचे प्राण कासावीस होऊं लागतात ! कला हेच त्याचें जीवन ! पृथ्वीचं राज्य देतों आणि तुझे प्राण घेतों, असं जर एखाद्या पृथ्वीपतीनं कुणा एखाद्या भिकाऱ्याला सांगितलं, तर तो प्राण देऊन राज्य घ्यायला तयार होईल का ? प्राण नाहीं तर राज्य घेऊन करायचं काय ? ”

“ म्हणजे कला ही अमोलिकच असते असं तुझं म्हणणं ? ”

“ माझंच काय, साऱ्या रसिकांचं तसंच सांगणं आहे महाराज. ” रसिकेच्या उत्तरांत आत्मविश्वासाचा ओज स्पष्टपणें भासत होता.

“ तर मग खरा कलावंत म्हणजे निरपेक्ष असा साधूच म्हणावा लागेल. ”

" अगदीं विरक्त संन्यासी ! कलारूपी देवतेच्या चिंतनानं आजन्म आत्मसमाधानांत गुंग असलेला मुक्तात्मा म्हणाना ! "

" बरं बरं पाहूंयाच आतां. जा कोणा तरी दूताला पाठवून त्या भिकाऱ्याला बोलावून आणीव. संगीतशाळेंत आजवर कधींच दृष्टीस पडली नाहीं, अशी आरास करावयास माझ्या नांवानं आज्ञा दे. जा लागा एकदम आपल्या कामाला. "

[ ४ ]

पुढें कित्येक दिवस त्या वेळीं हजर असलेल्या लोकांच्या ध्यानांत त्या दिवशींची संगीतशाळेची आरास आश्रय धरून राहिली होती.

कमींत कमी दहा हजार तरी दिवे त्या दिवशीं लावण्यांत आले होते. त्याच्या प्रकाशानें उजळून निघालेल्या निरनिराळ्या रंगांच्या भिंतींतून किरण परिवर्तित होत असल्यानें एकंदर चकचकाटाला ठिकठिकाणीं निरनिराळें रूप प्राप्त झालेलें दिसत होतें. संगीतशाळेच्या मुख्य प्रशस्त दालनाचे तीन भाग पडलेले होते. दोहो बाजूचे भाग मधल्याहून थोडे निमुळते असले, तरी इतर राजांच्या राजवाड्याचे दहापांच दिवाणखाने ते सहज सामावूं शकले असते. मधल्या भागाच्या दोहों बाजूंस सोन्याचे पत्रे मारलेले प्रत्येकीं शंभर खांब व त्यांवर तशाच कमानी होत्या. त्यांवर निरानिराळ्या प्रकारच्या वेलीं खोदल्या असून त्यांचीं पानें, फुलें, कळ्या वगैरे योग्य त्या रंगाच्या रत्नांनीं खचल्या होत्या. खांबावर पायथ्यांशीं कमानीच्या दोहों बाजूस सोन्याचे खरोखरीच्यासारखे मोठमोठे मोर बसविले होते. त्यांच्या अंगाचे व पिसाऱ्याचे विविध वर्णहि विविधवर्णी अमोलिक मण्यांच्या कोंदणांनीं साधण्यांत आले होते. त्या मणिमय सुवर्णावर हजारों दिव्यांचा एकत्र प्रकाश पडल्यानें, प्रत्येक खांब म्हणजे तेजाचा लोळगा वाटत होता.

मध्यभागीं स्त्रियांची बसण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. कारण ती बैठक राजकन्येच्या हुकूमानें भरविण्यांत आली होती. सरदार, जहागिरदार, मांडलीक, संस्थानिक यांना त्यांच्या इतमामाप्रमाणें पण दोहों-बाजूच्या भागांत बसविण्यांत आलें होतें. मुख्य भागाच्या समोरच्या बाजूस

एक ऐसपैस उच्चासन कायमचेंच बांधलेलें होतें. त्यावर ऐपआरामानें लोळतां येईल, अशा व्यवहारानें बैठक घालण्यांत आली होती.

ज्याच्या कलेचा इतका मोठा बडेजाव आहे, तो असा कलावंत आहे तरी कोण तो पाहाण्याकडे सर्वांचें लक्ष लागलें होतें.

रसिकेनें रस्त्यावरच्या त्या भिकाऱ्याला संगीत शाळेंत आणतांच आश्चर्यानें वेड्यवांकड्या झालेल्या सर्वांच्या मुद्रा पाहण्यासारख्या होत्या! संगीतानें स्वतःबरोबर इतरेजनांची करमणूक करण्याऐवजीं, एखाद्या भिकारड्या वादकाकडून श्रोत्याच्या जिवाच्या तारान् तारा छेडून आपली करमणूक करवून घेण्याची राजकन्या सुदतीनें ही कांहीं तरी अद्भुत क्लृप्ति काढली असावी, अशीच तेथील श्रोत्यांची कल्पना झाली.

रसिकेनें त्या भिकाऱ्याला मध्यभागाच्या मध्यावर आणून सोडलें आणि तेथेंच बसून आपलीं वाद्यें सज्ज करावयास सांगितलें.

पण त्यानें रसिकेचें सांगणें ऐकलेंच नाहींसें दिसलें. तिची पाठ वळते न वळते तों तो जो तडक निघाला, तो समोरच्या उच्चासनापर्यंत जाऊन पोहोंचला; राजघराण्याच्या मोठेपणाची परंपरा पाळण्याची जबाबदारी आपण होऊन आपल्या डोक्यावर घेणाऱ्या लाळघोट्यांच्या लाळेऱ्या तोंडातून 'हां हा! हें काय? इकडे नाहीं—' वगैरे प्रकारचे उद्गार अर्धवट निघाले असतील नसतील, इतक्यांत तो भिकारी उच्चासनाच्या मध्यभागीं जाऊन बसलाही!

राजानें दिलेल्या तुटपुजा अधिकारानें तुडुंब फुगलेले चार दोन अधिकारी व त्यांच्या हाताखालचे हलकारे, हवालदार त्या भिकाऱ्याला उच्चासनावरून खालीं ओढण्यासाठीं पुढें सरसावले. एखाद्या अर्धवट माणसाच्या गोंधळलेल्या मुद्रेनें जरी तो चालून येणाऱ्या परभृतांकडे पहात होता, तरी त्याच्या हाताच्या हालचालीवरून त्याच्या अंगाला हात लावावयास जो धजावेल, त्याची बत्तीशी धड राहूं द्यावयाची नाहीं, असा त्याचा निर्धार स्पष्ट दिसत होता.

तितक्यांतच लगबगीनें रसिका पुढें सरसावली, म्हणूनच राजरस्त्यावर शोभणारा हाणामारीचा प्रसंग राजमंदिरांत घडला नाहीं; आणि संगीताच्या बैठकीची सुरवात शोकसंगीतानें झाली नाहीं.

" तुम्ही इथं नाहीं बसायचं. " शालीनतेनें रसिकेनें भिकाऱ्याला सांगितलें.

" माझ्या तंतुवाद्याच्या वादनासाठी ही सभा जमली आहे का आणखी कोणी श्रेष्ठ कलावंत या सभेंत आपलें कौशल्य प्रकट करणार आहे ?" जरा खोंचून भिकाऱ्यानें रसिकेला प्रश्न केला.

" नाहीं, आपल्याच संगीतासाठीं ही सभा उत्सुक झाली आहे."

" मग मला या उच्चासनावर बसायला बंदी का ? "

" हें राजासन आहे. "

" म्हणजे राजाचा जलसा होणार आहे ? "

कशी त्या भिकाऱ्याची समजूत पाडावी याची रसिकेला चिंता वाटूं लागली.

" इथला प्रकार कांहीं विचित्रच दिसतो ! ज्याच्या वाद्याचे सूर साऱ्या सभेला ऐकूं जायला पाहिजेत, तो म्हणें कुठें तरी गर्दीत बसायचा ! आणि ज्याला ऐकण्याखेरीज कांहीं काम नाहीं, ज्याला गाणं कसं ऐकायचं असतं हेंही कळत नाहीं, तो म्हणे उच्चासनावर बसणार ! सरस्वतीच्या राज्यांतही हे लक्ष्मीचे लाडके नंदन फुकटंफाकट उच्चासन पटकावतात अं ! मीच मूर्ख ! मी तरी असल्या अन्यायानें चिघळलेल्या, व्यवहारज्ञानाचा वाराही ज्याच्यावरून कधीं गेला नाहीं, अशा ठिकाणीं आपल्या विद्येचं प्रदर्शन करायला का याव ?—मूर्खांच्या घरची पायरी चढू नये, चढलीच तर उतरताना आपला तोल सांभाळून उतरावं हेंच खरं ! "

असें रसिकेला सांगून तो भिकारी उच्चासनावरून उतरून रसिकेनें आधीं दाखविलेल्या जागीं जाऊन खालीं मान घालून बसला.

[ ५ ]

मोलाचे ऐटबाज पोषाख केलेले नोकर मणिमोत्यांनीं भरलेलीं कांहीं ताटें घेऊन नंतर तेथें आले. भिकारी आणि उच्चासन यांच्या मधोमध तीं ताटें ठेवून ते आपल्या दर्जाच्या लोकांत जाऊन उभे राहिले.

राजकन्या सुदती आल्याचा भालदारांनीं पुकारा केला. सारी सभा एकदम उभी राहिली.

भिकाऱ्यानें मानसुद्धां वर केली नाहीं; तो उठून कुठला उभा रहायला ?

सुदतीचीं वस्त्रें अगदीं साधीं होतीं; गळयांत एक रत्नहार, आणि कर्णफुलें यांखेरीज तिच्या अंगावर दागिने नव्हते. त्या स्थानीं जमलेल्या इतर स्त्रियांचें कमीअधिक दारिद्र्य त्यांच्या शरिरावरील दागिन्यांच्या भाराच्या प्रमाणांत होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. दरिद्री हौस तिच्या भडकपणानें तेव्हांच ओळखूं येते. वादक तर उघड उघड भिकारीच होता. राजकन्या अतिशय साधी राहिलीच होती; पण रसिका दारिद्र्यापायीं साधी होती, कीं तिचें वस्त्राभरणासारख्या बाह्यात्कारी साधनावर लक्ष नव्हतें, तें सांगणें कठीण होतें. त्या व्यक्तीखेरीज तेथील बाकीचे सर्व मनुष्यप्राणी आपापल्या परीनें श्रीमंतीशीं लगट करून असलेले दिसत होते.

सुदती आपल्या आसनावर बसली. तिनें एकदां थोडेसें रोखून भिकाऱ्याकडे पाहिलें. खरचटलेल्या अभिमानाची रागिट, चिडकी नजर प्रथमच तिच्या डोळयांत चटकन् चमकली. भिकाऱ्यानें तिला, तिच्य राजकुमारीपदाला उत्थापन दिलें नव्हतें, म्हणून ती नजर असावी.

त्याच सुमारास भिकाऱ्यानें सुदतीकडे पटकन् वर डोळे करून पाहिलें.

काय असेल तें असो, सुदतीच्या डोळयांना तें भिकाऱ्याचें पाहणें सोसवेना ! तिच्या पापण्या झट्दिशीं खालीं झाल्या. थोडासा डावा गाल चढवून, भिवयांच्या कमानी उंचावून भिकारी सुदतीकडे पाहून हंसला—सुदतीचे डोळे पुनः वर झाले. त्या वेळीं गांगरलेल्या हरिणीसारखी तिची नजर झाली होती. पुनः तिची नजर खालीं झाली, इतकेंच नव्हे, तर तिची मानही थोडी वांकली.

भिकारी एकदम गडगडून हंसला.

रसिकेशिवाय सर्वांना तो एक पक्का वेडा असावा असें वाटलें.

\+ + +

भिकाऱ्याच्या पहिल्या गतीच्या पहिल्या छेडीबरोबर सभास्थानांत स्तब्धता झाली; आणि चिजेचा शेवट झाला, तेव्हां कोठें आपण दोन अडीच घटका मुग्ध झालों होतों हें सर्व सभासदांच्या ध्यानीं आलें.

राजा धीमंतांच्या पदरचे सर्व संगीतज्ञ त्या सभेंत होतेच 'कांहीं निराळेंच प्रकरण दिसतें आहे हें !' कांहीं गवई मोकळेपणानें म्हणूं लागले. ज्यांच्या मनांत तितकासा मोकळेपणा नव्हता, ते म्हणाले 'पण शास्त्रोक्त दिसत नाहीं विद्या ! जमवाजमवीची करामत आहे.'

त्यांना खालीं पाहावयास लावण्यासाठीं सदोदित पाण्यांत पाहणारे त्याचे दुसरे प्रतिस्पर्धि म्हणू लागले 'करायची आहे काय शास्त्रोक्त विद्या ! शास्त्र असायचं, अन् कला नसायची ! पुष्कळ संगीतशास्त्री आहेत आमच्या महाराजाच्या पदरीं, पण सारी सभा एकजीवि करून स्तंभित करून ठेवण्याइतकी या भिकाऱ्यासारखी कला एकाजवळ तरी आहे का ?'

त्या मत्सरयुक्त विवादाचें पर्यवसान खडाजंगींत व्हावयास फारसा अवधी लागला नसता; परंतु तेवढ्यातच भिकाऱ्यानें दुसरी चीज वाजवावयास सुरवात केली.

सर्व चिजेच्या प्रदर्शनांत आणि प्रकटीकरणांत अशास्त्रतेचा मागमूसही नव्हता. दरबारी गवई व वादक आश्चर्यानें आ वासून भिकाऱ्याकडे पाहतच राहिले. सुरांच्या आरोहाबरोबर मेंडकाम, खटके, मुरक्या यांच्या अकल्पितपणाबरोबर त्यांच्या तोंडून 'वाहवा ! अहाहा !' असे उद्गार निघूं लागले, मानांना हिसके बसूं लागले, होकारांचा घोष होऊं लागला.

त्या सभेंतील असे कांहीं लोक होते कीं त्यांना संगीतशास्त्राचा ओ कीं ठो माहित नव्हता, पण आपणही संगीताचे भोक्ते व ज्ञाते आहों असें सर्वांच्या–विशेषतः राजकन्येच्या–नजरेस आणण्यासाठीं, ते संगीतज्ञाकडे बारीक लक्ष ठेवून त्यांच्याप्रमाणें आपल्या मानांना झटके मारीत होते; आणि होला हो ठेवून देणें कांहीं त्यांना नवीन नव्हतें. होला हो ठोकून आपली आबादी कायम ठेवणारेच बहुतेक राजदरबारांत मान्यता पावलेले असतात !

पहांटेचा सुमार झाला, कृष्णपक्षांतील उशीराचा चंद्र बराच वर आला होता.

मुदतीला डोळे उघडे ठेवणें अशक्य होऊन गेलें.

दरबारीही डुलकी घेऊं लागले होते. राजकन्येचें अनुकरण करणें आपलें कर्तव्य आहे असें समजून काहीं ते पेंगत नव्हते, झोंप त्यांना आवरतच नव्हती.

दरबारी संगीतशास्त्री मात्र पहिल्या चिजेच्या शेवटीं होते, त्याहून शतपटीनें भिकाऱ्याच्या कलेचा आदर करावयास अधिक उत्सुक झालेले दिसत होते.

रसिकेला सुदतीनें जवळ बोलावून हळूच कांहीं सांगितलें.

रसिका भिकाऱ्याला म्हणाली, ‘ पुरे आतां; राजकुमारींना निद्रा आली आहे.’

‘ पुरे ? इतक्यांतच ? मला तर आतां कुठें थोडीशी गम्मत वाटूं लागली आहे. यापुढें तर उत्तर–रागिण्यांचा खरा बहार ! ’

‘ पण राजकुमारींना झोंप आली आहे ना ? ’

‘ तिला खुशाल झोंप काढूं दे कीं; मी कुठं नको म्हणतों आहें ? ते पहा खरेखुरे जाणते कलावंत माझं वादन बंद होणार म्हणून खट्टू झाले आहेत ! त्यांच्यासारख्या शास्त्र्यांपुढं परीक्षा देण्याची संधी मी नाहीं सोडणार.’ खणखणीत आवाजांत भिकाऱ्यानें उत्तर दिलें.

तें राजकन्येनें ऐकलें. आधींच भिकाऱ्यानें तिच्या थोरपणाला धक्का दिल्याचें शल्य तिच्या मनात सलत होतें; त्यांतच पुन्हां त्यानें तिला हेटाळलेलें पाहून तिची राजकीय वृत्ति, वारुळांत काठी घालून डंवचल्यानें फुंफाटून उठणाऱ्या नागिणीच्या त्वेषानें उसळून बाहेर आली.

‘ आम्हांला झाली इतकी करमणूक पुरी झाली. आपल्या वादन-कलेची परीक्षा द्यावयाची असेल, तर त्याला म्हणावें त्या त्या गवयांच्या नाहीं तर वादकांच्या घरीं जा. आमची संगीतशाळा ही आमच्या सुखा-साठीं आहे. वाटेल त्या भिकाऱ्याच्या लहरीसाठीं नाहीं; भिकारी तो भिकारी आणि वर मगरुरी ! रसिके, हीं मोहरांचीं ताटं त्याच्या पदरांत रितीं कर, आणि आणलास तसा त्याला वाड्याच्या बाहेर घालवून दे. ” अशी

रसिकेला आज्ञा देऊन मुदती झणकन्यानें आपल्या शयनमंदिरांत निघून गेली.

जीव-ज्योति निघून गेल्यावर मागें राहिलेल्या शरिराची जशी लौकरच विल्हेवाट लागते, त्याप्रमाणें राजकन्येच्या मागोमाग गाण्याची बैठकही चार सहा क्षणांत वाटेला लागली.

\+ + +

प्रासादाच्या उद्यानातून बाहेर पडण्याची वाट होती.

रसिका पुढें आणि तो भिकारी मागें, अशी तीं दोघें त्या मार्गावर पावलें टाकत होतीं. त्यांच्या गतीहून नुकताच सुरू झालेला पहांटेचा वारा अधिक वेगानें वहात होता. कृष्णपक्षाचा क्षय लागलेला क्षीणतेज चंद्रमा जसा कष्टानें आकाशांत चालतोसा दिसत होता, तीच गत त्यांची होती.

पुढेंच दिसत असलेल्या पद्मपुष्करणीला उजवें किंवा डावें घालून थोडेसें पुढें गेले, कीं भव्य राजद्वारांतून राजरस्त्यावर बाहेर पडावयाचें. भिकाऱ्याला मिळालेली रसिकेची सोबत संपवायची वेळ अगदीं थोडक्या-वर आली होती.

पुष्करणीला वळसा घालावयाच्या आधींच चार पावलें भिकारी थबकला,

"रसिकादेवी!" भिकाऱ्याच्या हाकेंत दुःखाचा कडवटपणा नसला, तरी, ती हांक अंतःकरणाच्या खोल तळांतून उमटलेली असल्यानें तिचा गंभीरपणा पहिल्या स्वरांतच जाणवण्यासारखा होता.

रसिका चमकली, थबकली आणि मागें वळली.

"झाला शेवट—" भिकारी बोलूं लागला.

"अगदीं ओंगळ झाला—" रसिका मध्येंच एकदम म्हणाली.

"मुळींच नाहीं." भिकाऱ्यानेंही घाई केली, "ओंगळ लोकांच्या सान्निध्यांत, विमल आणि पवित्र असेल, त्यालाही घाण लागायचीच!"

अमंगळपणाचा पुतळा दिसणाऱ्या त्या भिकाऱ्याचे उद्गार म्हणजे वेड्यानें साऱ्या जगाला वेडें म्हणण्यापैकींच होतें, असें एखाद्या साधारण माणसाला वाटलें असतें.

" मी तरी आपली कला फुकट मिळालेल्या संपत्तीच्या जोरावर उद्दाम बनलेल्या श्रीमंताच्या घाणेरड्या जागेंत कां उघडी करावी ?—हो, बरी आठवण झाली. रसिकादेवी, ही राजाघरच्या संपत्तीची घाण माझ्या पदरात कशाला ? ठेवा तुमच्याजवळ. "

" माझ्याजवळ ? कशाला ? मी दासी—माझ्याजवळ ही संपत्ति म्हणजे जिवावरचं संकट ! मला जगायचं आहे—आपल्यासारख्यांच्या कलेचा आस्वाद घेण्याची आज मिळाली तशी अमोलिक संधि केव्हां तरी मिळतेच मिळते, या आशेपायींच मला जगायचं आहे. " रसिकेच्या शेवटच्या वाक्यांत जिवाची ओढ आणि तळमळीचा तीव्रपणा पुरता भरून गेलेला होता. तो भिकाऱ्याच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं. तो क्षणभर स्तब्ध झाला; एकवार त्यानें रसिकेकडे निरखून पाहिलें. तिच्या डोळयांतून एक दोन अश्रुबिंदू टिबकले असावेत असा त्याला संशय आला.

" तुम्ही दासी ?—मला वाटलं होतं तुम्ही—"

" राजकन्येची सखी, ना ? खरं खरं बोलायचं, तर मी दासी; राणी पौर्णिमा तर मला दासीपदाहूनही हलक्या पदावर बसवायला सदोदित सिद्ध असतात. राजकन्येची मात्र धडपड असते मला आपल्या बरोबरीनें वागविण्याची. फार मोठ्या मनाच्या आहेत सुदतीदेवी. "

" आला आहे मला तिच्या मोठ्या मनाचा अनुभव ! " कठोरतेनें भिकारी म्हणाला, " मोहरांनीं माझ्या कलेचं मोल करूं पाहणारी, आपल्या झोपेसाठीं माझ्या स्फूर्तीला अटकाव करतांना मुळींच दिक्कत न बाळगणारी, रसिकांचा, विद्वानांचा हिरमोड होईल कीं काय, याचा आपल्या श्रीमंतीच्या ताठ्यांत क्षणमात्रही विचार न करणारी ही सुदती, तुम्हांला जी बरोबरीच्या नात्यानं वागवूं पाहते, याचं कारण तिला पक्कं माहित असावं कीं, तुम्ही तैलंगाधिपाच्या—"

" काय, काय !–कोण कोण ?" पुष्कळ दिवस राखून ठेवलेलें रहस्य सहजासहजीं व अकल्पित बाजूनें उघड झाल्याप्रमाणें रसिका गोंधळून म्हणाली.

तिचा गोंधळ पाहून भिकारी अगदीं गडगडून हंसला.

" बऱ्याच घाबरलेल्या दिसतां तुम्ही ! मला वाटतं तुमच्यांत जो जन्मजात आकर्षकपणा आहे, तोच सुदतीच्या प्रेमाचं कारण आहे. तुम्ही तिला आकर्षिलं आहे, त्यांत सुदतीला सुख वाटतं आहे, म्हणून, आपल्या जिवाच्या सुखी हौसेसाठीं ती तुमच्यावर प्रेम करते, आईचं मन मोडून तुम्हाला बरोबरीच्या नात्यान वागवूं पाहते आहे. न होऊन, लढाईच्या गर्दीत सापडलेल्या असहाय्य राजकन्येवर–नव्हे नव्हे–असहाय्य अबलेवर माणुसकीनं–भूतदयेनं ती प्रेम करते आहे असं मुळींच नव्हे !"

" काहीं कां असेना !–पण कुणी सांगितलं आपल्याला मी–मी राजकन्या आहें म्हणून ?–मी राजकन्या असते–तर–आपल्यासारख्या कलाधीमंताचा सन्मान करता येत नाहीं, म्हणून असे दुःखाश्रु गाळत कां बसलें असतें ?...महाराज, मी काहीं संगीतज्ञ नाहीं; पण— "

" जातिवंत रसिक आहांत तुम्ही रसिकादेवी ! किती छान आणि गोड बोललांत तुम्ही; कलेचा सन्मान ! पूजा !–पैशानं केलेलं कलेचं मोल नव्हे. रसिकादेवी, आज माझ्या कलेची खरी पूजा झाली ! बुद्धीला ज्ञानाचे संस्कार झाले नसतांही हृदयाला भारून टाकील, पुष्पकोमल-गंगानिर्मल स्त्रीहृदयाला गुंगवील तीच कला संपूर्णावस्थेला पोहोंचली आहे, असं मला वाटूं लागलं आहे. राजसभेच्या विद्वान संगीतज्ञांकडे कलेची परीक्षा देऊन त्याना स्तिमित करण्याची महत्त्वाकांक्षा काही वेळा, पूर्वी माझ्या मनांत धुमाकूळ घालीत होती, हा माझा मूर्खपणा कबूल करण्यांतच शहाणपणा आहे. तुमच्या स्वयंभू रसिक मनाला माझ्या कलेनं संतुष्ट केलं, तुम्ही माझ्या कलादेवीच्या गळयांत या अश्रूंची मोतीमाळ घालीत आहांत, झाली माझ्या कलेची खरीखुरी पूजा ! एका खऱ्या रसिकाच्या आनंदापुढं लाखों विद्वानांचीं मानपत्रं तुच्छ आहेत ! रसिकादेवी, या दिवसाची मी किती किती दिवस वाट पाहत होतों ! खरं रसिक

हृदय मला आढळणारच नाहीं, अशा निराशेनं खिन्न होऊन मी दिवस ढकलीत होतों.–रसिकादेवी, देव तरी मोठा चमत्कारिक आहे, नाहीं हो? आपल्या इच्छेला हव्यासाची तीव्रता वाटत असते, तेव्हां तो नक्की निराशा आपल्या पदरांत बांधतो; आणि आपल्याला कल्पना नसते, तेव्हां तो आपला इच्छित आनंद आपल्या ओंजळींत ओततो! बाकी, अनपेक्षित काळीं मिळालेल्या अपेक्षित आनंदाची थोरवी फक्त परमेश्वराच्या थोरविशींच उपमून पाहातां येईल, नाहीं रसिकादेवी?"

जो एकदां तो भिकारी बोलूं लागला, तो आलेल्या ओढ्याच्या लोंढ्यासारखा धडाधड पुढें वाहतच सुटला. प्रीतिदेवतेच्या सानिध्यांत भारती जड पडते म्हणतात, तें अनुभवशून्य लोकांचें काव्य असावें. प्रीतिदेवीच्या पुढे उभा राहिलेला भक्त एकसारखा बोलतच सुटतो, असेंच नेहमीं प्रत्ययाला येत असतें.

"मग कलावंताला अपेक्षा नसते म्हणतात, तें खोटं तर?"

"साफ खोटं! व्यवहारी जगात ज्या रूपानं अपेक्षा वावरत असते, तें रूप कलेला भेसुर आणि तिरस्करणीय वाटत असतं, इतकंच. आत्मानंदासाठीं कलावंत कलेच्या स्फूर्तिलहरींवर तरंगत असला तरी आपला तो कलाविहार पाहून, आपल्याइतकंच सानंद होणारं, आपल्या आनंदाशीं एकरूप, एकसूर होणारा उत्कट आनंद निर्माण करणारं एक हृदय एकसारखं आपल्याकडे ओढ घेत राहावं, अशी त्याला अपेक्षा असतेच असते. सागितलं ना, मीही अशाच एका समानधर्मी हृदयाच्या भेटीची आजवर वाट पाहत होतों म्हणून?"

रसिका कांहीं क्षण स्तब्ध होती. त्या अवधींत तो भिकारी एकदां आकाशांतील चंद्राकडे, अर्धोन्मीलित कमलकलिकांकडे, व रसिकेच्या मुद्रेकडे आलटून पालटून पाहत होता, आणि दृष्टि रसिकेवर लागली म्हणजे गालांतल्या गालांत हंसत होता. क्षीण चद्र, आणि लौकरच क्षीण होणाऱ्या कमलकलिका याहून वाढत्या कलेचा रसिकेचा मुखचंद्र, किंवा उत्तरोत्तर अधिकाधिक सजीव होत जाणारें तिचें वदनकमल केव्हांही श्रेष्ठच, अशी खात्री झाल्यानेंच तो सस्मित होत असावा.

" मग कलेलाही मोल आहे तर ? " हलकचे रसिका म्हणाली.

"अर्थात्; मात्र तें सोन्यारुप्याच्या नाण्यांनीं, किंवा दगडकोळशांच्या जातीच्याच हिऱ्यामाणकांनीं मापतां येत नाहीं. मघां या माझ्या समोरच्या नेत्ररूपी तरल तारकांनीं गालांवरच्या लालवट माणकांना झांकून टाकण्यासाठीं जी हिरकण्यांची वृष्टि केली, तीच खऱ्या जिवंत कलेची किंमत! त्या किमतीला गणायला साऱ्या पृथ्वीवर दुसरं साधनच नाहीं, असं मला वाटतं रसिकादेवी ! "

रसिकेनें चटकन् एकदां भिकाऱ्याकडे पाहिलें; पण तोहि आपल्याकडे पाहत असलेला बघून तिनें दुसरीकडे आपली दृष्टि वळविली, व ती पुनः क्षणभर स्तब्ध झाली.

" मग कलेकरतां कला, असं कायसं जें नेहमीं आपण कलावंत शास्त्रीपंडितांकडून ऐकतों तें काय ? " रसिकेनें प्रश्नाचा पिच्छाच पुरविला.

" मला वाटतं, रसिकादेवी, मी आतांपर्यंत जें बोललों त्यांत तुमच्या प्रश्नाचं उत्तर आहेच; स्पष्टच सांगू का ? कलेकरतां कला, इत्यादि सूत्रं अर्धवट कलावंतांनीं आपल्या असंतुष्ट मनाच्या तात्पुरत्या समाधानासाठीं तयार केलीं आहेत, अशी माझी खात्री आहे. अर्धवट गूढ, कल्पनेच्या वातावरणात उत्पन्न झालेलं, असं कांहींतरी ऐकलं, कीं अणूपरमाणूंत आत्म्याचा शोध करण्यांत फुकट आयुष्य घालविणारे वेदाभ्यासजड त्याचा काथ्याकूट करून, नव्या तत्त्वाचीं कवचं त्या गूढावर चढवितात. झाल, जें बहुतेक अगम्य असं दिसूं भासूं लागतं, तें सामान्यलोक मुकाट्यानं डोक्यावर चढवून घेतात, आणि जन्मभर–पिढ्यान् पिढ्या अबाधितपणें त्याचं ओझं वाहतात. अशाच पद्धतीनं कलेकरितां कला, कलेला जगांत कसलंच मोल नाहीं, या थांडगुळी तत्त्वांचा जन्म झाला आहे–लोक मुकाट्यानं कबूल करताहेत झालं!–करायचं आहे काय आपल्याला अशा अगडबंब गोष्टींशीं–रसिकादेवी !–" पुढें तो भिकारी एकदम गप्प झाला. त्याच्या हांकेच्या आवाजानें ओढ बसल्यानेंच कीं काय, रसिकेचे डोळे चटकन् भिकाऱ्याच्या मुद्रेकडे वळले, आणि मनांत येण्याच्या आधींच तिच्या तोंडांतून उद्गार बाहेर पडला, " का — य ? "

भिकाऱ्याची वाचा बंद झाली, गती चालू झाली.

" कांहीं आणखी बोलणार होतां तुम्ही ? मग तसंच मनांत ठेवून कां जातां ? " रसिका थोडीशी आडवी होऊन त्या भिकाऱ्याला म्हणाली.

" नका मला बोलायला लावूं रसिकादेवी. मनुष्याचं मन मोठं हव्यासी असतं; पण तो हव्यास मर्यादेंत ठेवणं शहाणपणाचं असतं. "

रसिका बाजूला झाली, तरी भिकाऱ्याचें पाऊल पुढें पडलें नाहीं.

त्यानें रसिकेवर आपली दृष्टि स्थिरावली, आणि म्हणाला "रसिके, आज तूं जी माझ्या कलेची पूजा केलीस, तीच नित्य माझ्या कलेला लाभावी, अशी मला महत्त्वाकांक्षा वाटूं लागली आहे–अस्थानीं आहे का माझी महत्त्वाकांक्षा ? "

रसिकेनें खालच्या नजरेनें नकारार्थी मान डोलावली.

" पण रसिके, तूं पाहतेच आहेस मी कसा भणंग भिकारी आहें; अशा भिकाऱ्याच्या मागं लागून तुझ्यासारखी राजकन्या—"

" कुणी सांगितलं मी राजकन्या आहें म्हणून ?–आणि असलें तरी आतां लढाईतून पकडून आणलेली मी एक दासी आहं ना ?–तुम्ही कलेच्या धनानं संपन्न आहांत; तुमच्या सपत्तीपुढं तुम्ही सृष्टीचं मोलही तुच्छ मानूं शकतां–आणि मी ?—"

" तूं रसिका–माझ्या कलासंपत्तीचं संरक्षण करणारी फुलासारखी कोमल आणि लोखंडासारखी कठीण असणारी पेटिका !–लाभेल का माझ्या कलेला ही मंजुषा ? "

" केवळ अशक्य ! आपल्या कलेची शक्ति कितीही प्रचंड असली, तरी पाशवी राजसत्तेला निरोध अगर विरोध करण्याचं सामर्थ्य तिच्यांत खात्रीनं नाहीं. राजसत्तेची मी बंदिवान आहें ! "

तोंड फिरवून रसिका स्फुंदूं लागली.

भिकाऱ्यानें तिला जवळ घेतली; आणि कांहीं काळापूर्वी ज्या कोमलतेनें त्याचा हात वाद्यावर फिरत होता त्याच कोमलतेनें त्यानें रसिकेचे अश्रु पुसले.

कांहीं क्षण तीं दोघें तशींच एकमेकांला बिलगून उभीं होतीं.

" खरं आहे तुझं म्हणणं रसिके. " रुद्ध स्वरानें भिकारी म्हणाला, " शारीरिक शक्तीनं मिळविलेल्या सत्तेपुढं कल्पनेच्या बुद्धीच्या शक्तीला कांहीं कांहीं वेळां मान वांकवावी लागते. "

खालीं मान घालून जडशा एकेका पावलानें भिकारी निघून गेला. त्याच्या सावलीची दृष्टिभेट होत होती, तोपर्यंत रसिका त्या दिशेनें पाहत होती. दैव एखाद्याच्या मागें हात धुवून लागलें म्हणजे त्याचें कांहीं चालूं देत नाहीं. भिकाऱ्याला शेवटचे एकदां डोळे भरून पाहावें म्हणून रसिका डोळे शिणवीत होती, तर अश्रूंनीं तिचे डोळे भरून वाहूं लागल्यानें तिची तीही इच्छा पुरी होऊं शकली नाहीं !

[ ६ ]

" ठरल्याप्रमाणें मी तुमच्या मुलीची काल रात्रींच परीक्षा केली. मोठेपणाच्या, राजेपणाच्या पापी कल्पनांनीं भारावून गेल्यानं पाषाण हृदयाची बनलेली तुमची कन्या सुदती, मी जन्माची सहचारिणी म्हणून पत्करावयाला तयार नाहीं. मला तुमच्या राज्याची हाव नाहीं; कारण सहज हस्तगत करता येण्याजोग्या गोष्टीची हाव कोण धरील ? तुमच्या राज्याला, पाशवी सत्तेला, तुमच्या कन्येला आणि स्वत: तुम्हाला तुच्छ मानून मी निघून जात आहें. जाण्यापूर्वीं आपल्याला भेटून जाणें योग्य, पण आपल्याला गृहस्थाची योग्यता देणें अयोग्य वाटल्यानें आपलें दुर्दर्शन मी टाळलें आहे. मी आततायीपणानें कांहीं तरी म्हणत नाहीं. युद्धांत विश्वासघातानें मिळविलेल्या विजयाबरोबर बलात्कारानें बंदिवान करून आणलेल्या तैलंगाधिपतीच्या–कन्येला–रसिकेला यःकश्चित् दासी-प्रमाणें वागविणाऱ्या प्राण्याला माणूस तरी मी कसें म्हणूं ? परमेश्वरानें निर्माण केलेल्या दोन माणसांपैकीं एकानें दुसऱ्याला पाशवी शक्तीच्या जोरावर दास करणें हें पाप; त्यांतून आपल्या लाडक्या कन्येहून सहस्रपट योग्यतेच्या राजकन्येला हीनतेच्या, अपमानाच्या चिखलांत सदोदित पायाच्या रेट्यानें चेंदून टाकणें हें अक्षम्य पाप. तें पाप, धीमंतराज, तूं केलें आहेस. त्याच्या क्षालनासाठीं, आज अस्तमानाच्या आंत आपलें

सिंहासन सोडलें पाहिजे आणि मुकाट्यानें आपल्या गर्विष्ठ आणि दांभिक कन्यापत्नीसह हिमालयाच्या वाटेला लागलें पाहिजे–नाहींच लागलास–तर मी तुला हिमालयाच्या वाटेलाहि जाऊं न देतां एकदम नरकाच्या वाटेवर ढकलून देईन. आपल्या सैन्याचा भरंवसा तूं धरूं नको—

–वल्लभराज "

हें पत्र पाहून राजा धीमंत संतापानें वेडा होण्याच्या बेताला आला. तितक्यांतच, तैलाधिप आपल्या प्रचंड सेनेसह राजधानीसन्निध आकाशांतून उतरल्याप्रमाणें अवतरल्याची वार्ता त्याला त्याच्या हेरांनीं सांगितली.

राजा धीमंतानें सैन्य जमा केलें; त्याच्या हाकेसरशीं तें जमा झालेंही. परंतु एकत्र होतांच त्यांनीं 'महाराजाधिराज वल्लभराज की जय' असा घोष करण्यास सुरवात केली. सैन्यानें शहराच्या साऱ्या वेशी एकदम उघडल्या, आणि बाहेर सज्ज असलेल्या तैलाधिपाच्या सैन्यांत तें पाहतां पाहतां एकरूप होऊन गेलें. एकत्रित झालेल्या सैन्याचा नेतेपणा वल्लभराजानें आपल्याकडे घेतला होता.

वल्लभराजानें आपली प्रतिज्ञा पुरी केली. त्या दिवशींचा सूर्य मावळण्याच्या आंत त्यानें श्रीकृष्णाच्या अलौकिकत्वानें धीमंत राजाचा वैभवसूर्य पूर्णपणें व कायमचा झांकून टाकला! तैलाधिपाच्या आग्रहाच्या विनंतीला मान देण्यासाठीं वल्लभानें धीमंताला देहांत शासन केलें नाहीं इतकेंच; सासऱ्याऐवजीं जांवयानेंच लग्नापूर्वीं सासऱ्याला विनंतीमान्यतेचा आहेर केला! राजे लोकांचे सारेच व्यवहार उलटे असतात, ते असे!

× × ×

त्याच पुष्करणीच्या बांधावर रसिका आणि वल्लभराज बसलीं होतीं–काल शुक्लपक्षाच्या उत्तरार्धाचा होता; माध्यान्ह रात्र उलटून गेली होती.

वल्लभराजानें आपलें वादन थांबविलें होतें. "पुरेना आतां? किती वेळ वाजवितों आहे सारखा; पण तुझं आपलं चालूच आहे, आणखी एक गत!–तुला पुरेसं वाटणार तरी कधीं?"

--कधींच नाहीं!" लाडिकपणानें हंसून रसिका म्हणाली, "इतकी चांदण्याची अमाप वृष्टि एकसारखी होती आहे, पण ती पुरेशी वाटते आहे का?"

"तुम्ही राजेलोक मोठे आशाळभूत असतां बघ, रसिके!"

"हट्! भिकाऱ्याशीं लग्न करणारी राजकन्या—इश्श्य दासीवर जिवाचं प्रेम करणारा हा कसला बाई राजपुत्र—पण गडे, आणखी एकच गत—अगदीं शेवटची अं—"

वल्लभराजानें मोठ्या हौसेनें सतार मांडीवर घेतली मात्र आणि त्याच क्षणाला रसिकेला काय स्फूर्ति झाली कुणास ठाऊक! तिनें वल्लभराजाच्या हातून सतार हिसकावून घेतली, आणि उसन्या तोऱ्यानें म्हणाली "अप्पल-पोटी कुठची! सारखी प्रहरभर पाहातें आहे, सारखी आपणच मांडीवर बसली आहे."

वल्लभराजाच्या उजव्या हातावर मान टेकून त्याच्या मुद्रेवर प्रेम-भरित नजर लावणाऱ्या रसिकेच्या नेत्रांत दोन चंद्र एकदम बिंबित झाले होते. एक आकाशींचा, आणि एक तिच्या वल्लभाचा मुखचंद्र!

"कलेचं असं मोल मिळवणारा भाग्याचा कलावन्त माझ्यासारखा मीच!" वल्लभराज स्नेहस्निग्ध नजर लावून म्हणाला.

त्याचें तोंड थोडें खालीं झालें—रसिकेचें थोडें वर आलें—तितक्या-तच एक ढग चंद्रापुढें आला—आणि सारेंच कांहीं अस्पष्टसें भासूं लागलें!

———

# १ ताऱ्याची ओवाळणी

रोज तो ८-३२ च्या गाडीनें आपल्या घरट्याची वाट धरीत असे. त्या दिवशींही त्याची तीच गाडी, त्याच स्टेशनवर पकडण्याचा विचार होता, त्या वाटेलाही तो झप झप पावलें टाकीत चालूं लागला होता.

तो दिवस म्हणजे शनिवार. वेळ रात्रीचे ८ वाजून गेलेले. स्टेशन ? कशाला पाहिजे नांव ? पाहिजेच तर समजा मुंबईतील बी. बी. चें ग्रॅंटरोड स्टेशन.

तो ? तो एक तरुण होता—जिच्या ऐन अमदानींत कचकून गर्जावेसें वाटतें, आणि वाटल्याप्रमाणें 'गर्जत' असतां जनाची अगर मनाची बिलकुल लाज वाटत नाहीं, अशा पंचविशीच्या सुमाराचा तो एक तरुण होता. गुणवंत होतें त्याचें नांव. गूण होते कीं नाहीं नांवाला शोभण्यासारखे मुलाच्या अंगांत, तें सांगायला मोठी पंचाईत पडली असती. परंतु शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं दिवसातून दहादां त्याचें नांव उच्चारून त्याला नांवें ठेवावींत, चाळींतील मुलीबाळींच्या समजूतदार आयांनीं याच्या नांवानें नेहमीं बोटें मोडावींत, असला गुणी बाळ होता तो गुणवंत ! अगदीं 'एकदम' नवजवान !

गुणवंतानें डावें मनगट वर उचललें, त्याला जरासा लटकदार झटका दिला, उजव्या हाताच्या मधल्या दोन बोटांनीं नाजुकपणानें डाव्या मनगटावरची कोटाची बाही हळूच थोडी वर सरकविल्यासारखी केली, आणि तिच्या खालीं लपलेल्या १"×$\frac{3}{4}$" या मापाच्या सोन्याच्या छेलछबेल्या घड्याळांत किती वाजले, तें रस्त्यावरच्या दिव्याच्या प्रकाशांत पाहिलें. त्याचें चालणें, चालतांना मधूनच एकदां डाव्या, एकदां उजव्या बाजूला कंबरेला थोडी मुरड मारून कांच्याच्या फलकाऱ्यावरून हात फिरविणें, या ढोबळ गोष्टींच्या देखाव्यानें आमचा नायक, बारशापासूनच एखाद्या नाटककंपनीच्या नायिकेच्या कामांची जबाबदारी सांभाळीत

असावा, असें वरवर पाहणाऱ्यालाही वाटलें असतें. आणि त्याचें ते घड्याळ पाहताना झालेले ' अजिठा स्टाईल 'चे अंगविक्षेप पाहून तर, या जन्मीं तर राहूंदेच, पण भक्तिभावानें बिनचूकपणें वटपौर्णिमेच्या दिवशीं वड पुजून सात जन्म एकच्या एक नवऱ्याची परमेश्वराच्या पेढी· वर कायमची चलती हुंडी मिळविणाऱ्या ' आर्य ' पतिव्रतेच्या पुण्याईनें आमच्या गुणवंताला गेले सात, व येणारे सात जन्म अभेद्य स्त्रीपार्टीपणा मिळाला असावा, अशी कोणाचीही खात्री पटलीच असती !

गुणवंताच्या झनान्दार घड्याळानें ८।१५ ची वेळ दाखविली. त्याची गाडी स्टेशनांत यावयास तब्बल सत्रा मिनिटांचा अवधी होता. साहजीकच त्याला स्टेशन गांठण्याची घाई करण्याचें कारण नव्हतें. स्टेशन दृष्टीच्याच नव्हे, तर धावपळीच्या पांचपन्नास पावलांच्या आटोक्यात होतें. तरी पण घड्याळ पाहून पुनः झोकदार झटक्यानें कोटाची बाही पुढे ओढल्यावर गुणवंतानें आपली संथ चाल, चटकीमटकीच्या दुडकाईची केली. मिळतील तेवढीं मिनिटें कामीं लावून, सर्व प्लॅटफॉर्मच्या ' स्काऊटिंग ' नंतर कोणत्या डब्यांत चढावयाचें, 'कोणा'च्या मागून खेटून चढावयाचें, तें ठरवून ठेवण्याचा त्याचा नित्याचा परिपाठ होता. त्याला खंड पडू नये, म्हणून गुणवंतानें आपल्या चालीला उडत पगड्याची दुडकी गती दिली होती.

गुणवंतानें आपल्या चवड्या चालीची पांचसांत पावलें टाकलीं असतील नसतील, इतक्यांत डाव्या हाताच्या एका लहानशा रस्त्यानें ' कोणी ' तरी एक माणूस येऊन तो जात असलेल्या रस्त्याला मिळालें. पावलांना शक्य नसलें, तरी मानेला त्या दिशेनें वळणें अगदीं शक्य व सोपें असल्यानें गुणवंताची मान त्या बाजूला वळली. इतकेंच नव्हे, देंठाला नख लावल्यानें एका बाजूवर लटकें पडणाऱ्या फुलाप्रमाणें त्याची वळली मान डाव्या खाद्यावर लटकली, त्यावेळची गुणवंताची एकंदर ढब पाहून हिंदी नृत्यकलेचें कार्टून काढणाऱ्या उदयशंकरनें त्याला खात्रीनें आपला शिष्यवर बनविला असता. सुरवातीचा गाजावजा करून चाकांच्या एकदोन फेऱ्यांतच पूर्वचालीवर येणाऱ्या अवसानघातकी मोटारप्रमाणें गुणवंताच्या पायांची धडपडही थंडावत चालली.

तें माणूस म्हणजे एक वीस एकवीस वर्षांची तरुणी होती. समजलें ना आतां गुणवंताच्या पायाचा भोंवरा कां मंदावला तें ?

तिला आपल्या साहाय्याची केव्हां गरज लागेल त्याचा कांहीं नियम नाहीं असें गुणवंताला वाटलें. कारण ती तरुणी कसल्या तरी संकटाच्या कल्पनेनें त्रस्त झाल्यासारखी दिसत होती; लांडग्याच्या वासाच्या भासानें संत्रस्त झालेल्या हरिणीच्या डोळ्यांतील भिरभिरती नजर त्या तरुणीच्या डोळ्यांत उभी आहे असें गुणवंताला वाटलें. मुंबईच्या रस्त्यावरील दिव्याचा लखलखाट झाला म्हणून काय झालें ? खालीं मान घालून चार आठ हाताच्या अंतरानें झपझप चालणाऱ्या एखाद्या स्त्रीच्या नजरेतला इतका बारकावा सहज कोणाच्या पहाण्यांत येणें शक्य नव्हतें. परंतु, सदोदित कल्पनेच्या पखांना धरून सत्यसृष्टीला दूर दूर लोटून अंतराळांत लोंबणाऱ्या आमच्या नवजवान गुणवंताला त्या स्त्रीच्या डोळ्यांत कसलें पाणी सांचत चाललें होतें, तें समजणें फारसें कठीण नव्हतें. सारी स्त्री जात आपल्या ‘ अनाघ्रात ’ प्रेमासाठीं वळवळते आहे, अशा कैफांत गुंग असणारा प्रत्येक नवजवान, स्वतःला, नजरेवर तरंगणाऱ्या पाण्याच्या परीक्षेनें स्त्री-हृदयाचा तळठाव काढणारा कसबी पाणबुड्या समजतोच समजतो. तशातच गुणवंताला त्या स्त्रीच्या डोळ्याचें धावतें दर्शन घडलें होतें. अंतरानें पण जोडीनें कोण चाललें आहे, तें निरखण्यासाठीं तिनें साहजीकपणें गुणवंताकडे ओझरतें पाहिलें होतें.

ती गुणवंतावरून आपले डोळे काढते तोंच तिला दुसऱ्या बाजूला पाहणें भागच पडलें.

ती ज्या उपपथानें आली होती, त्याच रस्त्यानें अंदाजें गुणवंताच्या उमरीचा एक तरुण पुढें येऊन त्या स्त्रीच्या मागून चालू लागला.

तिनें त्याच्याकडे पाहिलें मात्र, आणि तिनें लागलीच आपली चाल झपाझपीची केली.

एकदां गुणवंताकडे पहावें, एकदां त्या पाटलाग करणाऱ्या दुसऱ्या तरुणाकडे पहावें, असें करीत करीत तिनें स्टेशन गांठलेंच.

गुणवंताला तिचा कदम साधणें केवळ अशक्य झालें होतें. भराभर कसें चालावयाचें तें त्याला माहित होतें; कॉलेजमधें असतांना त्यानें कितीदां तरी जलद–चालीच्या Fast walking शर्यती–जिंकल्या नव्हत्या–लक्ष लावून पाहिल्या होत्या. गाडी गांठण्यासाठीं तोही केव्हां झपांझपीनें चालत असे. पण जलद जलद चाल म्हणजे किती, तिला तरी कांहीं सीमा आहेच कीं नाहीं ? तरी पण डावा हात काळजावर दाबून धरून तो जवळ जवळ, त्याच्या मतें, धांवतच स्टेशनाकडे त्या स्त्रीमागून जाऊं लागला.

तिनें जातां जातां एकदां त्या पाठलाग्याकडे, व एकदां आपल्याकडे पाहिलें. त्याचा अर्थ " अहो, तो पहा सभ्य पोषाखी मवाली माझी पाठ घेतो आहे, त्याच्यापासून माझें रक्षण करा " असाच असला पाहिजे, असें गुणवंताला खात्रीपूर्वक वाटलें, आणि त्यानें काळीज मुठींत धरून, संकटग्रस्त स्त्रीची पाठराखण करण्याच्या उदात्त हेतूनें तिचा पाठलाग करावयास सुरवात केली.

कॉलेजच्या ऐसपैस अभ्यासक्रमांत, शेवाळ्यांत अडकलेल्या बेडकाप्रमाणें धडपडत असतां, ' संकटांत सांपडलेल्या स्त्रीची मुकी हांक म्हणजे प्रीतिविवाहाच्या मंडपांत वाजणाऱ्या चौघड्यावर पडलेली टूमच होय ' असें कांहीं तरी, केव्हां तरी वाचलेलें गुणवंताला नेमकें तेव्हा आठवलें. सभ्य दिसणाऱ्या मवाल्यानें हुसकाविलेल्या स्त्रीची आपल्यावर पडलेली कावरी बावरी दृष्टि म्हणजे आपल्या पुरुषी पराक्रमाला तिनें दिलेली निःशब्द हांकच, असें वाटून, भावी प्रीतिविवाहाचीं अस्पष्ट चित्रें पहात पहात गुणवंतानेंही स्टेशन गांठलें.

त्या पाठलाग्यानेंही त्या दोघांच्या पाठोपाठ स्टेशनांत प्रवेश केला.

(२)

उभ्या जन्मांत कधीं गुणवंतानें इतकी झपाट्याची धांदल धडपड केली नव्हती. किती त्याचें काळीज उड्या मारूं लागलें होतें ! जसें कांहीं, उड्या मारमारून, घशाच्या वाटेनें तें त्याच्या तोंडांतून बाहेरच पडूं पहात होतें ! ' धडधडणाऱ्या काळजास ' अशी एखादी कविता करा-

वयाचीच असेंही पण तेवढ्या गडबडींत गुणवंताच्या डोक्यांत झकमकून गेलें. प्रेमाच्या तडाख्याचा पहिला सपाटा आपल्या हृदयानें खाल्लाच खाल्ला, असें गुणवंताला वाटलें. कारण होतें त्याची तशी कल्पना व्हायला. स्टेशनाच्या कमानींत तो शिरला तेव्हां त्याला सारें कांहीं अंधुक अंधुक दिसूं लागलें होतें. डाव्या हाताचा अंगठा व मधलें बोट यांच्या बेंच-कणींत पकडून त्यानें आपला चष्मा नाजूक साजूक लकबीनें कानशिलां-वरून उपसला, साफ केला, डोळे चोळले, आणि पुनः चष्मा लावला, तरी त्याला कांहीं स्पष्टसें दिसेना. प्रेमानें नजरबंदी करून, विश्वविख्यात असा आपल्या कारखान्यांतील पेटंट आंधळेपणा मदनराजानें आपल्या डोळ्यांत घातला, असें गुणवंताला वाटलें.

जिच्यापायीं तो आंधळेपणा झाला होता, जिच्यामागें धांवतां धांवतां काळीज उड्या मारूं लागलें होतें, ती प्रीतिलता कोठें गुणवंताला दिसेना. त्या शकुंतलेच्या मागें लागलेला, वरून पुरता सभ्य दिसणारा तो भुंगा मात्र तिकीटाच्या खिडकीपाशीं घुटमळत असावासें त्याला भासलें. ‘ लगबगीनें तिकीट काढून तिनें प्लॅटफॉर्म गाठला असला पाहिजे खास ’ असा तर्क करणें कांहीं अवघड काम नव्हते.

‘ बस्स तिकीट ! आधीं तिकीट–थेट गाडी थांबणार त्या स्टेशनचें एकदम तिकीट. रोजच्या पासाच्या पंचायतींत पडलों, तर पुढें मागें त्या युवतीबरोबर गाडी सोडतां यायची नाहीं ’ असें वाटल्यानें गुणवंताचे पाय तिकीटाच्या खिडकीकडे वळले.

एक दृष्टि, एक लक्ष्य ! ती आणि तिकिट. त्याक्षणीं त्याला दुसरें तिसरें कांहीं दिसत नव्हतें, कीं सुचत नव्हतें.

घुसला गुणवंत तिकीटखिडकीच्या लांकडी चक्रव्यूहांत.

छेः ! लागला त्याचा धक्का कोणाच्या तरी गुबगुबीत अंगाला !

तीच होती तिकीटाच्या खिडकींत हात घालून पैसे घेत. तिच्याच मांसल शरीराला गुणवंताचा नाजूक धक्का लागला होता.

आंवळलेली स्प्रिंग एकदम सुटावी तसें कांहीं तरी गुणवंताच्या डोक्यांत खरखरलें, सरसरलें, आणि सारेंच कांहीं तरी एकाएकीं गरगरलें ! त्याची मंदावलेली दृष्टी एकदम साफ झाली.

"I am sorry हं !" असें गुणवंत म्हणतो न म्हणतो तोंच आगगाडीचा एखादा आठचाकी डबा छोट्या डब्यावर आदळावा, तसा कोणी तरी दांडगेश्वर मागून त्याच्यावर आदळला.

त्या स्त्रीच्या मागें लागलेल्या दांडगेश्वरानें गुणवंताला धक्का दिला आणि तो पुढें सटकला.

कसला आडदांड होता तो ! 'दांडपट्टा' हें पुस्तक वाचून त्यानें तें शरीर कमावलें नव्हते. एकेकाळीं म्हणजे फक्त एकाच वर्षापूर्वी रोज सांजसकाळ हजार बैठका, पाचशें जोर काढणारा मुंबई बाहेरचा बाप्या होता तो. त्याचा सहज धक्काहि गुणवंतासारख्या मुंबईतील इराणी–दुकान–बाळाला प्राणांतिक संकटाचा वाटावा यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

त्या दीड मर्दांच्या [ म्हणजे तो दांडगेश्वर सबंध एक मरद आणि राहिलेला आमचा गुणवंत अर्धा मरद, अशी दीड मर्दांची जोडगण समजावी ] धकाधकीकडे विशेषतः त्या दांडगेश्वराकडे एक तीव्र कटाक्ष फेंकून ती स्त्री झटकन् फाटकाकडे वळली, आणि प्लॅटफॉर्मवर निघून गेली.

'बरं बाबा तुझेच खरें' अशा समेटी बाण्यानें गुणवंतानें त्या दांडगेश्वराला पुढें जाऊं दिलें. एकदा त्याला वाटलें, आपणही दीड एक क्षणाची वडीलकी शाबीत करण्यासाठीं त्या दांडग्याशीं थोडीशी ढकला-ढकली करावी. पण तेव्हांच आठवलें कीं, आज कित्येक वर्षे आपल्या कपाटांत मोर्लेचें कॉम्प्रोमाईज हें पुस्तक आहे. 'वाचलेलें असो वा नसो, पण मोर्लेसारख्या विद्वानाच्या तसल्या जगत्कीर्तीचा ग्रंथराज कपाटांत बाळगणाऱ्या बी. ए. ऑनर्सला धकाधकी केव्हांही शोभून दिसणार नाहीं;' असा विचार करूनच गुणवंताने त्या आडदांडाला पुढें जाऊं दिलें.

[ ३ ]

पाहता पाहतां गुणवंताला आपलें प्रीति-लक्ष्य प्लॅट–फॉर्मवरच्या थेट दिव्याखालीं उभें असलेलें दिसलें.

किती ठळक होती ती सुंदरी ! नाजूक–पण रसरशीत आणि सणसणीत ! पुण्यामुंबईच्या म्हणजे नव्याजुन्या जमान्यांच्या पोषाखी पद्धतींच्या संमिश्रणानें साधलेल्या तिच्या साध्या पोषाखांत म्हणावी तशी जरी

आकर्षकता नसली, तरी मुद्रेवरची किंचित् मर्दाई झिलई, डोळ्यांतील बेपर्वाईची झकमक, हालचालीचा, हावभावांचा, बिभ्रमांचा ठळकपणा यांच्यामुळें ती तरुणी प्लॅटफार्मवर बऱ्याच दाटशा गर्दीतही उठून दिसत होती.

तो दांडगा मवाली तर तिला जवळजवळ खेटूनच उभा राहून पहात होता.

' काय पाजी माणसें असतात या जगांत ! पोषाख आणि मुद्रा पाहिली, तर हा माणूस एका असहाय स्त्रीचा पाठलाग करून तिला व मलाही सळो कीं पळो करून सोडणारा, तुरुंगांत असायलाच योग्य असा एखादा मवाली असेल, असें कोणाला तरी वाटेल का ? छे: हा पाजी माणूस खात्रीनें आज या बापडीवर कांहीं तरी गंडांतर आणणार ! मी–मी–हा गुणवंत जिवात जीव धरून असता, काय करणार आहे तो पाजी माणूस ? पुण्याचा दाडगावा कायदेबाज मुंबईत चालूं देणार नाहीं. मी–या गोष्टीचा पिच्छा पुरवून, माझ्या प्रीतिदेवतेला या दानवाच्या कचाट्यांतून सोडवून, आजपर्यंत आशाळलेली प्रीतिविवाहाची हौस मी फेडून घेणार–नव्हे मला तसें करण्यावाचून दुसरी गतीच उरली नाहीं ! ' असें गुणवंताला वाटलें.

तो त्या स्त्रीच्या रोखानें जाऊं लागला.

तो सभ्य–मवाली लघळपणानं तिच्याशीं कांहीं तरी बोलण्याचा प्रयत्न करीत असलेला गुणवंताला दिसला.

रागाची परमावधी झाली म्हणजे मुठी दाबून धराव्या लागत असल्या पाहिजेत, असें पूर्वी कित्येकदां गुणवंताला वाटलें होतें. त्याला त्या मवाल्याचा राग आला–तेव्हां त्या तत्वाप्रमाणें त्यानें आपल्या मुठी दाबून धरल्या.

गुणवंत आपल्या मानीव प्रीतिदेवतेच्या जवळ जाऊन उभा राहिला.

तिनें गुणवंताकडे पाहिलें. थोडें औत्सुक्य व बराचसा तिरस्कार होता तिच्या पाहण्यांत; पण त्या तितक्या बारक्या छटा गुणवंताच्या नजरेंत येऊंच शकल्या नाहींत. प्रेमानें आंधळा झाला होता ना तो ?

" तारे !–" मवाल्यानें हळूंच हांक मारली.

गुणवंताला तिचें नांवही समजलें. तारा ! अहाहा ! आपल्या प्रकाशानें हृदयाच्या तारावर झंकार उठविणारा प्रीतीचा ध्रुवतारा ! भलभलत्या उपमा अलंकारांचा गप्पा गोंधळ उडाला त्याच्या डोक्यांत.

"–माझं पुरतं ऐकून तरी घेशील कीं नाहीं–" मवाली म्हणाला.

तारेनें त्या मवाल्याकडे रोखून पाहिलें. डोळे कसले ते ! कृष्णाकांठच्या पोसलेल्या काळया रानातील बाभळीच्या गांठीच्या दोन तुकड्याचे धगधगलेले लालबुंद निखारेच होते ते. पाहतां पाहतां तिनें फणकाऱ्यानें मानेला झटका दिला, पलटणी शिपायाच्या तडखाफडकीनें राईट टर्न करून ती प्लॅटफॉर्मच्या दुसऱ्या टोकाला जाऊन उभी राहिली.

गुणवंताला वाटलें आपलाच जय झाला. तिची आणि त्याची पूर्वीची ओळख असली तरी ती आपल्यादेखत दाखवावयास तयार नाहीं, याचा अर्थच असा कीं, आपल्यापुढें ती त्याला कस्पटासमान लेखते.

गुणवंत त्या मवाल्याकडे पाहून हेटाळणीनें हंसला.

मवाल्यानें अशा कांहीं संतापी नजरेनें पाहिलें कीं, तारेच्या मागें असणें हें आपलें कर्तव्य बजावण्यासाठीं गुणवंत तत्क्षणींच तारा जेथें उभी राहिली होती तिकडे जावयास निघाला.

\+ \+ \+

८।३२ ची गाडी आली, थोडी थाबली, आणि गेली.

गाडी उभी असतांनाच तारा समोरच्या डब्याच्या गर्दीत घुसली, पण तशीच दुसऱ्या बाजूनें बाहेर पडून बायकांच्या वेटिंगरूममध्यें घुसली.

गुणवंत तिची ती करामत पहात होता.

तोही गाडींत चढला नाहीं.

८–३२ ची गाडी निघून गेल्यावर प्लॅटफॉर्मवर गर्दी जवळ जवळ नाहींशी झाली होती. गुणवंताला कांहीं तो मवाली मागें राहिलेला दिसला नाहीं. 'भला फसला बेटा' गुणवंताला वाटलें. पण आपल्या प्रीतिदेवतेला संकटांतून सोडवून तिचें 'झटपट प्रेम' संपादण्याची संधि दुरावली हेंही त्याबरोबरच लक्षांत आल्यानें तो जरासा खट्टू झाला.

‘ काय नियम सांगावा ? मवाली तो; शिवाय माझ्या तारेची थोडीशी माहितीही दिसते आहे त्याला. ती कोठें जाणार आहे, त्याचा त्याला अंदाज असणें अगदीं शक्य आहे. पुढें जाऊन आपण फसलों, हे जेव्हां त्याच्या लक्षांत येईल, तेव्हां तो भारी चिडून जाईल, आणि सूडापायीं गळा दाबून तिचा जीवसुद्धां घेईल तो ! मरणार ! माझी तारा मरणार ! नकोच तो विचार !–पण समजा ती मेली, तर मी काय करायचं ? लग्नाआधीं प्रीतीश्वराने अभंग समाधी घेतल्यानें स्वयंस्फूर्तीनें वैधव्य पत्करून कुंकू पुसणाऱ्या एका ‘ आर्य ’ स्त्रीचें उदाहरण गुणवंताला आठवलं. “ बस्स मीही बिन् लग्नाचा विधूर होईन तारेला त्या मवाल्यानें ठार केली तर. केंस काढून त्याजागीं सनातनी गोपद्मी घेरा ठेवीन, आणि आजन्म कपाळाला गंध लावून बिन्‌दिक्कतपणें फिरेन या भयाण जगांत.–नको, नकोच तो विचार ! मी माझ्या तारेच्या केंसालाही धक्का लावूं देणार नाहीं त्या मवाल्याला.”

लेडीज वेटिंगरूमच्या पुढेंच शतपावली करीत असतां, वेटिंगरूमच्या दाराकडे सारखी नजर लावून गुणवंत वरीलप्रमाणें विचार करीत होता.

\+ \+ \+

८।५० ची गाडी आली.

तारा वेटिंगरूममधून तडक निघाली ती समोरच्या सेकंड क्लासच्या डब्यांत शिरली.

गुणवंतानेंही तसेंच केलें, हें सांगायला का हवें ?

गाडी चालू झाली.

गुणवंत तिच्या समोरच्या बांकावर रेलून बसला; बसला न बसला तोंच विजेचा धक्का बसल्याप्रमाणें तो तटकन् उठला आणि देतां येतील तितक्या अजिंठा फॅशनच्या कमानी शरीराला देऊन, त्यानें हळुवार हातानें विजेचा पंखा सुरू केला.

तारा गुणवंताकडे पाहून हंसली.

साक्षात् कृतज्ञताच तिच्या मदनबाणी ओंठावर स्मिताच्या रूपानें नाचत होती तेव्हां !

तिच्या स्मिताला गुणवंतानें स्मितानेंच उत्तर दिलें.

"Thank You !" तारा म्हणाली.

"थँक्स कशाला ? मलाही उकडतंच आहे कीं ! ओफ् ! बॉम्बे आणि आक्टोबर ! fire and brimstone ! शेक्सपीअरनें ऑथेल्लोंत म्हटलं आहे त्याची, अगदीं त्याची आठवण होते घडी घडी या दिवसांत ! नाहीं ?" गुणवंतानें शेवटचा 'नाहीं' हा शब्द असा काहीं लडिवाळपणें उच्चारला कीं, शंभर बालगंधर्वांच्या तांड्याला शंभर जन्माच्या अभ्यासानें कांहीं तसा उच्चारतां येणार नाहीं.

" नाहीं तर काय ? नको मेला जीव असं होऊन जातं !" तारेनें उत्तर दिलें.

थोडा वेळ दोघेंहि गप्प होतीं.

" या बाकावर बसावं हवं तर, पंख्याच्या वाऱ्यापेक्षां खिडकींतून येणाऱ्या वाऱ्यानंच खरं समाधान वाटतं, नाहीं ? "

तारेनें गुणवंताच्या ' नाहीं 'च्या लाडाव्याची नक्कल करण्याचा प्रयत्न करून पाहिला; पण स्त्री असनहि तिला सपशेल अपयश आलें.

आपल्या शेजारीं बसण्याची सूचना तारेनें केलेली ऐकून गुणवंताला वाटलें, पहिल्या सुरुंगांत किल्ला पडला ! 'कोणता बरें सुरुंग लागू पडला असावा ! विजेच्या पंख्याचा का शेक्सपीयरचा ?' गुणवंत विचारांत पडला. 'कोणाच्या कां पुण्याईनें ताराखपीं प्रीति-देवतेचा कौल मिळालेला असेना; विजेच्या पंख्यानें काम केलें असेल तर थँक्स ह्या यंत्राच्या शोधकाला ! शेक्सपीअरच्या चार शब्दांनीं इम्प्रेशन पाडलें असेल, तर आमच्या वेळीं बी. ए. च्या परिक्षेला ऑथेल्लो नाटक नेमणाऱ्या बॉम्बे युनिव्हर्सिटीला शतशः धन्यवाद असोत !' गुणवंतानें आपल्या घोंटाळल्या मनाचें असें समाधान केलें.

"कुठंवर जायचं ?" जवळ बसल्यावर गुणवंतानें विचारलें.

"मालाडला जायचंय मला." तारेनें सांगितलें.

"अस्सं ! वंडर बुवा !" गुणवंतानें शक्य तितका आश्चर्यचकित चेहरा करून म्हटलें.

" कां ! वंडर कसं " तारेच्या शब्दांतही थोडेसें आश्चर्य भासत होतेंच.

" तसं कांहीं नाहीं, मलाहि मालाडलाच जायचं आहे म्हणून आपली योगायोगाची गंमत वाटली झालं. "

" होका ऽ! काय बाई तरी गंमत ! "

" बरं झालं बुवा ! " समाधानी आनंदानें गुणवंतानें म्हटलें.

" तें कसं ? " तारेनें विचारलें.

" नाहीं. आपलं सोबतीच्या दृष्टीनं म्हटलं मी. "

" कुणाची ? माझी का आपल्याला सोबत हवी आहे ? " असें थोडेसें कुचेष्टेच्या स्वरानें विचारून ताराबाई पुष्कळच मोठ्यानें हंसली.

पाण्यांत पडलेल्या ढेकळाचें अंग कसें विरघळत असेल, याचा अनुभव गुणवंताला तात्काळ आला. सारवासारव करून आपली बाजू सांवरून धरण्याच्या इराद्यानें तो म्हणाला, " तुमची सोबत नको कांहीं मला. माझी तुम्हाला होइल, याची धन्यता वाटली मला. "

" मला सोबत ? कुणी सांगितलं तुम्हाला मला सोबत हवी म्हणून ? मुंबईची मुलगी नव्हे मी ! सांगलींत जन्मलें, कोल्हापुरांत वाढलें, आणि पुण्याला राहिलें अशी आहे बरं का मी ! "

गुणवंताला वाटलं, धोक्याची सांखळी ओढून गाडी थांबवावी, धांवत जाऊन इंजिनापुढें रुळावर आडवें पडावें, आणि डायव्हरला सांगावें ' हं चलनादेव एकदम गाडी. '

मालाड येईतों कोणीही अक्षर बोललें नाहीं.

[ ४ ]

तारा आणि गुणवंत मालाड स्टेशनच्या बाहेर पडलीं. मुंबईच्या झगझगाटापुढें मालाडच्या रस्त्यावरचा प्रकाश म्हणजे केशवसुतांच्या एखाद्या कवितेपुढें रेव्हरंड टिळकांच्या साऱ्या कवितांचा संग्रहच जसा कांहीं !

बराच वेळ तारा आणि गुणवंताला रस्त्यावर कांहीं दिसेचना.

दोघेंही जोडीनें बरीच वाट चालून, बाजारपेठेचा रस्ता मागें टाकून, मुंबईरस्त्याला लागलीं. रस्त्याकडेची वस्ती तुरळक होऊं लागली, ती जोडी पायपीट करीतच होती.

'चार दिवसांनीं दिवाळी!' गुणवंताला वाटूं लागलें, 'यंदाची दिवाळी मागच्या कित्येक दिवाळ्यांप्रमाणें अशा अंधारांतच जाणार! परंतु, पुढच्या वर्षाची दिवाळी! अहाहा! माझ्या शेजारून चालणाऱ्या या अस्मान ताऱ्याच्या दिव्य प्रकाशाच्या झगझगाटांत घालवीन मी! पुढच्या वर्षीच्या दिवाळी पाडव्याला भल्या पहाटेस जेव्हां ही माझी तारा मला बिछान्यांतच ओवाळायला येईल, तेव्हां तिच्या हातांतील तबकांतलीं निर्जीव आणि चांदीचीं निरांजनें मी तिला दूर ठेवायला भाग पाडीन, दोन्ही हातांनीं तिचें तोंड धरीन, चुकवाचुकव करील ती खात्रीनें; आयतीच तिच्या चेहऱ्याची वरखालीं आजूबाजूला फिरवाफिरव होईल, आणि मला जिवंतशा तिच्या डोळ्याच्या तेजस्वी ताऱ्यांची ओवाळणी लाभेल!—

आणखी किती तरी दूरवर गुणवंत वहात गेला असता, परंतु तवढ्यांतच उजव्या हाताच्या बंगल्याच्या फाटकांत उभी असलेल्या व्यक्तीनें कठोरपणानें हांक दिली "तारे—"

तारा थबकली.

स्टेशनवर आपल्या प्रियतमेभोंवतीं दुष्ट हेतूनें घोंटाळणाऱ्या मवाल्याचाच तो आवाज आहे, असें गुणवंताला वाटलें.

मवाली पुढे येऊन तारेला आडवा झाला.

"तारे, मी तुला पुढं जाऊं देणार नाहीं." तो मवाली गुरगुरला.

"मी जाणार!" तारा एकदम संतापून म्हणाली.

"पाहतोंच कशी जातेस ती!" मवाल्यानें धमकावलें.

"काय करणार तुम्ही?" कडाडून तारेनें विचारलें.

"काय करणार? असा हात धरून तुला बंगल्यांत ओढून नेणार!" असें म्हणून त्यानें तारेचा हात खरोखरींच धरला!

" सोडा हं माझा हात—पहा—बरं—" तारा अंतर्यामीं खचत चालली असावी, असें तिच्या आवाजावरून गुणवंताला वाटलें.

प्रीतिदेवतेला व्हिलनरूपी दानवाच्या हांतून सोडविण्याची हीच ती वांछित संधी, असें वाटून, गुणवंत त्याच्याकडून करवेल तितका चिरका आवाज काढून म्हणाला, " म्हणजे ही काय मोगलाई आहे कीं काय ?"

" अहो मिस्टर, तुम्हाला नाहीं कळायची आमची भानगड—आणि तुम्ही कां पडतां नसत्या पंचायतींत ? लागा आपल्या वाटेला. "

" कसली तुमची भानगड ! तुमच्यासारख्या मवाल्यांच्या साऱ्या भानगडी मी ओळखून आहें—सोडा मुकाट्यानें त्याचा हात—" असें दरडावून आपली असली नसली शक्ती एकवटून गुणवंतानें त्या माणसाला एक धक्का दिला.

गुणवंताच्या धक्क्यानें तो इसम तिळाइतकाही मागे हटला नाहीं. पण गंडस्थळावर बसलेल्या माशीला मारण्यासाठीं त्रासलेल्या गजराजानें आपल्या कानांच्या हलक्याशा फटकाऱ्यानें तिला जमीन दाखवावी, त्याप्रमाणें ताराबाईचा हात धरणाऱ्या इसमानें आपल्या डाव्या हातानें जेव्हां दूर लोटलें तेव्हां गुणवंत कोलमडतच रस्त्याच्या कडेला जाऊन पडला.

" पोलीस !!! " गुणवंत ओरडत ओरडत उठला आणि त्या माणसावर चालून गेला.

गुणवंताची मान दुसऱ्या हातानें पकडून, त्याला हाताच्या अंतरावर दाबून धरून तो गृहस्थ म्हणाला " भल्या गृहस्था, तूं कितीही कंठशोष केलास तरी या वेळीं या रस्त्याला तुझा कुंकवाचा धनी जो पोलीस तो येऊं शकणार नाहीं आणि आलाच तरी हिचा हा हात माझ्या हांतून त्याला हिसकावून घेतां येणार नाहीं. "

" म्हणजे काय ? हें काय संस्थानी स्वराज्य आहे कीं काय ?" गुणवंतानें दम छाटून विचारलें.

तारा त्याच्याकडे पाहून हंसली.

" म्हणजे काय ?—परंतु तुला, मी सांगणार नाहीं. "

" अरे मवाल्या, माझ्या प्रीतिदेवतेच्या रक्षणासाठीं आकाशपाताळ एक करीन, मी ब्रिटिश प्रजाजन आहे, साऱ्या ब्रिटिश साम्राज्याची सत्ता माझ्या रक्षणाला सज्ज आहे ! "

" ब्रिटिश सत्ता माणसांच्या रक्षणासाठीं आहे. दिसेल त्या स्त्रीला आपली समजून पाजीपणा करीत हिंडणाऱ्या मानवी पशूंच्यासाठीं तिनें आपल्या हातीं चाबूकच धरला हें लक्षांत ठेव—कोण रे तुझी प्रीतिदेवता ?"

" ही तारा माझी प्रीतिदेवता ? "

" तोंड फोडा मेल्याचं ! " गुणवंतावर कडाडून तारा ओरडली.

कडाड् ! कडाड् !! कडाड् !!! तीन आवाज झाले.

गुणवंताच्या डोळ्यांपुढें ताऱ्यांचा गरबानाच सुरू झाला ! आपोआपच त्याचे डोळे गप्पकन् मिटले गेले.

गुणवंताच्या डोळ्यापुढें असंख्य ताऱ्याचा गोलंकार फेर चाललाच होता.

प्रत्येक ताऱ्याच्या मध्यावर तेजाच्या प्रभावळींत गाडींत भेटलेल्या तारेची मुद्रा त्याला दिसत होती.

प्रत्येक ताऱ्यांतली तारा त्याच्याकडे पाहून उपहासानें हंसत होती.

कसल्या तरी अद्भुत चमत्कारानें एका सबंध वर्षाची कपात होऊन, आपली प्रीतिदेवता तारा आपल्या नयनताऱ्यांनीं ओवाळूं लागली तर नाहीं ना ? अशी शंका सुन्न झालेल्या गुणवंताला आली.

पुढें आपण कुठें आहोंत, काय करतों आहों, याचें गुणवंताला भानच राहिलें नाहीं.

त्याच्या आणि या जगाच्या मध्यें दाट अंधार पसरला.

गुणवंताला तसाच रस्त्यावर पडलेला सोडून तारा आणि तो गृहस्थ बंगल्यांत शिरलीं.

\+ + +

" अरे ह्यो बग हिथं कोन पडलाय " रस्त्यानें जोडीनें जाणाऱ्या बाळूपैकीं एक दुसऱ्याला म्हणाला.

" साल्यानं आख्खी बाटली झोकली असेल अन् पडला असेल रस्त्यांत धूळ खात ! हे साले शिकलेले जंटलमण तीन तान्याची बाटली लई पीते !" दुसऱ्यानें पहिल्याची समजूत घातली.

[ ५ ]

" पाहिलंस, नवऱ्यावर रुसवा करून रागारागानं माहेरीं निघालेल्या बाईवर कशी साऱ्या जगाची एकदम प्रीति बसू पाहाते ती ! आला ना अनुभव ?" मधुसूदन तारेच्या गालावर टिचकी मारून म्हणाला.

" इश्श असं काय तें ! धाकटे भावजी नाहीं तर वन्सं पाहतील आणि ओरडत सुटतील साऱ्या घरभर इकडून माझ्या गालावर टिचकी मारायची झाली म्हणून !" तारा पुणेरी कलंगाड्याच्या फांकीचा रंग चेहऱ्यावर आणून म्हणाली.

" पण त्या बापड्याची फसगत झाली हो! त्याला वाटलं मी कुमारीच आहें "

" त्यालाही पण कारण तूंच !" आपल्या कणखर बेचकांत तारेची हनुवटी धरून मधुसूदन म्हणाला " तुला सांगितलं कीं गळ्यांत मंगळसूत्र घालीत जा. तर तुझा आपला हट्ट मी नाहीं तें गुलामगिरीचं काळं दावं घालून जगात मिरविणार म्हणून ! अग, मंगळसूत्र हीच एक सौभाग्यवतीची खूण सर्वांकडून मानली जाते आहे, तर तूंच एकटीनं तिला 'रानटीपणाचा अवशेष,' 'गुलामगिरीचं काळं दावं' असं म्हणून कसं चालेल ? बरं, तो बेटा नुसता तुझा प्रियकरच म्हणवूं लागला होता. जर का त्यानं असं कांहीं केलं असतं..."

मधुसूदनाच्या हातून आपलें तोंड सोडविणें आपल्याला शक्यच नाहीं असा मागचा पुष्कळ अनुभव असूनही तिनें तोंड चुकविण्याची खूप धडपड केली, पण पुनः इतिहासाची पुनरावृत्तीच झाली.

" उद्यां सकाळीं आपल्याला जायचं आहे हं—"

" कुठं ?" आळीपाळीनें दोन्ही खांद्यावर आपले गाल घसटवीत तारेनें विचारलें.

" बोरीबंदरावर " मधुसूदनानें रूक्षपणानें उत्तर दिलें.

" बोरीबंदरावर ? कोण यायचं आहे ? "

" यायचं नाहीं; एक दांपत्य सकाळच्या गाडीनं निघून कोल्हापूरला दिवाळीसाटीं जायचं आहे !"

" आंऽ! बाई माझे ! हा केव्हां ठरला बेत ?" तारा आपल्या जागेवरून उठून मधुसूदनाला बिलगून उभी राहिली.

" म्हटलं बायको ' दिवाळीला माहेरीं जायचंच ' असा हट्ट धरून बसली आहे; ' नाहीं ' म्हणतांच काडीमोड केल्याप्रमाणं दोन दिवस मुंबईच्या चुलतबहिणीकडं राहिली, साऱ्या दिवाळींत मालाडच्या मावशीकडं राहायला निघाली, तेव्हां म्हटलं खूष करावी बायकोला आणि उद्यां सकाळीं निघायचा बेत कायम केला. "

" अहो दादासाहेब !" तारेच्या वन्सं झपाट्यानें खोलींत येऊन म्हणाल्या, " बायकोपुढं नका बरं का भलत्या बढाया मारूं. काहीं ऐकूं नकोस ग तूं वहिनी त्याचं. ' तें कांहीं नाहीं, व्याही इतक्या आग्रहानं बोलावताहेत तर तुला दिवाळीला कोल्हापूरला गेलंच पाहिजे ' असं आज बाबांनीं जेवतांना बजावलं, म्हणून तयार झाले आहेत हो कोल्हपूरला जायला ! "

" अस्सं ! सोनारानं कान टोंचले म्हणून दुःखाचं हूं कीं चूं नाहीं होय ? खरंच आहे तें ! बायको परक्याच्या घरची म्हणून कोण्या झाडाचा पाला ! मी महिनाभर जीव तोडून सांगितलं तरी आपलं ' नाहीं ' हें उत्तर अन् आतां कसं ?—"

" दादा, डोळे तरी पूस आतां बापडीचे ! आयाई रडते आहे बापडी !"

" चल चावट पोरटी ! जातेस कीं नाहीं आतां इथून–" मधुसूदन बहिणीवर गुरगुरला.

" खरंच का जवळ घेऊन वहिनीचे डोळे पुसणार आहेस ? मग मी आपली जातें हो ! " जातां जातां तारेच्या वन्सं खंवचटपणानें म्हणाल्याच.

\+ \+ \+

" काय हो इतके गाल कशानें सुजले एकाएकीं ?" गुणवंताला ओळखीचा जो तो विचारूं लागला.

" गालगुंडे झालीं आहेत हो!" असें एकच उत्तर गुणवंत ज्याला त्याला देऊं लागला.

'आधीं शक्य तितकें रात्रीं बाहेर पडायचें नाहीं; प्रसंगानें जावें लागलेंच तर गणेशचतुर्थीच्या रात्रीसारखें जमीनीकडे डोळे करून चालावयाचें, जन्मांत म्हणून आकाशांतल्या ताऱ्याकडे पहावयाचें नाहीं, तारा नावाच्या मुलीशीं होतांहोईल तों लग्न करावयाचें नाहीं; आणि न होऊन जडलीच एखादी तारा जन्माची कपाळाला, तर तिच्याकडून दिवाळींत प्राण गेला तरी ओवाळून घ्यावयाचें नाहीं; एकदां झाली तितकी ताऱ्याची ओवाळणी बस्स झाली!' अशी दीर्घ आणि भीष्मप्रतिज्ञा गुणवंतानें आपल्या मनाशीं घट्ट करून ठेवली आहे!

———

## ३ रक्त !

मुंबई. जुलै—

प्रिय सुंदर,

फारच नाजुक प्रश्न विचारलास. माझ्याबद्दलच्या तुझ्या कल्पना तरी काय आहेत ? माझी आई मला सोडून गेली, तेव्हांपासून गेल्या तीन-चार वर्षांपर्यंत मी तुमच्याच घरीं राहिलें, नि तिथंच लहानाची मोठी झालें. तूं आणि मी अगदीं एका वयाच्या, एका शिणेच्या, अगदीं एका जिवाच्या. जशजशा आपण वाढत चाललों, तसतसा आपल्या मनांत फरक पडत चालला; अगदीं न कळत तो फरक आपणांमध्यें शिरला आणि न कळतच वाढत चालला. कपड्याच्या रंगपसंतीपासून तों थेट कालच्या पत्रांत मला तूं विचारलेल्या प्रश्नापर्यंत आपल्या विचारसरणींतला तो फरक आपल्याभोंवतालच्या लोकांना जाणवतो आहे. परिस्थिती एकच, वळण लावणारीं माणसं तींच, शाळेंत कॉलेजांत आपण पुस्तकं वाचलीं तींही तींच, मग आपल्या मनाच्या ठेवणींत असा फरक कां पडावा ? विचार केला, पुष्कळ विचार केला, पण समाधानकारक उत्तर सांपडत नाहीं. सुंदर, क्षमा कर. हा आपल्यामधला फरक रक्ताच्या फरकामुळं उत्पन्न झाला असेल का, असं मला आतांशा वाटूं लागलं आहे. माझी आई सारा जन्म वैभवांत लोळली, तें तुझ्या आईला पाहवत नव्हतं, असं माझं म्हणणं नाहीं. परंतु आपल्याहून रूपानं पुष्कळ कमी असलेल्या धाकट्या बहिणीचं ऐश्वर्य आपल्याला उपभोगायला पाहिजे होतं, असं माझ्या मावशीला या क्षणापर्यंत वाटत आहे हें तूं कबूल करशीलच. ती वैभवाची, संपत्तीची, किंवा संपत्तीच्या दिमाखाची अतृप्त हौस तुझ्यामध्यें दिवसेंदिवस टळकपणानं दिसूं लागली आहे, असा माझा तर्क आहे. अशी कारणपरंपरा लावल्याशिवाय तुझ्या वृत्तींतील श्रीमंतीची आशा व श्रीमंतीचं प्रदर्शन करण्याची हौस, याचं मला जन्मस्थानच सांपडत नाहीं ! तूं विचारशील,—

" माझ्या तीर्थरूपांची त्यागवृत्ति माझ्या रक्तांत कां वावरूं नये ?" या तुझ्या प्रश्नाला माझ्याजवळ उत्तर नाहीं.

हो, प्रश्नावरून प्रश्नाची आठवण झाली. तुझा प्रश्न असा कीं, तूं विभाकरांची मागणी मान्य केलीस, तर मला वाईट वाटेल काय ?

मी तुला उलट विचारतें, " मला ग कां वाईट वाटावं ? केवळ विभाकरांनीं प्रथम मला मागणी घातली, माझ्या बाबाना ती आवडली आणि अगदीं लग्नाच्या याद्या होण्यापर्यंत पाळी आली होती, म्हणून मला वाईट वाटेल ? तें ग कसं संभवनीय आहे ? विभाकरांची जाड्या पगाराची सरकारी नोकरी तुम्हां साऱ्यांना एक मोहनी आहे, पण मला तसं मुळींच वाटलं नाहीं. उलट, त्यांची ती पैशाची खाण हाच त्याच्यांतला एक मोठा दोष आणि तो तर मला कधींच घालवितां येण्यासारखा नाहीं. म्हणूनच ना विभाकराच्या मागणीला नकार देण्याचा हट्ट माझ्या बाबां-जवळ मी धरून बसलें. या साऱ्या गोष्टी तुला माहित असताना, तुझी माळ...विभाकरांच्या गळ्यांत पडली, तर मला वाईट वाटेल का ? असं तूं कसं विचारलंस ?

...आता खरंच सांगून टाकतें तुला. जर विभाकरांशीं तुझं लग्न झालं, तर मला दुःख होईल ! कारण मात्र निराळं आहे. अन् तें तुला पुरतं माहितही आहे. एका मोठ्या हुद्देदाराची अर्धांगी म्हणून तुझा मानमरातब वाढेल, पण तो किती थोड्या लोकांत ? तूं म्हणशील, ते लोक थोडे असले, तरी ते बुद्धिमान्, विद्वान आणि श्रीमान असतात. तुझं म्हणणं कांहीं चूक नाहीं. माझं म्हणणं इतकंच, कीं परकी लोकांच्या नौकरींत पैशापायीं तल्लख बुद्धि व असाधारण विद्वत्ता, जन्मभर गहाण टाकणाऱ्या लोकांत तुझी उदे उदे होणार, ह्यांच्यासारखीच तुझी विद्वत्ता आणि बुद्धि, श्रीमंती ऐषआरामाच्या तळघरांत पडून गंजून गंजून निकामी होणार ! होय कीं नाहीं, सांग. जसे त्या वर्गांतले पुरुष आमच्यामध्यें जन्मून न जन्मून सारखेच, तशाच तुम्ही त्यांच्या बायका ! दोघांचाही आमच्या समाजाला काडीइतकाही उपयोग नाहीं. तुझ्यासारखी भावना-प्रधान विद्वान मुलगी फुकट जाणार, म्हणून तुझं विभाकरांशीं लग्न झालं

तर मला वाईट वाटणार आहे. दुसरीकडून पाहिलं, तर माझ्या लग्नाचं ठरत आहेसं ऐकून निष्कारण सचित होणाऱ्या माझ्या सुंदरच्या मनाचा भडक गुलाब आतां कायमचा टवटवणार या अपेक्षेनं मला पूर्ण संतोष होईल. तूंच विभाकरांची अर्धांगी झालीस तर—

तुझी

**प्रियाराणी**

[ २ ]

प्रिय प्रियाताई, पुणें, आगस्ट—

..आपण जर एकसारखं श्रीखंड खाऊं लागलों, तर आपल्याला एकदोन दिवसांतच त्याची मिठी बसेल. कधीं एकदां नेहमींची साधी, शाळूची कुडकुडीत भाकरी खाऊं, असं आपल्याला होईल नाहीं का? तुम्हां गर्भश्रीमंतांचं तसंच होतं. एक दोन पिढ्यांतच तुम्हांला श्रीमंतीचा वीट येतो आणि गरीबीचे वाळले तुकडे मोडण्याचा हव्यास तुम्हाला लागतो. उठतां बसतां हातींपायीं लागणाऱ्या ऐषआरामाची किंमत तुला न वाटली तर तो तुझा दोष नव्हे, ती तुझ्या गर्भश्रीमंतीची मळमळ आहे.

आम्ही पुण्याच्या मुली. केवळ लग्नाच्या व्यापाराचं भांडवल म्हणून आमच्या उच्च शिक्षणाचा उपयोग करतों—नव्हे त्याचा तो उपयोग हेंच ध्येय ठेवून आम्हीं शिक्षण संपादतो, असं तुझी ती मुंबईची नवी मैत्रीण प्रियवंदा जोशी नेहमीं म्हणत असते आणि तिनं तरी काय केलं ग? गांठलानच ना तिनं एक नामांकित दारुडा कॅप्टन शेवटीं! पुण्याला मुंबईनं हंसावं इतकंच. खरं पाहिलं, तर साधतंयसं दिसलं ग दिसलं, कीं चौपाटीचं पाणी मुळामुठेसारखं घोट्यापुरतंच ठरतं!

लाज कशाला? स्पष्ट सांगतें. एखाद्या बड्या पगारदाराशीं लग्न करून आपल्या जन्माचं सार्थक करावं अशी माझी महत्त्वाकांक्षा होती. ती महत्त्वाकांक्षा फुलाफळाला येण्याची नामी संधी येतांच मी ती साधली, अगदीं धडपड करून साधली!

विभाकर आणि मी! ठरली बरं आमची एंगेजमेंट. प्रियाताई, तुला वाईट वाटलं, तरी मला त्याची मुळींच दिक्कत वाटत नाहीं.

विभाकरांना सुंदर सुशिक्षित पत्नि पाहिजे. मला, माझ्या जन्माची जिम्मेदारी संभाळून, अष्टौप्रहर पडेल तिथं माझ्या पायातळीं रुजामे पसरणारा हौशी श्रीमंत पति पाहिजे. जमलं दोघांचं, जगाचं त्यांत काय वेचतं ग? म्हणे, लोकांसाठी आम्ही त्याग केला पाहिजे! लोकांनीं आमच्यासाठीं काय केलं? नकोच तो वाद. आतां फक्त आनंद आणि आनंद! जग म्हणजे काय ग प्रियाताई? त्याग! त्याग तुला करतां येईल—पुढं कदाचित माझी मुलगी—नात—त्याग करूं शकेल; परंतु मी ग कशाचा त्याग करणार?

आईला तर डोक्यावर आकाश नाहींच असं वाटतंय! आकाशांतला चंद्र हातीं लागला, असं वाटून, येतां—जातां बाबा आपल्या लाडक्या सुंदरचा मुखचंद्र कौतुकाच्या लाडांनीं न्याहाळून पहात असतात आतांशा! भारी बाई लाजल्यासारखं होतं तेव्हां!

तुझी,

**सुंदर.**

[ ३ ]

पुणें, आगस्ट—

प्रिय प्रियाताई,

...तुला नको सांगूं, तर कुणाला सांगूं? असल्या जीवींच्या गोष्टी बोलायला—न्याहायला तुझ्याशिवाय मला कोण आहे ग? लग्न ठरल्यानंतर माझे विभाकर—हो, माझेच बरं विभाकर आतां! अगदीं अगदीं माझे—मुद्दाम रजा घेऊन पुण्याला आले. ते येणार, अशी माझ्याच नांवानं तार आली. तेव्हां मला काय काय वाटलं असेल याची प्रियाताई, तूंच कल्पना कर. पूना मेल दिसूं लागतांच, ध्यानीं मनीं नसतांना हृदयांत धडपड सुरू झाली. गाडी धडाडून स्टेशनांत शिरली, तेव्हां तर माझ्या नाड्या सणसणूं लागल्या! फर्स्ट क्लासच्या डब्याच्या दारांतच ती मनमोहक मूर्ति हंसत उभी होती. गाडी थांबतांच ते एखाद्या लहान पोराप्रमाणं टुणकन उडी मारून माझ्यापुढं उभे राहिले, अन् म्हणाले, "तुम्ही स्टेशनवर याल, असं वाटलंच होतं मला!" मला नाहीं बाई आवडलं तें

त्यांचं बोलणं. आपल्या माणसाला " अहो जाहो " म्हणायचं म्हणजे काय ? टॅक्सींतून घरीं जातांना त्यांना मी तसं हळूंच सुचवलंही; त्यांनीं माझ्याकडे टक लावून पाहिलं आणि हसले.

—विभाकर सारे दोनच दिवस इथं होते. मला वाटतं, त्या दोन दिवसांत, मी अन् ते, एवढींच काय तीं खरीखुरी जिवंत होतों, बाकीचं सारं जग असल्या ठिकाणींच स्तब्ध राहिलं होतं जसं कांहीं ! तो वेस्टएंड-मधला अंधारांतला दोन तासांचा स्वर्गीय सहवास...खट्याळ आहेस बघ तूं प्रिया ! त्या दिवशीं चित्रपट कोणता होता म्हणूस काय ग विचारतेस ? मला नाहीं आठवत जा !

—जळ्ळा तो पाऊस ! आयत्या वेळीं बोटॅनिकल गार्डनमधला आमच्या वनभोजनाचा बेत फिसकटवलान् त्यानं !

—विभाकरांच्या इथल्या मुक्कामांत काय काय झालं, त्याचा नाहींच मी पाढा वाचीत. तो वाचून तुला वाटेल, "मला कधीं असा आनंद लाभेल ?"

—प्रियाताई, खरं सांगू का ? हा आनंद कांहीं और आहे. अगदीं अवर्णनीय आहे. कुठून बाई तूं देशसेवेच्या आणि समाजकार्याच्या गोष्टी डोक्यात घेऊन बसली आहेस कुणास ठाऊक ! बाकी, तुझ्या त्या वेडा-पासून माझा फायदाच झाला आहे म्हणा—कॉलेजमध्यें असल्यापासून तुझ्या डोक्यांत तें वेड शिरून पक्कं झालं नसतं तर विभाकर मला कसे लाभले असते ? तूं म्हणशील, मी सुंदर आहें—बालगंधर्वाप्रमाणं मी म्हणतें— 'हो, आहेंच मी सुंदर !' पण तुझ्या बाबांच्या संपत्तीनं दिपून गेलेल्या विभाकरांच्या नजेरत माझं रूप कसं शिरलं असतं सांग बरं ?

—तुला आठवतो कां ग, तूं मागं हिऱ्या मोत्यांचा अगदीं नाजुक सुंदर डिझाईनचा एक नेकलेस इथं आणला होतास तो ? मला तो फार आवडला होता, नाहीं ? " सुंदर, हा नेकलेस तुला मी मॅरेज प्रेझेंट म्हणून देईन. " असं तूं कितीदां तरी तेव्हां म्हणाली होतीस ! विभाकर अन् मी कॅपांतल्या विठ्ठल शामशेटच्या दुकानांत गेलों होतों, माझी एंगेजमेंट रिंग घ्यायला. तिथं दुकानदारांनीं आम्हांला थेट तसलाच नेकलेस दाखवला. जसा कांहीं तुझ्याच तो ! विभाकरांनीं विचारलं, " घेऊंया का हा आपण ? "

मी म्हटलं " नको. " त्यांनीं " कां ? " असं विचारतांच, तूं मला आपला नेकलेस देणार आहेस असं मी त्यांना सांगून टाकलं. पण स्वारी कसली हौशी ! अगदीं माझ्याइतकीच त्यांनाहि दागिन्यांची हौस आहे. जाण्या-पूर्वी मोत्याचे चार सर ( पांचेच्या पानाडीसह ) माझ्या गळ्यांत घालून गेले ! ही त्यांची दागिन्याची हौस पाहून, तुला नाहीं म्हणावंसं वाटत 'समसमा संयोग कीं जाहला ?' त्या माझ्या सरावर तुझा नेकलेस घालून केव्हां एकदां आरशांत पाहीनसं झालं आहे मला. पण बाई, त्यासाठीं मला आणखी चार महिने थांबलंच पाहिजे ! मेला हा कायसासा चातुर्मास चालू आहे ना ! तो संपल्यावर डिसेंबरमध्यें लग्नाचे मुहूर्त ! रजिस्टरनं लग्न करायची विभाकर किती तरी घाई करीत होते;–पण आई न् बाबा ! त्यांना काय आमच्या अंःतकरणाच्या तळमळीची कल्पना ? आमचा वैदिक विवाहच झाला पाहिजे, असा त्यांचा हट्ट ! करायचं काय ! आलिया भोगासी असावं सादर !...

सध्यां विरही असलेली,

तुझी

**सुंदर.**

[ ४ ]

मुंबई, सप्टेंबर.

प्रिय सुंदर,

...इतका उल्लूपणा कुठून आला तुझ्यांत ? अनुकूल परिस्थिति प्राप्त होतांच अंःतकरणांत दडून बसलेली हौस बुडबुडून वर आली का ?

सुंदर, तूं मुंबईला केव्हां येणार ? येणार ती चागली महिना पंधरा दिवस राहण्याच्या बेतानं ये हो. इथं राहून सध्यां, जो, लोक आणि सरकार यांच्यामध्यें झगडा चालला आहे, तो तूं डोळे उघडून पाहावास, असं मला वाटतं. आपला देश, आपले लोक, आपलं पारतंत्र्य इत्यादिबद्दलच्या भावना तुझ्यांत लुप्त आहेत असं मला मुळींच वाटत नाहीं. तूं हवं तें म्हणेनास. त्या भावना तुझ्या हृदयांत सुप्त आहेत, इतकंच. मुंबईची

खळबळ मुंबईतच राहून पाहशील, तुझ्या भगिनींचा तो उल्हास, तो उत्साह अनुभवशील तर तुझ्या त्या भावना खडबडून जाग्या झाल्यावांचून राहणार नाहींत.

बरं, मुंबईच्या खळबळीचं दर्शन घेण्यासाठीं यायचं नसेल तर नको येऊं; पण तुझ्या त्या मोत्यांच्या चौसरावर माझा नेकलेस घालून आरशांत पाहण्याची तुझी उतावळी हौस फेडण्यासाठीं तरी लवकर–लवकर मुंबईला ये. नाहीं म्हणूं नकोस. केव्हां येणार तें उत्तरीं कळव.

तुझी
**प्रियाराणी**

[ ९ ]

प्रियाताई पुणें, सप्टेंबर.

...चुकलं का माझं? प्रियाताई, हें संबोधन तुला नकोसं वाटत असेल; देशसेविका ताई असं म्हटलं, तर तें तुला अधिक आवडेल! असें नाहीं का?

मुंबईची चळवळ माझ्या मनावर अधिक तो काय परिणाम करूं शकणार? जितकी तुमच्या मुंबईला चळवळ आहे, तितकीच आमच्या पुण्यालाही आहे. सभा बहुतेक रोज चालूच आहेत. प्रभात–फेऱ्यांनीं तर नुसता उच्छाद मांडला आहे. भालाकार भोपटकर म्हणतात त्याप्रमाणं, खरोखरींच तान्ही मुलं, दहशतीनं श्वास कोंडून, जागच्या जागीं गार होतील कीं काय, अशी चिंता उत्पन्न झाली आहे! मिरवणुकींना तर आगापिच्छा नाहींसा झाला आहे. तुमच्या मुंबईची इतकी ऐट नको, आमच्या पुण्यांतही आतांपर्यंत दोनतीनदां लाठीमार झाला आहे म्हटलं! पण ह्या गोष्टीचा माझ्या मनावर मुळीं म्हणजे मुळींसुद्धां परिणाम झालेला नाहीं. विभाकरांच्या तर प्रत्येक पत्रांत असतं कीं, सध्यां देशांत घातुक वेडाची सांथ पसरली आहे. काय खोटं आहे स्वारीचं म्हणणं? प्रियाताई, मी तुला पक्की सोवर समजत होतें. अग, तूं लिबरल ना? मग त्या गांधीच्या वेडपटणांत काय सामील झालीस? पहा बाई! असल्या "घातुक वेड्याच्या"

आगींत उघड्या डोळयांनीं उडी टाकणं चांगलं नव्हे. तुम्ही बाई मुंबईच्या मुली! आमच्यासारख्या पुण्याच्या भटणीहून कितीतरी हुषार आणि स्मार्ट!...

तुझी

सुंदर

[ ६ ]

प्रिय सुंदर,

...जगांतल्या सर्वांत मोठ्या साम्राज्यशक्तीशीं असल्या उपायांनीं टक्कर देऊन कधींच निभाव लागणार नाहीं हें मला समजतं! हें वेड आहे ह्यांत शंकाच नाहीं. पण या वेडांत शिस्त आहे, शक्ति आहे! या वेडानं गेल्या पांचपन्नास वर्षांत जें काम झालं नाहीं, तें काम आमच्या डोळ्यादेखत हां हां म्हणताच झालं आहे. राजकीय दृष्ट्या काय परिणाम झाला असेल, होणार असेल, तो होवो. मला तें कळत नाहीं; पण सामाजिक दृष्ट्या या वेडाचा किती इष्ट परिणाम झाला, याचा शांतपणानं विचार करणं अवश्य आहे. मोठ्या समाजाचा विचार अवघड व अवजड वाटत असला, तर आपण फक्त स्त्रीसमाजांतील क्रांतीचा विचार करूं. अग, ज्यांची दृष्टि कधीं आपल्या घराच्या चार भिंतींपलीकडे गेली नाहीं, ज्यांना पूर्वी डोळे उघडून जगाकडे पाहण्याची गरजही भासली नाहीं, अशा आपल्या अशिक्षित अगर अर्धवट साक्षर असलेल्या भगिनी या वेडापायीं कोणता त्याग करायला तयार झाल्या आहेत, भित्र्या म्हणून आजवर हिणविल्या गेलेल्या स्त्रिया कशा धीराच्या पुतळ्या बनलेल्या आहेत, सार्वजनिक शिस्तीला कशा तत्पर ठरल्या आहेत, तें तूं एकदां प्रत्यक्ष पाहाच. वेडांवेडांतही फरक असतोच कीं नाहीं? वेडे वाटणाऱ्या कांहीं कांहीं कवीश्वरांनीं जगाला वेड लावलेलं आहे. बोस्टनच्या बंदरांत जहाजावरचा चहा समुद्रांत उलथून देणारे अमेरिकन तरुण, त्यावेळच्या बऱ्याच लोकांच्या मतानं वेडेच ठरले होते. एडमंड बर्कसारखा राजकारणी तत्त्ववेत्ता तर फ्रेंच लोकांना सरसकट वेड्यांत काढायला निघाला! पण त्या वेडाचा परिणाम काय बरं झाला! अमेरिका पूर्णपणें स्वतंत्र झाली आणि फ्रान्सनं जुलमी राजसत्तेच्या चरकांतून स्वतःची सुटका करून घेतली!! असलीं

वेडं राष्ट्राचा इतिहास घडवीत असतात बरं. आमच्या भगिनीवर्गात जी मानसिक क्रांती झाली आहे, तिचा परिणाम आमच्या सामाजिक क्रांतींतच सिद्ध होणार आहे. खळबळीनं जोमदार बनलेलं यांचं रक्त यांच्या उद्यांच्या मुलांच्या अंगांत खेळत राहणार—आणि त्याचा परिणाम ? तूं आणि मी जिवंत मात्र असायला पाहिजे, तो परिणाम पाहायला. थोडक्यांत सांगायचं, म्हणजे पन्नास नव्हे, शंभर वर्षं एकसारखी व्याख्यानाची झोड आणि लेखांची सरबत्ती उडवून जी मानसिक क्रांती घडून येईल ती तूं किंवा तुझे प्रिय विभाकर, जिला वेडाची वावटळ म्हणतात, त्या चळवळीनं अवघ्या तीन चार महिन्यांत घडवून आणली आहे. त्यांत टकूगंगूचा फार भरणा आहे. सरला, विमला, श्रावणांतल्या चांदण्यासारख्या मधून मधून दिसतात,—सांगतें ना, तूं ये, पाहा आणि माझं सारं खरं कीं खोटं तें अनुभवानंच ठरीव. मग केव्हां येतेस बरं तूं, सुंदर, मुंबईला ?

तुझी,

**प्रियाराणी.**

[ ७ ]

प्रिय प्रियाताई पुणें, सप्टेंबर

...वर्तमानपत्रांतलीं मुंबईच्या झगड्याचीं वर्णनं वाचून, मनाला, काहींतरी चमत्कारिक वाटूं लागलं आहे खरं ! कांहीं कांहीं वेळां वाचत वाचतां अंगावर कांटा उभा राहातो, तर केव्हां केव्हां अशी चीड येते म्हणून सांगूं !......०

तुझी

सुंदर.

[ ८ ]

जळगांव, सप्टेंबर—

प्रिय सुंदर,

...वर्तमानपत्रांत आलेलीं वर्णनं वाचून तूं इतकी बावचळून गेलीस ? इतकी सेंटिमेंटल आहेस कां तूं ? टाईम्स ऑफ इंडियाखेरीज तूं बाकीचीं वर्तमानपत्रं मुळींच वाचीत जाऊं नकोस. मुंबईला जाऊन

गम्मत पहाण्याचा तुझा विचार मला मान्य नाहीं. मुंबईला जाऊन असली धुमश्चक्रीची अन् हाणामारीची गम्मत पाहायाची ? लग्न झाल्या-बरोबर एक महिना मुंबईत राहून, खरीखुरी आपल्या आनंदाची मुंबई करायची असं आपलं ठरलं आहे ना ? मग असं कां बरं ? लाडके सुंदर, तूं मुंबईला एकटी आणि अशा वेळीं मुळींच जातां कामा नये...

सर्वस्वी तुझाच,

**विभाकर.**

[ ९ ]

मुंबई, सप्टेंबर.

प्रिय सुंदर,

...मुंबईच्या झगड्यांचीं वर्णन ऐकून, तुला चीड येऊं लागली आहे हें वाचून, मला किती आनंद झाला आहे म्हणून सांगूं ! पुन्हां जेव्हां तुला अशी चीड येईल; तेव्हां एका गोष्टीचा नीट विचार कर. सध्यां जो इथं झगडा चालला आहे, त्यांत आपल्या सत्तेचा अन् शक्तीचा सरकार आड-माप उपयोग करीत आहे आणि चळवळींत पडलेले स्त्री–पुरुष त्या शक्तीचा मारा आनंदानें सहन करीत आहेत. ज्या प्रचंड राज्ययंत्रांतून ही शक्ती निर्माण झाली आहे, त्या यंत्राच्या एका लहानशा भागांत तुझे भावी पती, तुझे विभाकर एक प्रमुख चक्र म्हणून फिरत आहेत ! काय वाटतं तुला ?...

तुझी,

**प्रियाराणी**

[ १० ]

विभाकर, माझ्या परमश्वरा, माझ्या मावशीच्या पतीची मुंबईहून आतांच तार आली. माझी मावसबहीण, आमची प्रियाताई, तुम्हांला ठाऊक आहेच. ती डोक्याला जखम होऊन फार आजारी आहे. मला तिच्या शुश्रुषेला गेलंच पाहिजे. आपल्या आज्ञेप्रमाणं मुंबईला मी जायला नको खरं–अन् आजवर मी माझी इच्छा मनांतल्या मनांत दाबून ठेवलीच होती. सख्या, ही माझ्या परमप्रिय भगिनीची हांक आहे. तिला मी

धांवलंच पाहिजे. तार आल्यापासून कांहीं म्हणजे कांहीं सुचेनासं झालं. जीव अगदीं उडून गेला आहे. केव्हां एकदां माझ्या प्रियाताईला पाहीनसं झालं आहे. आमचा धाकटा 'शशिकांत' बरोबर येणार म्हणून हट्ट धरून बसला आहे. त्याला न्यावंच लागणारसं दिसतं. अशी मी तडकाफडकी मुंबईला गेलें, म्हणून रागवायचं नाहीं अं! नाहींच रागावायचे माझे विभाकर—" रागावलो नाहीं, " अशी मला मुंबईच्या पत्त्यावर तार करावी गडे...प्रियकरा, आतां अगदीं अगदीं

आपलीच

सुंदर.

[११]

मुंबई, आक्टोबर—

विभाकर प्राणेश्वरा!

मी इथं तार देखतां आलें, किती चांगलं झालं! एकटे काका. ते काय करणार प्रियाताईची सुश्रूषा? घरांत नाहीं कुणी बाई माणूस; मला पाहतांच त्यांच्या डोळ्यांतून घळघळ पाणी वाहूं लागलं; अन् मग मलाही कांहीं आवरलं नाहीं. म्हणायचं होईल कीं, बायकांना रडायला काय लागतं म्हणून! प्रियजनांच्या अश्रूंच्या आकर्षणानंच आपल्या डोळ्यांतून अश्रू बाहेर पडूं लागतात, असं मला वाटतं विभाकर. तुम्ही कधीं तरी रडलां होतां कां हो?

चार दिवस झाले मला येऊन इथं; पण अजून कांहीं प्रियाताई शुद्धीवर आली नाहीं. ताप एका रेघेनंही कमी झालेला नाहीं. काकांच्या काळजीला आणि उपायांउपचारांना सीमा नाहीं. या संकटांतून निभावून न्यायला एक परमेश्वरच काय तो समर्थ आहे. प्रियाताई जर का... नको तो विचार...नको म्हणतें, पण तो विचार तर एकसारखा माझ्या डोक्यांत घुंगावतो आहे आणि काळजाचे जसे कांहीं लचके तोडतो आहे! म्हातारपणीं आमच्या काकांचा एकच्या एक आधार म्हणजे आमची प्रियाताई—ती जर या आपत्तींतून निभावून निघाली नाहीं तर काकांच्या-

सारख्या सात्विक, पुण्यशील, अन् परोपकारी माणसाच्या सद्‌गुणांना परमेश्वराच्या कारभारात महत्त्व नाहीं असं जगाला मी ओरडून सांगेन.

त्यांतच आमच्या शशीनं मला तर अगदीं वेड लावण्याची पाळी आणली आहे. मुंबईत पाऊल ठेवल्यापासून स्वारीच्या भटकंतीला सुरवात झाली आहे. इथली अशी रहदारी! केव्हां लाठीहल्ला होईल, केव्हां गोळीबार होईल याचा नेम कां आहे? कुठं त्याला इथं आणला असं झालं आहे मला ..

आपली लाडकी,

**सुंदर.**

[१२]

जळगांव, आक्टोबर–

सुंदर, माझ्या हृदयाच्या बागेतील बुलबुला!

...तुझ्या प्रियाताईबद्दल इतकी सहानुभूति तुला कां वाटावी, याचंच मला राहून राहून आश्चर्य वाटतं! उच्च शिक्षण घेऊनसुद्धां जिचं मन कोरं करकरीत राहिलं आहे, अशी ती एक महामूर्ख मुलगी आहे, असं माझं पक्कं मत झालं आहे. तें मत आजचंच नाहीं. मी एक हुद्याचा अधिकारी आहे, हा अक्षम्य दोष समजून तिनं माझ्याशीं लग्न करण्याचं नाकारलं, तेव्हांच मी तिची सारीं लक्षणं ओळखलीं. देशसेविकेच्या पथकांत शिरण्याचा अव्यापारेषु व्यापार करण्याची तिला कां बुद्धी व्हावी? ती बापाची एकुलती एक मुलगी आहे; बापाच्या वृद्धापकाळांतला आपण एकच एक आधार आहों हेंही तिला कळूं नये? तें कळलं असतं तर ती मूर्ख कशी ठरली असती? मला तर तिच्या वृत्तींत नुसता स्वार्थ दिसतो आहे. ज्यानं तिला फुलात ठेवून वाढविली त्या बापाची काळजी तिला मुळींच वाटली नाहीं देशसेविका होतांना! कां, तर म्हणे· तिचीं मतं स्वतंत्र आहेत. असल्या देवासारख्या बापाकरितां ती अवखळ पोर आपलीं मतं कांहीं काळ बाजूला ठेवायला तयार नाहीं. आणि ही म्हणे देशसेविका! ही म्हणे देशाला स्वातंत्र्य मिळवून देणार! विलायतेंत असल्या पोरींची

निपज नाहीं, म्हणूनच इंग्लंड आज निःशंकपणं आणि रास्त रीतीनं हिंदुस्थानावर राज्य करतं आहे.

तुझ्या प्रियाची प्रकृती थोडी निवळतांच तूं तडक पुण्याला चालतं व्हावंस, असं माझं तुला आग्रहाचं सांगणं आहे. आपला शशीही फार दिवस मुंबईंत राहणं चांगलं नव्हे. तिथल्या वावटळीचा परिणाम त्याच्या कोवळ्या मनावर जर का झाला तर कालत्रयीं नाहींसा व्हायचा नाहीं! ती प्रिया तुलाही आपल्या सारखीच मूर्ख बनवील, अशी मला भीति वाटते.

अगदीं तुझाच,

**विभाकर**

[ १३ ]

मुंबई, नोव्हेंबर—

प्रिय विभाकर

आपल्या ताज्या पत्रांत एकंदरीनं चिडीचा वास भरला आहे. डिक्टेटरशिपचा ध्वनि भरपूर आहे त्यांत आणि माझ्या प्रियाताईला किती शिव्या दिल्या आहेत तुम्ही! मनमोकळं करूं का? माझ्या हृदया-जवळ कसला आला आहे आडपडदा? मी असं म्हणतें खरी, पण माझ्या हृदयांत तुम्हीच "मी आणि तूं" असा द्वेषाचा पडदा निर्माण केला आहे. त्याला काय करायचं? आपण मला आज्ञा करण्याचा आविर्भाव का आणावा? आज्ञा ही मजुरीच्या पोटीं जन्म घेते बहुधा. आज्ञा करणं आणि ती पाळणं यांत उच्च नीच असा अर्थ स्पष्टच आहे. आपण मला आज्ञा करूं पाहतां, म्हणजे आपण वरिष्ठ अन् मी कनिष्ठ; आपण धनी, मी नोकर; असा का आपला भाव आहे? उच्च व नीच, हीं ज्ञानाचीं अनु-भवाचीं चिन्हं आपण गणत असाल, तर तीं आपण थोडी बाजूला ठेवूं. कारण त्या बाजूनं घासाघीस न केलेलीच चांगली. राहतां राहिलं धनी नोकराचं नातं. मी आपली अर्धांगी होणार आहे, म्हणजे दूर अंतरावर उभी राहून आतुरतेनं आज्ञेची वाट पाहणारी आपल्या घरची मोलकरीण होण्यासाठीं नव्हे कांहीं. आपल्या मोठ्या हुद्याचा भोगवटा, आपल्या पिढीजात स्वकष्टार्जित संपत्तीचा फायदा हें मोल देऊन आपण माझी

पत्नी म्हणून नोकरी घेणार आहां काय ? मला नाहीं वाटत आपल्या रक्तांत तो ' हिंदुस्थानी पुरुषीपणा ' सळसळत असेल म्हणून. इंग्लंड सारख्या देशांत ज्यांच्या आयुष्याचीं पांचसात वर्षें गेलीं, त्यांच्या विचारांत स्त्रियांच्या गुलामगिरीच्या कल्पनेची घाण अजूनही जशीच्या तशीच राहिली असेल, असं नाहीं म्हणवत मला.

आपण म्हणाल, माझ्या हातून चूक होऊं नये म्हणून सावधगिरीची सूचना दिली, तसं असेल तर आपण अगदीं योग्य केलंत. पतिपत्नीनीं प्रपंचांत एकमेकांचा एकसारखा तोल संभाळलाच पाहिजे. पण आपल्या सूचनेंत अरेरावीपणाची घाण येत आहे त्याची काय वाट ? आपण म्हणतां तशी प्रियाताई मुळींच मूर्ख नाहीं. फार विचारी आणि शहाणी आहे ती. अशी मुलगी ज्या अर्थी लढ्यांत हौसेनं शिरली आहे, त्याअर्थी त्या लढ्याच्या पोटीं तसाच कांहींतरी खोल अर्थ आहे, यांत शंका नाहीं. आपल्याला तो अर्थ समजत नाहीं असं हवं तर म्हणावं. हें आपलं पत्र मला मुळींच आवडलं नाहीं. असं अरेरावीनं पुन्हां नाहींना एखादं पत्र लिहिणार ? गोड गोड पत्र लिहावं गडे. अगदीं उलट टपालीं टाका तें गोड पत्र......

आपली

सुंदर.

[ १४ ]

मुंबई.

प्रिय विभाकर,

...माझं परवाचं पत्र आवडलं नाहीं तर ! शशिकांतानं तर काल कळसच केला ! सकाळीं जो एकदां नाहींसा झाला तो अजून त्याचा पत्ता नाहीं ! कालचा दिवस म्हणजे काळरात्रच ती ! रात्रीला सूर्याचा प्रकाश ! निर्घृणपणानं पसरलेल्या लढ्यांच्या भयाण अंधारांत पुढाकारानं डोई देणाऱ्या आमच्या लोकांच्या निष्ठेचा उज्वल प्रकाश !

खरे सैनिक निपजले आहेत आमच्यांत ! युद्धाच्या परिणामाकडे चुकूनसुद्धा त्याचं लक्ष जात नाहीं. " शांततेचा प्रतिकार " या प्रास

कर्तव्यापलीकडे पाहण्याची जोखीम त्यांनीं आपल्या पुढाऱ्यांवर, सेनापतीवर सोंपविली आहे.

मुंबईच्या कांहीं कांहीं भागांत खरोखरींच युद्धकाळची भीषणता पसरलेली दिसते. एकदम दंगल उठते! आरडाओरड होते; ॲम्ब्युलन्सच्या गाड्यांचा घंटानाद भीषणतेंत भर टाकतो, भीतीनं हृदयांत खळबळाट सुरू होतो! दारावरून ॲम्ब्युलन्सच्या मोटारींची धांवपळ सुरू झाली, कीं सर्वांगावर काट्याची अरण्यंच उद्भवतात. विभाकर, सख्या, आपण एकदां याच मुंबईला. काव्यांतला वीर–रस, भयानक रस आणि करुण रस यांचीं स्वरूपं आलटून पालटून प्रत्यक्ष आपल्याला दिसून येतात इथं.

" शांति–युद्ध "! काय अद्भुत काव्य आहे या शब्दांत! पत्रांत हे शब्द आले, म्हणजे त्यांच्या शुष्कपणानं, त्यांतील विरोधाभासानं आपल्याला विनोदाची उकळी येते, हें खरं आहे. मी सुद्धां त्या विरोधाभासानं फसली जाऊन, शांतियुद्धाची टवाळी करीत होतें; पण मुंबईत त्या काव्याचं यथार्थ वाचन करायला सांपडतं आहे; इच्छा नसतांना त्याचं मनन होऊं लागतं! पृथ्वीच्या साऱ्या इतिहासांत असलं युद्ध नाहीं.

काल म्हणे × × × भागात गोळीबार झाला. " गोळीबार चालू झाला " असं कुणाला तरी म्हणतांना ऐकलं मात्र, माझ्या कानात आपले एकसारखे बंदुकीचे आवाज घुमूं लागले! शशिकांतानं अगदीं जिवाला कांच लावला! काका त्याला चारदा शोधून आले. पत्ता नाहीं. ते तरी बापडे कुठं शोधणार एवढ्याशा पोराला एवढ्या अफाट शहरांत? पोलीसांत वर्दी दिली. त्याना कुठं आहे सवड असली हलकीं सलकीं कामं करायला! तेवढ्यांत कॉंग्रेस हास्पिटलमध्ये जाऊन आले. कदाचित कुठं दंगलींत दुखापत झाली असेल आणि तिथं आणून शशिकांताला ठेवला असेल, अशा शंकेनं मी कॉंग्रेस हास्पिटलमध्यें गेलें. तिथंही आमच्या लाडावलेल्या बाळाचा पत्ता लागला नाहीं. का बाबांना तार करून बोलावूं, काय करूं, कसं करूं, असं मला होऊन गेलं! रात्रीचे दहा वाजले, तेव्हां हंसत खिदळत, जिन्यावर धाड धाड पाय आपटीत आले एकदाचे शशिकांतराव! त्याला पोटाशीं धरून मी रडलें; राहवेनाच. हो, आपलं खरं आहे, तें सांगतें.

नुकताच मी महायुद्धाचा एक चित्रपट पाहिला; त्यांत एक रणांगणाजवळच्या इस्पितळचा देखावा होता. मी कॉंग्रेस इस्पितळांत गेलें होतें तेव्हां मला त्या देखाव्याची आठवण झाली! मुंबईत चाललेल्या गडबडीला "युद्ध" म्हटल्याबद्दल कुचेष्टा करणाऱ्यांची दृष्टी साफ करण्यासाठीं, त्यांना एकदां त्या इस्पितळांमध्यें नेऊन फिरवून आणावं! जखमी झालेल्या योद्धयांच्या दर्शनानं खरोखरीच, दृष्टींत फरक पडतो, मनांत विलक्षण खळबळ सुरू होते आणि पूर्वी आपण असल्या लोकविलक्षण गोष्टीची हलक्या वृत्तीनं चेष्टा करीत होतों, हें मनांत येऊन आपली आपल्यालाच लाज वाटूं लागते.

गोळीबाराचा विषय माझ्या मनाला एकसारखा ढवळून घुसळून काढीत असतां, एक गोष्ट पुन्हा पुन्हा त्या खळबळाटांतून वर येत होती. विभाकर, समजा, तुम्ही जिथं अधिकार गाजवतां आहांत तिथं असल्याच युद्धाला तोंड ( Prout ) लागलं तर तुम्ही निःशस्त्र लोकांवर गोळया झाडण्याची परवानगी पोलीसांना द्याल का हो? माझी अशी खात्री आहे, तुम्ही असे कठोर अंतःकरणाचे नाहीं-नाहीं ना? तशीच वेळ आली तर तुम्ही गडे, आपली दुसरीकडे बदली करून घ्या नाहीं तर रजा घेऊन पुण्याला निघून या..... ..

आपली लाडकी

**सुंदर.**

[ १५ ]

जळगांव, नोव्हेंबर.

प्रिय सुंदर,

...तूं भावनावश होऊन खुळी बनली आहेस; पत्रदेखत तूं पुण्याला निघून जा. याला तूं माझी सूचना म्हण किंवा आज्ञा म्हण, समानतेच्या कल्पनेला आणि व्यक्तिस्वातंत्र्याच्या भावनेला व्यवहारांत मर्यादा ह्या घालाव्या लागतातच. यापुढं तूं मुंबइंत राहिलीस, तर आपलं पुढचं आयुष्य सुखाचं होणार नाहीं किंबहुना तुझ्याशीं साहचर्य करण्याचं धाडस करावं कीं नाहीं याचा विचारच करावा लागेल.

मी बदली करून घेऊन, अगर रजा घेऊन कर्तव्याकडे पाठ फिर-वावी, अशी सूचना तुला करवली तर कशी, सुंदर ? कर्तव्याला वळसा घालण्याची माझ्या मनाला एकदा चटक लागली तर पतीचं कर्तव्यही टाळण्याची मला पुढंमाग बुद्धी होणार नाहीं कशावरून ? उद्या माझ्या शिरावर पडणाऱ्या जबाबदारीची सुरवात आतांच झाली आहे, असं मला वाटतं. म्हणून म्हणतों, तूं कितीही शिकलीसवरलेली असलीस—तरी तुला-अजून दूरदृष्टी आलेली नाहीं.

आधीं आपण आणि मग लोक, हे नेहमीं ध्यानात ठेव. “ देश, देश ” म्हणून नाचणाऱ्यानीं लोकांच्या खुळचटपणाचा फायदा घेऊन आपलीं घरं कशीं भरलीं आहेत याची कल्पना तुला मुळींच नाहीं. देश म्हणे! **India is not a nation. She was never a nation, can never be a nation** हे पक्कं लक्षांत ठेव.

तुझं पुढचं पत्र पुण्याहूनच आलं पाहिजे; आणि त्यावर परवांची तारीख असली पाहिजे, हें ध्यानात ठेव. त्यांत फरक पडला तर मला आवडणार नाहीं.......

तुझा,

**विभाकर**

[ १६ ]

मुंबई, डिसेंबर—

प्रिय विभाकर,

...जवळ जवळ एक महिन्यानंतर मी हें पत्र आपल्यास पाठवित आहें ! पत्ता मुंबईचाच आहे ! वाचवेल ना हें पत्र ?

प्रियाताई कधींच खडखडीत बरी झाली. शशिकांतानें अगदीं उच्छाद मांडला आहे. जावं पुण्याला असं रोज निदान दहादां तरी वाटतंय मनाला; तरी पण नोकरशाहीच्या चढेल वृत्तीनं शिकविलेला तुमचा नवरेशाहीचा हुकूम तोडण्याच्या आनंदासाठींच मी अजून पुण्याला जायची थांबलें आहे. आहे ही मी अशी आहे. प्रथमच खडखडीत असलेलं

चांगलं, मग उठल्या बसल्या "तूं अशी असशील, हें नव्हतं मला माहीत—" हा मंत्र नको आपल्या घरांत घुमायला.

प्रियाताईनं परवां सहज एक विचार माझ्यापुढं मांडला. वकीलांनीं व अशीलांनीं कोर्टाची पायरी चढायची नाहीं अथवा विद्यार्थ्यांनीं पुस्तकं गुंडाळून टेवायचीं, असा निश्चय करण्याऐवजीं, मामलेदारापासून पुढच्या कोणत्याच दर्जाची नोकरी करायची नाहीं, करीत असलेली एकदम सोडून द्यायची, असा जर हिंदी लोकांचा निश्चय होईल, तर आमच्या राज्यकर्त्यांच्या नाड्या उद्यां आंखडतील, असं तिचं म्हणणं आहे. वरवर पाहणाऱ्याला प्रियाताईचे विचार विक्षिप्त, किंवा तिरकस वाटतील! तिचं म्हणणं एकंदर 'पांच प्रकारांनीं' आमची तरुण पिढी भारली जाते, सरकारी नोकरीसाठीं धडपडते. आणि सत्य अन् स्वत्व घालवून बसते. तिचे ते 'प्रकार' असें आहेत. (१) पहिली तारीख (त्या दिवशीं बिनचुक पगार मिळावयाचा) (२) प्रमोशन (तें टराविक रीतीनं व्हावयाचंच) (३) पट्टेवाला (विशेषतः रावसाहेबीण बाईंना पटेवाल्याचा भारी डौल.) (४) पदवी (डोक्यावरच्या काठीला बांधलेल्या गवताच्या पेंडीच्या आशेनं जसं एकादं तट्टू एकसारखं पळत सुटतं तसे हे सरकारी नोकर जसजसे नोकरींत मुरत जातात, तसतसे सरकारी पदवीच्या आशेनं हवे तसे वागत सुटतात—असं प्रियाताईचं म्हणणं आहे.) (५) आणि शेवटीं पेन्शन! या पांच प्रकारांत सांपडलेल्या माणसांना जीविताच्या लढ्याची भिती नसते किंवा ती भीति टाळण्यासाठीं हे भित्रे आपलं स्वत्व सरकारच्या खजिन्यांत गहाण टाकतात. कोणत्याही स्वाभिमानी स्त्रीला आपला पती भित्रा (Coward) असलेला खपेल का? विभाकर, प्रियकरा, तुम्ही तसे भित्रे नाहीं ना?

नाहीं हें सिद्ध करायला एकच वाट आहे आणि ती म्हणजे एकदम आपली नोकरी सोडून द्यायची. माझे विभाकर निधड्या छातीनं जीविताच्या महायुद्धांत शिरून, रोजचं मरण मरायला तयार आहेत, हें एकदां मला भरल्या तोंडानं प्रियाताईला सांगूं दे. माझी ही हौस पुरवाच गडे......

तुमची लाडकी

**सुंदर.**

[ १७ ]

प्रिय विभाकर, मुंबई, डिसेंबर

...माझ्या हालअपेष्टांच्या कल्पनेनं तुम्हीं नका इतके हवालदिल होऊं. दारिद्र्याची भीति हिंदी लोकांना कां वाटेल? दारिद्र्यांत आमचा जन्म, दारिद्र्य हेंच आमचें जीवन, दारिद्र्य हेंच आमचं मरण. श्रीमंती हा आमच्या देशात अपवाद नाहीं का ? मी एका गरीब कुटुंबांत जन्मलें, वाढलें. आपल्यामुळं मला सुस्थिती लाभणार आहे. आतां मी दरिद्रीच आहे. श्रीमंतीचा मला अनुभव नाहीं. आपली आणि दारिद्र्याची दोस्ती नसली तरी ती लौकरच साधतां येईल. जड जाईल परंतु कोणतंही मोठं काम जड असतंच. सारांश काय, आपण माझ्या सुखासाठीं सरकारी नोकरी अवश्य आहे असं म्हणून मला फसवूं नका. आपण एक गरीब शाळामास्तर असलां तरी मला श्रीमंतच आहां. आपल्याला जाड्याजुड्या पगाराचा मोह सुटत नाहीं. प्रियाताईनं शोधून काढलेल्या पांच प्रकारच्या पंचाक्षऱ्यांनीं आपल्याला भारून टाकलं आहे म्हणाना ! आपल्या वाड-वडिलांनीं थोडी का कमाई करून ठेवली आहे ? कां तो नोकरीचा मोह धरितां ? संपत्तीपासून मिळणाऱ्या सुखाला तुच्छ लेखणारी, पुण्याची पहिली पदवीधर स्त्री असा जो मान मला मिळणार आहे तो आपण हिरावून घेऊं नये गडे. स्त्री, पुरुषाची स्फूर्ति ना ? आपण आपल्या स्फूर्तीला हेटाळूं नका. नाहीं ना हेटाळणार ? आहेतच मुळीं माझे विभाकर खरे वीर पुरुष ! कळणार ना मला पुढच्या पत्रांत नोकरीचा राजिनामा दिला म्हणून ?

आपल्या राजिनाम्याची पाट पाहणारी चातकी,

सुंदर.

[ १८ ]

मुंबई, डिसेंबर.

प्रिय विभाकर,

...शशिकांतानं कहर केला ! कालचा सारा दिवस म्हणजे साऱ्या मुंबईत किती धांदलीचा गेला. जिकडे तिकडे भयाण उदासीनता दिसत

होती, जिवाला कापीत होती. मागच्या सारखाच शशिकांत काल सकाळपासून नाहींसा झाला होता. जीव मुठींत धरून, मागच्या सारखाच तो आजही परत येईल, अशा आशेनं आम्ही साऱ्यांनीं रात्रीं साडे अकरापर्यंत त्याची वाट पाहिली. पुढं मात्र कुणालाच धीर निघेना. कुठं शोधणार त्याला! सारीं मिळूनच गेलों कॉंग्रेस हॉस्पिटलमध्यें—वाईट तेंच पाहिल्यांदा मनांत येतं म्हणून आम्ही कॉंग्रेस हॉस्पिटल गांठलं. त्यावेळीं मनांतल्या दुष्ट चितेनं फसवलं नाहीं. तिथं शशी एका स्वतंत्र खोलींत बेशुद्ध होऊन पडला होता! त्याच्याभोंवतीं एक डॉक्टर आणि दोन नर्सेस चिंताक्रांत होऊन उभ्या होत्या. माझ्या शशींचं सारं डोकं बॅंडेजनें बांधून टाकलं होतं. त्याला केव्हां जखम झाली. कशी तें डॉक्टरानांदेखील माहीत नव्हतं.

चौपाटीवर साऱ्या लोकाचा लोंढा लोटत होता. शिपाई, स्वार त्यांना मागं लोटित होते. त्या धांदलींत एका फुटपाथवर बेशुद्ध स्थितींत पडलेला माझा शशि कॉंग्रेस हॉस्पिटलच्या स्वयंसेवकांना सांपडला. त्याच्या डोक्याला जबर जखम झाली आहे!

त्याच्या डोक्याच्या बॅंडेजिसमधूनही वर आलेलं ताजं रक्त पाहून प्रथम माझ्या काळजाचा थरकांप उडाला! अंग पळापळाला शहारून निघालं!! छाती फोडून हुंदका बाहेर आला!!!

सारी रात्र झोंप नाहीं; शशिकांताचं रक्त एकसारखं डोळ्यापुढं दिसत होतं!

विभाकर—माझ्या शशीचं रक्त सांडलंय्; माझ्या वृद्ध बाबांच्या एकुलत्या एका आशेला जबर धक्का बसला.

कालच रात्रीं मी बाबांच्या पायांची शपथ घेतली कीं माझ्या शशीचं रक्त सांडणाऱ्या संस्थेशीं संबंध असणाऱ्या कोणत्याही व्यक्तीशीं मी कसलाही संबंध ठेवणार नाहीं. मग ती व्यक्ती कोणीही असो. समजलं ना विभाकर?

तुमची

**सुंदर.**

[ १९ ]

मुंबई, डिसेंबर—

प्रिय विभाकर,

...बाबा आई काल आलीं. शशीला धनुर्वात झाला आहे. डॉक्टर म्हणतात, त्याच्या जीविताची आशा थोडी—फार थोडी आहे. विभाकर, माझा धीर खचला आहे. तुम्ही या—या प्रसंगीं माझ्या अगदीं जवळ जवळ या—मला जवळ घ्या. आई बाबांच्या तोंडाकडे पाहवत नाहीं. विभाकर या—या—या...

तुमची

सुंदर.

[ २० ]

मुंबई, डिसेंबर—

विभाकर,

...व्हायचं तें झालं.—आमचा शशिकांत आम्हांला सोडून गेला! हंसत खेळत आम्ही दोघं मुंबईला आलों; मी एकटीच रडत पुण्याला जाणार!! मला टाकून आमचा शशी स्वर्गांत कसा गेला असेल कुणाला ठाऊक? आई बाबांना अन् मला सोडून जावं लागलं म्हणून तोही डोळे पुशित, फिरफिरून मागं पाहातच गेला असला पाहिजे नंदनवनांत. नंदनवनांत त्याला नवीन तें काय वाटणार? उलट, आपली आई, ताई इथं नाहींत हें पाहून नंदनवनांत त्याला स्मशानाची भीषणता आढळत असेल. यात्रेंत चुकलेल्या मुलासारखा आम्हांला शोधीत आमचा शशी हिरमुसल्या तोंडानं स्वर्गांत हिंडत असेल! असं कसं हो झालं विभाकर?

आईनं धरणी धरली आहे. बाबा गंभीरपणानं सगळ्यांचं सांत्वन करतात खरं. पण त्यांच्या खचलेल्या मूर्तीकडे पाहून दुःखाचा डोंगर पोटीं घालतांना त्यांना किती कष्ट होताहेत हें उघड उघड दिसतं! उद्यां आम्ही परत पुण्यास जाणार. तुम्ही निदान चार दिवसांची तरी रजा घेऊन पुण्याला या ना. बाबांना तितकंच बरं वाटेल—अन् तुमच्या खांद्यावर मान टाकून मनमुरादपणानं एकदा अश्रु गाळले, म्हणजे मलाही तितकं हलकं वाटेल. मग येतां ना?

तुमची,

सुंदर.

[ २१ ]

विभाकर,

...तुम्हाला हृदय आहे का हो ? सहज मागच्या पत्रांत " असं कसं हो झालं, विभाकर ! " असं मी लिहून गेलें ती काय, अन् तुम्ही आपल्या उत्तरांत त्याचं इतकं मोठं पर्व केलंत तें काय ? शशी माझ्या हटवादी-पणापायीं आम्हांला सोडून गेला, असं तुमचं म्हणणं ! असेल——तसंही असेल, पण मला हट्टाला कुणी पेटविली ? तुमच्या अंमलदारी हुकूमबाजी-नंच कीं नाहीं ?

शशिकांताच्या मरणाचं आदिकारण तुम्ही ! शशिकांताचं रक्त पाहून मी केलेल्या प्रतिज्ञेला तुम्ही पराकोटीचा स्वार्थ म्हणतां काय ? म्हणा बापडे ! पण त्याच्या आधींची माझीं पत्रं वाचून पाहायची तसदी एकदां तरी घेतली असतीत, तर बरं झालं असतं. शशिकांताच्या जखमे-तून बाहेर पडलेलं रक्त पाहून, पूर्वी माझ्या हृदयाला पडलेला पीळ घट्ट झाला, हें तुम्हांला स्पष्टपणं कळून आलं असतं. स्वार्थापोटीं असो कीं कसंही असो, माझी प्रतिज्ञा मी आजन्म पाळणार. तुम्हाला जर माझ्याशीं लग्न करायचं असेल, प्रत्यक्ष भेटींत व पत्रांतून माझ्यावरच्या प्रेमाची भाषा ही एका विलायती वेड्याची निरर्थक बडबड ठरवायची नसेल तर तुम्ही—येतंय् ना ध्यानांत ?–तुम्ही आपली नोकरी मुकाट्यानं सोडून दिली पाहिजे; नाहीं तर...पण मला तुमचं नक्की उत्तर पाहिजे. एक संबंध आठवड्याची मुदत देतें तुम्हाला मी.

तुमची
सुंदर.

\+ + +

प्रियाताई,

विभाकरांना मी पाठविलेल्या निर्वाणीच्या पत्राची कॉपी वर दिली आहे. मुंबईतून मी त्यांना लिहलेलीं सर्व पत्रं तूं पाहिलेलीं आहेसच. मी, सर्व पत्रांनंतर व त्यांच्या चढेल उत्तरांनंतर, माझं हें पत्र म्हणजे लॉजिकल

कन्क्ल्यूजन नव्हे का? कां या प्रकरणांतही "उतावळी आणि भावनेनं विवश झालेली वेडी" असाच शेरा तूं माझ्या माथीं मारणार आहेस?

खरं सांगूं? तावातावानं पत्र लिहिलं, तशीच उठून पोस्टांत गेलें, अन् पत्र पेटींत गडप झालं मात्र अन् असं झालं आहे म्हणून सांगूं! कसं तें सांगतां येणार नाहीं. मला समजंतय् तेव्हांपासून जिवाशीं जतन करून ठेवलेली आशा, अशी पणाला लावूं पाहतांना मला काय यातना होत असतील याची कल्पना कर! एकदां वाटलं, विभाकरांना एकदम अर्जंट तार करावी, अन् माझं तें पत्र वाचूं नका असं विनवावं. हा विचार पुरा होतो न होतो, तोंच माझ्या शशिकांताची मुद्रा माझ्या डोळ्यापुढं दिसूं लागली. जखमेंतून टिबकणाऱ्या रक्ताकडे बोट दाखवून, केविलवाण्या मुद्रेनं तो माझ्याकडे पाहात आहेसं वाटलं! खोटं वाटेल तुला हें कदाचित्...पण यांतल एक अक्षर खोटं नाहीं. दोन आठवड्यांपूर्वी मुंबईत भस्म झालेल्या शशीची मुद्रा दिवसाच्या झगझगीत प्रकाशांत या पुण्यांत मला स्पष्ट दिसली! मनाला असह्यसा ताण पडल्यानं तसा भास झाला असेल कदाचित्, पण तो मनाला झोंबला हें खास! त्यासरशीं विभाकरांना तार करण्याचा विचार वावटळींतल्या पाचोळ्यासारखा पार कुणीकडच्या कुणीकडे उडून गेला!...

तुझी कष्टी बहीण,

सुंदर.

[ २२ ]

पुणें, जानेवारी.

विभाकर,

......विभाकर, पुन्हां एकदां नीट विचार करण्याची मुदत मला कशाला दिलीत? लग्न मोडण्याची धमकी तुम्ही देऊं पाहतां? विभाकर, तुम्हाला मराठी समजतं कां हो? लग्न मोडण्याची सूचना पर्यायानं मी तुम्हाला दिली आहे. उठतां बसतां तुमच्या मुद्रेकडे पाहून वागण्याची गुलामवृत्ति पत्करण्याचं एका मुलीनं नाकारलं, म्हणून "मला तुझी गरज नाहीं" असं सांगण्याचं समाधान तुमच्या पारंपरिक पुरुषी वृत्तीला मी

मुळींच मिळूं देणार नाहीं. मीच तुम्हांला सांगतें. ज्याला आपल्या भावी पत्नीच्या मनाच्या समाधानासाठीं आपल्या नोकरीचा राजिनामा देववत नाहीं, आपल्या हव्यासावर पांघरूण घालण्यासाठीं दुसऱ्याकडे 'स्वार्थी स्वार्थी' म्हणून बोट दाखविण्याइतका जो उलट्या वृत्तीचा आहे, अशा माणसाशीं मला कांहींही कर्तव्य नाहीं. मग लग्नाची गोष्ट कशाला ? हा झाला वैयक्तिक निकाल. पुढंही पण माझी अशीच प्रतिज्ञा आहे कीं, सरकारी नोकरींत असलेल्या कोणत्याही माणसाची सहचारिणी ही सुंदर होणार नाहीं.

आई बाबांना आतां मीच मुलाच्या ठिकाणीं आहे; म्हणून मला यापुढं लग्नाचा विचार कर्तव्य नाहीं. त्यांच्यामागं ?–अवघड प्रश्न आहे–पण तो सोडविण्याची बुद्धी आणि धैर्य परमेश्वर मला देईलच देईल. शिवाय माझी प्रियाताई–तीही माझ्यासारखीच–नव्हे मी तिच्यासारखीच एकाएकीच आयुष्याचा प्रवास करणार आहे...

आपल्या दाबत्या मुठींत मावणाऱ्या एखाद्या मेणाच्या जिवंत पुतळीशीं तुम्ही खुशाल आपला संसार थाटा...

सुंदर.

प्रियाताई, वरचं पत्र पाहून माझ्या लग्नाची ट्रॅजेडी मी कशी केली तें तुला कळून येईल. आई बाबांना माझं करणं मुळींच आवडलं नाहीं. पण पुढं मागं मी केलं तें योग्यच केलं अशी त्यांची खात्री पटवून देईन अशी मला उमेद आहे. गडे, प्रियाताई, माझा अंत नको पाहूं आतां. तुझ्या सहवासासाठीं कशी मी तळमळतें आहे बघ. शक्य तितक्या लवकर पुण्याला ये.

तुझ्या वाटेकडे डोळे लावून बसलेली

सुंदर

[ २३ ]

प्रिय सुंदर, मुंबई,

......काय योगायोग पाहा ! स्वातंत्र्यदिनाच्या दिवशींच तूं विभाकरांना शेवटचं पत्र लिहिलंस आणि स्वतंत्र झालीस !

वेडे, ही ट्रॅजेडी झाली का कॉमेडी ? मला तर ही एक सुंदर कॉमेडी वाटते आहे. तुला जर ट्रॅजेडी वाटत असेल तर मग तुझ्या त्या त्यागाची योग्यता फारच कमी ठरते. हंसतमुखानं केलेला त्याग, स्वर्गाच्या सिंहासनाच्या किंमतीचा असतो. नाइलाजानं म्हणून रडव्या तोंडानं सोडलेलं उदक स्वार्थानं गढूळ झालेलं असतं. मला वाटतं, आला लेखणीशीं म्हणून तूं ट्रॅजेडी शब्द लिहिलास; होय ना ?

काकांचं समाधान, त्यांची परोपकारी बुद्धी, अन् त्याची आत्यंतिक त्यागाची तयारी तुझ्या रक्तांत कशी आणि कां उतरली नाहीं, हा प्रश्न आजवर मला सुटत नव्हता. आतां तो सुटला. मावशीच्या रक्ताचा अंश काकांच्या रक्तांत मिसळून जाऊन त्यांच्याशीं एकरूप व्हायला तुझ्या आयुष्याच्या पहिल्या एकोणीस–वीस वर्षांचा अवधी अवश्य होता. शशिकांताच्या रक्ताच्या दर्शनानं तुझ्या हृदयांत वादळ उत्पन्न झालं, त्या वादळांत मावशीचं रक्त काकांच्या रक्तांत कसं मिसळून गेलं आणि काकांच्या असाधारण वृत्ति तुझ्या रक्तांत केव्हां आणि किती खळवळूं लागल्या, तें कुणाच्याच लक्ष्यांत आलं नाहीं एक माझ्याखेरीज. सुंदर, काय ग ओवाळून टाकूं तुझ्यावरून ? तुझं धैर्य, तुझा–निश्चय, तुझा त्याग, इतका अलौकिक आहे कीं, तुझ्यावरून माझा जीव ओवाळून टाकला तर तो थोडाच होणार आहे ! केव्हां एकदां तुला कडकडून भेटेन असं मला झालं आहे ! पण तें पंधरा दिवसांनंतर घडून येणार ! निकडीच्या कामासाठीं बाबा नागपूरास गेले आहेत, त्यांना परतायला इतका अवधि लागणारच.

तुझी

प्रियाताई.

[ २४ ]

प्रिय प्रियाताई,

पुणें फेब्रुवारी.

Y. W. A. G. S. A. म्हणजे Young Women Anti-Government Service Association या नांवाची संस्था काढायचं मी निश्चित केलं आहे. तुझ्या येण्याचीच मी वाट पहात आहें. लवकरच ये.

तुझी

सुंदर

मुंबई, फेब्रुवारी

प्रिय सुंदर,

संस्था काढण्याच्या फॅडनं तुला पछाडलेलं पाहून जीव व्याकूळ झाला. सबंध प्रहरभर बेशुद्ध होतें तुझं पत्र पाहून! बाई, काय झटपट लागलीस त्या फॅडनं! संस्था काढण्याचा पक्का रोग सांसर्गिक आहे म्हणे. तेव्हा तूं त्या रोगांतून पुरती बरी झाल्याशिवाय मी पुण्याला येतच नाहीं कशी!...

तुझी
प्रियाताई.

———

# ४ मोडी

जानकीला जाऊन एक महिन्याच्या वर दिवस लोटले होते. अंदाजें पहिला पंधरवडा रघुनाथानें कसाबसा कुऱ्याच्या कडकपणानें थोडाफार नेटानें घालविला होता. पुढचे कांहीं दिवस जानकीच्या प्रणयासक्त वृत्तीच्या आणि विशेषतः प्रेमप्रधान हळुवार मनाच्या भरंवशावर त्यानें लोटले होते. आपल्या सहवासांत अंतर पडतें, म्हणून कामकाजासाठीं–पोटाच्या उद्योगासाठीं–कोर्टकचेरींत जाणाऱ्या रोजखर्चाचा काळ आपल्याला बहाल करावयास ती कशी नाइलाजाची खुषी दाखवीत असे; निद्रेच्या निशेनें निःश्चेष्टता येऊन, आपल्या सहवासांत नैसर्गिक सक्तीपायीं पडणाऱ्या खंडाची खिंड होईल तितकी अरुंद करण्यासाठीं जानकीची किती धडपड चाललेली असे; वगैरे सर्व लहानमोठ्या आठवणी रघुनाथरावाला धीराचा पाठिंबा देत होत्या. ‘ आणखी किती दिवस दम धरूं शकेल ? झाले तीन आठवडे. यापुढें त्या प्रेमळ जीवाला आपल्यापासून अधिक काळ दूर राहतां येणें अशक्य आहे ’ असें त्याचें मन त्याला वरचेवर बजावत होतें. तीन आठवड्यांनंतर मात्र त्याचा धीर पांढऱ्या मातीच्या ढिकळया-प्रमाणें ढपल्याढपल्यांनी ढांसळूं लागला. आपल्यासारखीच बायकांनाही ईर्षा असते, असें चुकूनमाकून वाटण्याचा प्रसंग त्याच्या सातआठ वर्षांच्या संसारी जीवनांत चुकूनही आलेला नव्हता. त्याचें मत तेंच जानकीचें मत; असा त्यांचा कारभार होता. एका संस्थानिकाचा आणि एजंटसाहेबाचा असा करार झाला होता, कीं जेथें त्या दोघांचा मत-भेद होईल, तेथें साहेबबहादुरांच्या मताप्रमाणें विवादित प्रकरणाचा निकाल लावावयाचा; ज्या कामीं दोघांचें एकमत होईल, तें काम श्रीमंतांनीं खुशाल आपल्या मताप्रमाणें काढावें. श्रीमंत मजकूर सारा जन्म, आपल्या मताप्रमाणें राज्याचा कारभार बंदोबस्त चालला आहे या खुषीनें आयुष्याचे दिवस काढीत होते; साहेबासारख्या

मोठ्याचें जें मत तेंच आपलें असें संस्थानाधिपतींनीं एकदांचें कायमचें ठरवून टाकलें असल्यामुळें, एजंटबहादुरांच्या आणि त्यांच्यामध्यें मत-भेदाचा थोडाहि कडवटपणा कधींहि निर्माण झाला नाहीं. त्यामुळें, करारबरहुकूम, श्रीमंताच्या शहाण्या बुद्धीनें संस्थानचा कारभार चालला होता ! एजंट निश्चित होता, संस्थानिक आपल्या खुषीच्या तानेंत मस्तान होते ! रघुनाथ-जानकीच्या प्रपंचाची अवस्था संस्थानच्या कारभारासारखी होती. जानकीची भूमिका संस्थानिकाची आणि रघुनाथाची एजंटाची ! आपण या चिमुकल्या गृहराज्याची स्वामिनी आहोंत, सासूबाई-मामंजींचा दरारा राहिला दूर अंतरावर; आपण करूं तें कारण आणि बांधूं तें तोरण. अशा अंतरींच्या समाधानानें जानकी संसारानंदांत तल्लीन असे; रघु-नाथाच्या व्यतिरिक्त आपल्याला अस्तित्व असें नाहींच अशी तिची 'आर्यन' घाटाची पक्की समजूत असल्यानें 'दोन मतें' अशा 'भेदी' शब्दांचे निरनिराळे ध्वनि, सहा सात वर्षांत, त्यांच्या घरांत चुकूनही कधीं ऐकूं आले नव्हते.

गतवर्षी, मार्गशीर्षांत, जानकी आपल्या तिसऱ्या बहिणीच्या लग्नाला माहेरीं गेली, तिकडे चांगली तीन एक महिने राहिली; आणि तेव्हांपासून, स्त्रीवक्त्यांच्या ठराविक ठशाच्या उपमेंत आणि शब्दांत सांगावयाचें म्हणजे, रघुनाथराव कांबळे, बी. ए., एल्एल्. बी. ॲडव्होकेट, यांच्या संसाररूपी रथाचें डाव्या बाजूचें चाक एका प्रश्नाबाबत मोठीच उचल घेऊन बराच खडखडाट करूं लागलें; अर्थातच एका चाकानें उंच-सखलीचा प्रवास सुरू केला, म्हणजे त्याच्याशीं विवाहरूपी कण्यानें संलग्न झालेल्या दुसऱ्या चक्रालाही धक्के बसतात. आणि तेंही आपली चाकोरी चुकवून आपल्या परीनें आणि बाजूनें खडखडाट सुरू करतें !

रघुनाथ आणि जानकी यांच्यामध्यें भेद उत्पन्न करणारें मत मोलाच्या अनेक जड जिन्नसांबरोबर जानकीनें माहेराहून परत येतांना आपल्याबरोबर आणलें होतें. आपण 'हिला' मागें ठेवून आलों, तीच मोठी चूक झाली, असा पश्चात्ताप करण्याचा प्रसंग रघुनाथवर आला.

मतभेदाची बाबत अगदीं नाजुक, बौद्धिक दृष्ट्या रघुनाथाला महत्त्वाची आणि जानकीला परत आल्यापासून अत्यंत जिव्हाळ्याची अशी होती.

त्या दांपत्यांत विरोध उत्पन्न करणाऱ्या विषयावर रघुनाथानें आपल्या मित्रमंडळींत कित्येकदां कडाडून वाद केले होते; आपलें मत प्रस्थापित करतांना 'आधीं केलें आणि मग सांगितलें' असा उघड बाणा त्यानें दाखविला होता. इतकेंच काय, परंतु, बराचसा मिधे-पणा पत्करून, जोरकस वशिले लावून, गेल्या सालींच त्यानें सबंध तीन सार्वजनिक गणपतींपुढें त्या आपल्या आवडत्या विषयावर लांबलचक व्याख्यानेंही दिलीं होतीं. परंतु, त्याच विषयावर मत-भेद होऊन रागारागानें आपली बायको आपल्याला सोडून गेली, असें खोलींत एकटा असतांना, हळूहळू स्वतःशीं पुटपुटावयालाही तो तयार नव्हता. अशा स्थितींत, 'मतासाठीं बायकोचीही परवा केली नाहीं' असें दिमाखानें आपल्या मित्रांना सांगावयाला तो कसा सिद्ध झाला असता ? एक तर घडलेली हकीकत नवरेपणाच्या नखऱ्याचा नकशा उतरल्याची होती. दुसरें असें कीं, मतभेदाचा विषय असा होता कीं, त्यावर सार्वजनिक आणि सामुदायिक दृष्ट्या एक वेळ, थोडासा निर्लज्जपणाच पत्करून, हवी तितकी वाचाळपंचविशी करतां आली असती—येत असते. परंतु, तो विषय स्वतःच्या घराला चिकटला म्हणजे त्याबद्दल एक अक्षर उच्चारावयालाही जीभ तयार होत नाहीं. निदान रघुनाथाच्या मनाची तरी स्थिति तशी होती.

खरें म्हटलें तर रघुनाथासारख्या धडाडीच्या वकिलाच्या मनाची तशी कमकुवत स्थिति व्हावयाला नको होती. परंतु, वकिलालाच आरोपी म्हणून न्यायासनासमोर उभें राहण्याचा प्रसंग आला, म्हणजे इतरांना धीर देणारें त्यांचें कायद्याचें आणि न्यायासनाच्या यंत्राचें ज्ञानच त्याला अधिक गर्भगळित करतेंच कीं नाहीं ?

'संततिनियमन' हा रघुनाथराव कांबळे, बी. ए. एल्एल्. बी. ॲडव्होकेट, यांच्या जिव्हाळ्याचा विषय होता. गेलीं सातआठ वर्षें त्यानें मोठ्या कळकळीनें आपल्या लाडक्या जानकीला त्या विषयासंबंधीं हवें तेवढें शिक्षण दिलें होतें; व त्या 'प्रिय शिष्ये'नें ती ज्ञानगुटिका गतसाला-पर्यंत मुकाट्यानें गिळली होती.

गेल्या सालीं जानकी आपल्या तिसऱ्या बहिणीच्या लग्नाच्या निमित्तानें माहेरीं गेली, ती तीन एक महिने तिकडेच राहिली, आणि त्या कारणानेंच त्या विषयावरचें तिचें मत बदललें.

जानकीप्रमाणेंच तिची नं. २ ची बहीणही नं. ३ च्या लग्नाला आली होती. तिचें जानकीच्या मागून चांगलें चार एक वर्षांनीं लग्न झालें होतें पण तेवढ्यांत तीन चांगल्या गुटगुटीत खेळत्या रांगत्या मुलांनीं देवानें तिची ओटी भरलेली होती. एक चिकटून उभें आहे, दुसऱ्यानें तर पायांना मिठीच घातली आहे आणि तिसरें एका हातानें आईच्या मानेला विळखा घालून, दुसऱ्याच्या आधारानें आपलें उच्चस्थान टिकवून आहे, हें विसरून जाऊन दैवानें कमी दर्जावर असलेल्याना तुच्छ लेखणाऱ्या एखाद्या घमेंडखोर संस्थानिकाच्या ऐटीनें आईच्या आडव्या हाताच्या हिंदोळ्यावरून हेलावणारे आपले भरलेल्या उंसाच्या कांडक्यासारखें दिसणारे गोड पाय, तिच्या पायाशीं असलेल्या आपल्या वडील भावंडापुढें मोठ्या दिमाखानें नाचवीत आहे आणि त्या सर्वांकडे स्नेहसपन्न नजरेनें, स्मितसुंदर मुखानें आणि मातृवैभवाच्या दिमाखानें पाहत असलेल्या आपल्या धाकट्या बहिणीला पाहण्याचे स्पृहणीय प्रसंग जानकीला त्या तीन महिन्यांत शेंकडोंवारीनें आले होते. प्रत्येक प्रसंगीं तिला आपल्या बहिणीचें कौतुक वाटत असे यांत शंकाच नाहीं; परंतु तो प्रसंग प्रत्यक्षांतून स्मरणाच्या सावलींत शिरला, कीं जानकीच्या हृदयाला कसली तरी कळ लागल्यासारखी वाटे. ती कळ रडविणारी नसे. हमखास हंसविणाऱ्या गुदगुल्यांची नकोनकोशी वाटणारी ती कळ असे. त्या कळीनें हृदयाची व्यथा थांबली, कीं तिला त्या बाबतींतील स्वतःच्या वैगुण्याची आठवण होई, आणि जंगली लांकडाच्या निखाऱ्यांतून उडणाऱ्या असंख्य ठिणग्यांचे चिमुकले चिमुकले चटके बसावेत, तसे चटके तिच्या मनाला बसूं लागत. गृहसौख्याला संपूर्णता देणारीं सर्व साधनें लहान बहिणीहून जानकीच्या हाताशीं अधिक जवळ होतीं. तरी पण गृहिणीवैभवाच्या तोलानें जोखून पाहतां, आपण सर्वांच्या दयेला पात्र होण्याइतक्या एका अर्थी दरिद्री आहों, असें जानकीला वरचेवर वाटूं लागलें. “पहा धाकटीनं कशी आघाडी मारली! नाहीं तर तूं!” असें माहेरच्या शेजारपाजारणी जानकीला स्पष्टपणें तोंडावर

हिणवीत असत. त्यामुळें तर मातृपदवैभवाचा आपल्या ठिकाणचा अभाव जानकीला पदोपदीं जाणवूं लागला, जाचूं लागला.

तशांत आणखी एका गोष्टीची भर पडली. जानकीच्या बहिणीचा सर्वांत लहान मुलगा बाबू यानें ती भर टाकली. दुहेरी मोगऱ्याचा उमलता कळा, निर्मळ आनंदाच्या नंदनवनाचें वैभव दाखविणारा दिव्य दृष्टीचा जसा कांहीं एक डोळाच, हंसता खिदळता पौर्णिमेचा संध्याकाळचा चांदोबा, किंवा आपल्या निरर्थक वाटणाऱ्या बोबड्या बोलांनीं मानवी जीवनाच्या परिपूर्ततेचा· वेदांत विशद करणारा बृहस्पतिच असें बाबूचें वर्णन केलें, तर तें कांहीं अतिशयोक्तीचें वाटलें नसतें. जानकीला तर तो ' माच्छी माच्छी ' करून पहिल्या दिवसापासून चिकटलाच होता. दिवसाकांठीं तासन् तास तो 'माच्छीला' बिलगून असे. त्याच्या अनंत लीलांच्या वशीकरणानें भारून गेल्यानें जानकी भोंवतालच्या जगालाच काय, स्वतःलासुद्धा पार विसरून जात असे. परंतु, खेळतां खेळतां मध्येंच त्याला असा कांहीं जोरकस उमाळा येई कीं, 'आय पायज्ये' म्हणून तो धोशा घेई. जानकीनें नाना प्रकारांनीं त्याची समजूत करण्याचे कितीही प्रयत्न केले, तरी आई पाहिजे हा त्याचा मंत्र किंवा त्या मंत्रामागूनच 'आ'कारी सूर कांहीं मदावत नसे. जों जों समजूत काढण्याचा जानकीचा यत्न अधिक, तों तों त्याचा वेदघोष अधिकच जोरकस होई ! ' जा बाबा आपल्या आईकडे. भगीरथाच्या तपश्चर्येनं स्वर्गाची गंगा पृथ्वीवर आणतां येईल, पण आईच्या आठवणीनं ओढ घेऊं लागलेल्या मुलाच्या मनाला आईखेरीज दुसरीकडे वळवणं भगिरथालाच काय, त्याच्या देवालाही शक्य नाहीं ! शेवटीं जिकडचं तिकडच जायचं !' असें कुरकुरत जानकी त्याला आपल्या बहिणीच्या हातीं द्यावयाची. आईचा निसटतापुसटता स्पर्श होतांच बाबू रडतां रडतां ' माच्छी'कडे पाहून खुदकन् हंसावयाचा. त्याच्या हंसण्यानें जानकीच्या अंतःकरणाला इंगळी डसल्याप्रमाणें वेदना व्हावयाच्या ! ' हाच बाबू माझा असता, तर तो ' आय पायज्ये ' म्हणून झांप टाकून आपल्याकडे आला असताच कीं नाहीं ? तें कांहीं नाहीं; जीवनाच्या सार्थकतेचं

साधन आपलें असलें पाहिजे. लोकांच्या दानावर संसाराचा जन्म झाला, तरी जन्मभर त्या साधनांवर संसाराची गुजराण जशी कधींहि करतां यायची नाहीं, तसाच मुलाच्या मायेचा शोष दुसऱ्यांच्या मुलांच्या लाखों मुक्यांनींहि कमी व्हायचा नाहीं. तें कांहीं नाहीं. आपला अगदीं खास आपलाच ' बाबू ' आपल्याला हवा. '

अशा महत्त्वाच्या दृढमूल झालेल्या आकांक्षेनें भरून गेलेल्या अंतःकरणानें जानकी माहेराहून परत आलेली होती.

\+ + +

लाडिकपणाची मागणी, हट्ट, ईर्षा, अभिमान, दुराग्रह अशा परंपरेनें जातां जातां शब्दाला शब्द, मुद्याला मुद्दा आणि वादाला हटवाद येथपर्यंत, रघुनाथ आणि जानकी यांचा, जानकीला हवाच हवा असलेल्या ' बाबू 'च्या विषयावरचा ऊहापोह जाऊन पोहोंचला होता. चारसहा महिन्यांत वादावादाचे वाख वळले जाऊन दोघांच्याही अंतःकरणांत दुरभिमानाचे पीळ पडून द्वेषाचा दोर तयार होण्यापर्यंत मजल गेली होती. दुरभिमानाचे पीळ पडत अंतःकरणांत द्वेषाचा दोरा तयार झाला, कीं हृदयबंधनें ताड्ताड् तुटून जातात !

" तुम्हांला काय होतं वाटेल तें मागणं मागायला ? आम्हाला संसाराच्या गाड्याला द्रव्याचं वंगण शेवटपर्यंत पुरवायचं आहे, बायकांच्याइतका बेजबाबदार प्राणी दुसरा कोणी जगात नसेल. तुमची जन्माची जिम्मेदारी आम्ही खांद्यावर वाहिली पाहिजे. तुमचीं मतं डोक्यावर घेऊन नाचलं पाहिजे, तुमचे शब्द वरच्यावर झेलले पाहिजेत, तुमच्या एकूण एक इच्छा आम्ही पुरवल्या पाहिजेत ! त्यांत जरा चूक झाली रे झाली, कीं पुरुष सुलतानशहा आणि स्त्रिया गुलाम अशी ओरड आहे ! गुलामांनीं धन्याला मातीला मिळवून दिल्लीला राज्य स्थापलं, तरी ' गुलामघराणं ' म्हणून इतिहासांत आपलं नांव कायमचं कोरून ठेवलं. अगदीं थेट तीच रीत तुम्हां बायकांची ! स्त्रिया गुलाम ! खरंच गुलाम–मुलखाच्या स्वार्थी अन् लबाड ! भावनेच्या पुतळ्या म्हणे ! पक्या बुद्धिजीवि असतात त्या !

राणीच्या राज्यांतल्या भांडवलशाहीनं पसरवलेल्या पुराण्या कल्पनांच्या भांडवलशहांना दिसतं कुठं ?–" रघुनाथ जरा मोठ्या आवाजांत व्याख्यान-बाजीच्या रंगाला आला होता. मध्येंच जानकीनें विचारलें, "मातृपदाची अनिवार इच्छा ही तर भांडवलशाही नव्हे ना ?"

"ती तर जगांतून कधींही नाहींशी न होणारी भांडवलशाही आहे. समाजाची संख्या वाढवून दुर्बलांना पादाक्रांत करण्याच्या महत्त्वाकांक्षेनें वेड्या झालेल्या पूर्वीच्या बलवंतानीं आपला हेतु साधण्या-साठीं बायकांच्या बुद्धीला 'तुम्हाला मातृपदाचा ध्यास असतो,' असं पटवलं; आणि ती शिकवण युगान् युगं जिवाशीं बाळगून बाळगून बायकांनीं तिला भूकतहानेसारख्या सहजशा गरजांइतकंच महत्व आणून ठेवलं आहे—"

"कुठल्या ग्रंथांतलं हें पांडित्य पाठ म्हणून दाखवतां आहां ?" जानकीनें चिडून विचारिलें.

"हो हो, आम्ही तेवढे पोपटी पंडित, आणि तुम्ही ? स्वयंप्रका-शित बुद्धीच्या ! एक कवडी मिळवतां येत नाहीं—"

"हीच नाहीं वाटतं पुरुषांची भांडवलगिरी ?"

"असेल–तुम्ही भांडवल मिळवा आणि करा भांडवलगिरी–मला हा वाद नको आहे. एका मुलामागं वयाचीं पंचवीस वर्षें होईतों कमींत कमी तीन हजार रुपये तरी खर्च आहे–ते ज्या राणीजवळ असतील, तिनं मातृपदाचा ध्यास हवा तर धरावा. तुझ्यासारख्या परोपजीवि बायकांनीं आपली खोटी भूक भागवण्यासाठीं नवऱ्याला निष्कारण तांत लावणं म्हणजे निव्वळ जुलूम आहे. मी असल्या जुलुमापुढं मान वांकवणं शक्य नाहीं." शेवटचें वाक्य रघुनाथानें चौपाटीवक्त्याच्या आवेशानें आराम-खुर्चीच्या पायठ्यावर बुक्की मारून धडकावून दिलें होतें !

"बापाजवळ स्वतःच्या कमाईचे दीड हजार रुपये असतील, तर आईजवळही उरलेले दीड हजार रुपये होतील तयार !"

"बापाला 'बाबू'ची मुळींच गरज नाहीं; काय म्हणून त्यानं दीड हजार रुपये तयार करावे ?"

" कारण, ते या जन्मांत मिळवण्याची धमक नाहीं, याची मनोमय खात्रीच आहे. मामंजींच्या मत्तेवर—"

जानकीचा टोला रघुनाथाच्या वर्मावर लागला. " फार बोलायला लागली आहेस अ तूं आज. पुनः असं म्हण तर खरी—"

" काय कराल ? खरं बोलायला मी कुणाच्या काकाला भीक घालायची नाहीं. "

" लाथ मारून काढीन घराबाहेर ! "

" काय बिशाद आहे ? "

" बिशाद आहे ? आण प्रसंग—आणि पहा विषाची परीक्षा ! "

" बरं आहे; मीही पाहीन लाथ हाणायला पाय कसा वर होईल तो. इवेंतच लाथा झाडीत बसावं जन्मभर. "

रघुनाथाला जानकीच्या बोलण्याचा बोध कांहींच झाला नाहीं. त्यानें जीभ आवरली आणि त्या दिवसापुरता वाद आटपता घेतला.

दुसऱ्या दिवशीं रघुनाथ कांबळे, बी. ए., एल्‌एल्. बी., ॲडव्होकेट, आपलें कोर्टांतील एखादें अर्धें काम चालवून चाराच्या सुमाराला घरीं आले, तेव्हां त्यांच्या ' रामानें ' ' बाई ' तीनच्या एक्स्प्रेसनें गांवीं गेल्याचें सांगितलें.

सर्दीनें धुंदावलेल्या डोक्याला तपकिरीच्या चिमटीनें झिणझिण्या याव्यात, त्याप्रमाणें गड्यानें सांगितलेल्या निरोपानें रघुनाथाच्या डोक्याची अवस्था झाली. तो आपल्या खोलींत गेला. अपेक्षेप्रमाणें त्याच्या टेबलावर जानकीचें पत्र होतेंच. तें पत्र लहान नव्हतें. साधें नव्हतें. तें चांगलें लांबलचक असून रघुनाथाची जानकीनें त्यांत चांगलीच ही केली होती. "···लाथेची जरब सदोदित माथ्यावर घेऊन जिवंत मरणानं या घरीं रहावयाला तयार नाहीं. मलाही स्वतंत्र अस्तित्व आहे आणि स्वतंत्रपणें जन्म काढण्याची माझ्यांत धमक आहे. खुशाल आतां हवेंत लाथा झाडीत जन्म काढा, अगर खावं प्यावं-ल्यावं, नटावं, आणि अमक्या अमक्याची सुशिक्षित बायको म्हणून गांवांत मिरवावं; परंतु, संसाराच्या खऱ्याखुऱ्या

फळाला आंचवावं अशा रीतीनं संसार करायला मी तयार नाहीं. तुम्ही स्वार्थी आहांत, तुम्हाला सुख पाहिजे—पण त्या सुखाची किंमत द्यायला लागेल या भीतीनं तुमच्या हृदयाला थरकांप सुटतो...हा असला स्वार्थ पुरुषार्थाला खात्रीनं हिणकसपणा आणणारा आहे..."

एक ना दोन ! किती खऱ्या खऱ्या गोष्टी जानकीनें तिखटपणानें त्या पत्रात लिहिलेल्या होत्या !

सत्याचा तडाखा जगांतील कोणत्याही शस्त्राच्या तडाख्याहून अधिक हृदयभेद करणारा असतो. जानकीचें पत्र रघुनाथाच्या लेखीं तसेंच होतें. त्याला तिचा मनस्वी राग आला तें पत्र वाचून. परंतु तो राग म्हणजे वांझा बार. जानकीनें खिजविण्यासाठीं खवचटपणानें पत्रांत लिहिल्याप्रमाणें त्याला हवेंत लाथा झाडूनच रागशांति करणें भाग होतें. त्यानें हवेंत लाथा झाडल्या नाहींत, पण शेंपन्नासदां हवेंत हात झटकल्यानें हातांतील थर्मामिटरचा चढलेला पारा जसा शून्याकडे पळूं लागतो, तसा रघुनाथाच्या रागाचा पारा चार-सहा दिवस एकांतांत हातवारे केल्यानें हळुहळू उतरू लागला होता.

\+ \+ \+

तीन आठवडे लोटले, तरी जानकी परत येण्याचीं चिन्हें दिसेनात. तेव्हां रघुनाथाचा धीर खचूं लागला. जसजसा धीर खचूं लागला, तसतशी जानकीवांचून आपलें जीवित खरोखरीच अपुरें आहे आणि अर्ध्या जीवानें—अर्ध्या अंगानें आयुष्य कंठणें केवळ अशक्य आहे, असें त्याला तीव्रतेनें जाणवूं लागलें. आपण शिशुसंभवाविरहित प्रपचसुखाची सीमा साधावयाची प्रतिज्ञा केली, ती जानकीच्या नैसर्गिक आकांक्षा छिन्नभिन्न करून पार पाडण्याच्या खरोखरीच लायकीची आहे काय ? इतरानीं लिहिलें तें आपण वाचलें आणि जानकी म्हणाली त्याप्रमाणें पोपटपंचीनें बोलून दाखविलें. कित्येक तत्त्वें बिनमोल असलीं, तरी देशकालपरत्वें वैयक्तिक परिस्थितीच्या ताजव्यानें तोलून त्यांचें वजनमाप व किंमत ज्यानें त्यानें आपापल्यापुरती ठरवावयास हवीच हवी. सरसहा सोळाबारा असा व्यवहाराचा धारा ठरविला तर जगांत, समाजांत आणि एखाद्या घरां-

तही अनर्थ नाहींत का गुदरणार–निदान घरांत तरी खास अनर्थ गुदरतात–घर मोडकळीला येतें–मोडतें असा माझा मलाच अनुभव नाहीं का ?—छेः सारा मूर्खपणाच झाला. झालेला मूर्खपणा मुकाट्यानें कबूल करण्यासारखा विसकटलेली घडी साफसूफ करण्याला दुसरा उपाय नाहीं. असे किंवा अशा प्रकारचे असंख्य विचार हरघडीं रघुनाथाला नको जीवसें करून सोडूं लागले.

रघुनाथानें आपल्या श्वशुरांना पत्र लिहिलें. जानकीला जाऊन महिन्यावर दिवस लोटले, तेव्हां तिची शक्य तितक्या लौकर रवानगी करावी अशा आशयाचें जांवई घाटाचें तें रघुनाथाचें पत्र होतें.

तिसऱ्या दिवशीं श्वशुराकडून उत्तर आलें. जानकी माहेरीं फक्त एक आठवडाभरच होती. पुढें ती बनारसला निघून गेली. तेथील एका शाळेवर तिची एक बालमैत्रीण मुख्य अध्यापिका आहे, तिच्याकडे जानकी गेली होती.

जसजशी जानकी परतून घरीं येण्याची आशा दुरावूं लागली तसतसें रघुनाथाचें काळीज ठाव सोडूं लागले. ठाव सोडलेल्या काळजाकडून मेंदूला रक्ताचा पुरेसा पुरवठा होईनासा झाल्यानें तोही अशक्त झाला; आणि त्यामुळें स्वाभिमान वगैरे वगैरे विचार त्याच्या डोक्यांत येईनासेच झाले.

आधीं सासुरवाडीला जावें, तेथून जानकीचा पत्ता मिळवावा; काशीयात्रा करावी, गृहराज्ञीशीं द्रोह केल्याचें पातक गंगौघांत सोडून द्यावें, पवित्र व स्वच्छ मनाने जानकीची क्षमा मागून तिला परत आणावी, असेंही शेवटीं शेवटीं रघुनाथाच्या मनांत येऊं लागलें. परंतु तो विचार चटकन् अमलांत आणण्याची चपळाई मात्र त्याच्याकडून होईना.

\+ \+ \+

गड्यानें केलेल्या चहाचे घुटके घेत घेत रघुनाथ आपल्या 'हपिसांत' बसला होता. सुमारें सकाळचे नऊ वाजून गेले असतील.

"कोडतांतला ब्येलीफ आलाय्" रघुनाथाच्या गड्यानें वर्दी दिली.

रघुनाथाला आश्चर्य वाटलें. बेलिफ कां आला असावा याच
त्याला अंदाज करतां येईना. सबजजसाहेबांनीं संध्याकाळीं आपल्या घ
ब्रिज खेळावयास येण्याचा निरोप पाठविला असावा असें कांहींसें वाट
थोड्याशा खुषींत असतांच बेलीफ त्याच्यापुढें येऊन उभा राहिला
" समन्स आहे साहेब आपल्याला " बेलिफानें सांगितलें.

" मला समन्स ? कुणाचें ? " साश्चर्यानें रघुनाथानें विचारलें.

" समन्स-कोर्टाचें ! " बेलीफ बेफिकीरीनें व चेष्टेनें म्हणाला.

आश्चर्य आणि हेटाळणी याच्या भोंवऱ्यांत सांपडलेल्या रघुनाथा
क्षणमात्रही विचार न करतां सही करून देऊन आपल्या नांवचें समन
घेतलें. नको असलेलीं समन्सें खुशाल चुकविण्याचा बेशक सल्ला देणाऱ्य
वकिलानें खुशाल स्वतःच्या नावाचें समन्स लागू करून घेतलें. बेलिफाचं
'समजूत' घालून, समन्सासकट त्याला वाटेला लावणें कांहीं रघुनाथरा
कांबळे ॲडव्होकेट याना नवीन अथवा अवघड किंवा अशुद्धसें नव्हतें
पण पोहणाराच हमखास बुडतो म्हणतात !

" ज्याअर्थी मेहरबान कोर्टापुढें जानकीबाई भ्रतार रघुनाथ कांबळे
हिनें अन्नवस्त्राच्या मागणीसाठीं फिर्याद केली आहे, त्याअर्थी मेहरबा
कोर्टापुढें जबाब देण्यासाठीं तुम्ही, रघुनाथ कांबळे यांनीं ता....माहे..
सन १९...रोजीं बरोबर अकरा वाजतां हजर राहावें. न राहिल्यार
......वगैरे "

समन्स वाचून रघुनाथराव कांबळे, बी. ए. एल्एल्. बी. ॲडव्होकेट
यांचे हातपाय एखाद्या प्रेतासारखे एकदम थंडगार पडले.

जानकीनें त्याच्यावर पोटगीबद्दल दावा केला होता !

\+ + +

सासरोबांनीं जानकी बनारसला गेल्याची लोणकढी थापच ठेवू
दिली होती तर ! त्या कारस्थानी म्हाताऱ्याचा रघुनाथाला संता
आला होता.

जानकी सुलक्षणी, साळसूद, साध्वी, नवऱ्याकडून कायद्याच्य
साहाय्यानें पोटगी मागावयास तयार होणारच नाहीं, असें रघुनाथाल

वाटूं लागलें. जितकें जितकें त्याला सासरेबुवांचें कारस्थान पोटगी–दाव्याच्या बुडाशीं अधिक दिसूं लागलें, तितकें तितकें जानकीचें स्मृतिचित्र त्याच्या अंतश्चक्षूंपुढें अधिक सोज्ज्वळ दिसूं लागलें.

"—तें खरें; परंतु उद्यां कोर्टांत कसें तोंड दाखवावयाचें ? ज्या कोर्टांत वादीचा किंवा प्रतिवादीचा वकील म्हणून उभा रहात आलों, त्याच कोर्टांत पोटगी–दाव्यातील प्रत्यक्ष प्रतिवादीच म्हणून जबाब द्यावयाचा ! बरोबरीचे वकील काय म्हणतील ? पुढें न्यायाधिकारी आपल्याकडे कोणत्या दृष्टीनें पाहूं लागतील ? पोटगी मागण्याचीं कारणें देताना तिचा वकील खात्रीनें आपलें सारें संसाररहस्य जानकीच्या तोंडानें चवाठ्यावर आणील ! सर्व लोकांत, बायकापोरांतसुद्धां त्या रहस्याची चर्चा होईल—गांवात आपली छीथू होऊन, तोंड वर काढावयासही जागा राहणार नाहीं. या गावांत नुक्तीच कुठें मूळ धरूं लागलेली वकिली उपटून काढून ती दुसरीकडे रोंवण्याशिवाय आतां उपायच राहिलेला नाहीं. 'जानकी, जानकी, बापानें शिकविलें म्हणून तूं ग कशी माझ्या अब्रूवर घाव घालायला सिद्ध झालीस ?' तिचा तरी काय अपराध ? मी त्या देवीला लाथाडली ! देवी प्रसन्न तर सौख्याची समृद्धि; देवीचा कोप म्हणजे आपली आणि महिषासुराची एकच अवस्था !" अशा प्रकारच्या विचाराच्या वादळात रघुनाथाच्या मनःशांततेची होडी हेलकावेच हेलकावे खात होती. त्या हेलकाव्याबरोबरच तोही आपल्या बिछान्यावर या कुशीवरून त्या कुशीवर, त्या कुशीवरून पाठीवर, पाठीवरून पोटावर, असा धडपडत होता.

समन्साबरहुकूम त्याला कोर्टांत हजर राहणेंच भाग होतें. चार एक दिवसांचा अवधी असता, तर सासुरवाडीस जाऊन ह्या त्या मानहानीचें दान पदरीं पत्करून, जानकीची समजूत काढून मुकद्दम्याच्या दिवशीं तिच्याकडून अन्नवस्त्राचा दावा काढवून घेतां आला असता. परंतु, चांडाळ दैवानें आणि सूडबुद्धीच्या सासऱ्यानें त्याच्या वाटणीला तेवढाही काळ येऊं दिला नव्हता. कोणीकडून तरी कोर्टांत त्याची नाचक्की करण्याचा तो एक कटच असावा, अशी रघुनाथाची बहुतेक खात्री झाली होती.

समन्साप्रमाणें कोर्टापुढें हजर व्हावयाचें टाळावें तर परिणामीं वारंट निघून होणाऱ्या बेअब्रूत अधिक भर पडावयाची!

न टळणाऱ्या मृत्यूची भेट घ्यावयास शेवटीं माणूस जसा नाइलाजानें तयार होतो तसा दुसरे दिवशीं कोर्टात हजर व्हावयास रघुनाथही सिद्ध झाला.

+ + +

कसल्या वाईट अवस्थेंत दुसरे दिवशीं रघुनाथ कचेरींत गेला होता! आधीं दोनच दिवस 'गोंडस गोस्या' दिसणारा रघुनाथ अवघ्या अठ्ठेचाळीस तासांत अठ्ठेचाळीस दिवसांच्या दोघी ज्वरांतून नुकताच उठलेल्या प्राण्याइतका निस्तेज, निरुत्साही आणि निःशक्त, कसा आणि कां दिसूं लागला, याचें कोर्टातील नेहमींच्याच सर्व लहानमोठ्या कामकऱ्यांना नवल वाटूं लागलें.

"कां हो मिस्टर कांबळे, असें काय झालें एकाएकीं तुम्हांला?" एका तरुण वकिलानें रघुनाथाला मुकादम्याच्या दिवशीं बाररूममध्यें विचारलें.

तो वकील रघुनाथाच्या बरोबरीचा असून धंद्याबाबत त्या दोघांत चढाओढ आणि चढाओढीपायीं तेढच होती. त्यामुळें त्याच्या प्रश्नानें रघुनाथाला राग आला. अंतकालीं मनुष्याचे स्वतःचे डोळेसुद्धां जर फिरतात, तर आपत्कालीं प्रतिस्पर्ध्यानें वर्मावर घाव घातला, तें ठीकच केलें, अशी काहीं तरी मनाची समजूत काढून रघुनाथ स्वस्थ राहिला.

"रघुनाथ कांबळे हजर है?" कोर्टाच्या शिपायानें पुकारा केला.

सर्वांगाला घाम सुटून रघुनाथ तो पुकारा ऐकून निथळूं लागला. लटपटल्या पायांनीं रघुनाथानें कोर्टात प्रवेश केला.

"मिस्टर कांबळे, तुम्ही या कज्जांत—"

"साहेब मी प्रतिवादी आहे" आंत ओढल्या जिभेनें, जमिनीकडे नजर लावून रघुनाथानें उत्तर दिलें.

वादीतर्फे आपला प्रतिस्पर्धीच उभा आहे, हें पाहून तर, सीतेप्रमाणें भूमाई आपल्याला सदेह गडप करील, तर किती चांगलें होईल, असें रघुनाथाला वाटलें.

" पण मागच्या तारखेला तुम्ही या कज्जांत हजर झाला नव्हता ? या तारखेलाच वकीलपत्र हजर करणार आहांत काय ?" कोर्टानें रघुनाथाला प्रश्न केला.

" मागची तारीख ? या कज्जाचें काम पूर्वीच चालू झालें आहे तर ! काय भयंकर माणूस आहे हा आपला धंदेवाईक प्रतिस्पर्धी ! आयत्या वेळीं अशा अवघड खिंडींत गाठण्यासाठीं त्यानें काय काय हिकमती केल्या आहेत या !" असें सारें मनांत येऊन, समोरच्या वकीलाला खाऊं कां गिळूं, असें रघुनाथाला होऊन गेलें.

उसन्या नेटानें जिवाची एकदांची कशीबशी मोट बांधून रघुनाथानें कोर्टाला सांगितलें, " साहेब, प्रतिवादीचा वकील या नात्यानें मी कोर्टाच्या रिवाजाप्रमाणें स्वतःला प्रतिवादी असें संबोधित नाहीं. ही फिर्याद माझ्या विरुद्धच आहे."

" तुमच्या विरुद्ध फिर्याद ? मिस्टर कांबळे, तुमची प्रकृति ठीक दिसत नाहीं ! छेः छेः ! काय एकदम तुमच्या डोक्यावर परिणाम झाला आहे !"

आपल्या जखमेवर मिठाचें पाणी ओतण्यासाठींच मशारनिल्हे ' कोर्ट ' मुद्दामच खोटें आश्चर्य दाखवीत आहे, असें रघुनाथाला वाटलें. आलेला संताप बाहेर पडूं नये म्हणून दाढा घट्ट आंवळून धरून तो म्हणाला, " नाहीं साहेब, प्रतिवादी म्हणून जबाबाकरितां हजर होण्यासाठीं मला कालच समन्स लागलें म्हणून कोर्टाच्या हुकुमाप्रमाणें मी आज इथं हजर झालों आहे-पहावें तें समन्स."

समोरचा वकील मोठ्यानें हंसला रघुनाथाचें सांगणें ऐकून.

समन्स पाहून कोर्टबहादूरही चकित झालें. कारकुनाला बोलावून मुन्सिफसाहेबांनीं चौकशी केली.

कारकुनानें सांगितलें, " चालू दाव्यांत वादी जानकीबाई भ्रतार रघुनाथ कावळे ही असून प्रतिवादी रघुनाथ कावळे आहे.

" मग मला समन्स कां लागलें ?" आधले रात्रीं डोळयाला डोळ न लागल्यामुळें लालबुंद झालेले डोळे कारकुनावर गरगरवीत रघुनाथानें विचारलें.

" मला वाटतें बेलिफाची कांहीं चूक झाली असावी ! " कारकून अजीजीनें म्हणाला.

" बेलिफाची काय चूक ? समन्सावर रघुनाथ कांबळे असें नांव स्पष्टपणें लिहिलें गेलें आहे. "

" नाहीं साहेब; पहा आपण 'का'वर अनुस्वार नाहीं."

" मग ही चूक कशी झाली ? " कोर्टबहादूर कारकुनावर गरम झाले.

" याचा मोडी 'व' पुष्कळसा मोडी 'ब' सारखा आला आहे. त्यानें हा घोंटाळा झाला असावा. " रघुनाथाच्या प्रतिस्पर्ध्यानें समन्स पाहून सांगितलें, तें सर्वांनाच पटलें.

कोर्टाबरोबर रघुनाथही मोठ्यानें हंसला.

बेलीफाला दंड झाला; मोडी अक्षर सुधारण्याची कोर्टानें कारकुनाला खरमरीत समज दिली.

सारे वकील मोटमोठ्यानें हंसत असतांनाच रघुनाथ बाररूममधून बाहेर पडला.

+ × +

जन्मठेपेची शिक्षा होण्याची खात्री असतां निर्दोषी म्हणून सुटलेला आरोपी जितक्या अनपेक्षित आनंदानें घरीं परतेल, तितक्याच आनंदानें रघुनाथ घरीं परतला.

घराच्या दरवाजाशीं तो आला मात्र, आणि त्याला त्या आनंदाचा आस्वाद घ्यायला आपली जानकी घरीं नाहीं याचें स्मरण झालें; आनंदावर विरजण पडलें.

" हं, आज लौकर परत आलां कोर्टांतून ? " रघुनाथाचें जड पाऊल दारांत पडतांच जानकीनें विचारलें.

प्रत्यक्ष जानकी पुढें उभी असूनहि रघुनाथाचा डोळयांवर विश्वास बसेना. " ऑं !–तूं ! " आश्चर्यानें आ वांसून रघुनाथानें विचारलें.

" हो मीच–असं एखादं भूत दिसल्यासारखं काय पहायचं तें माझ्याकडं; मी जानकीच आहें–हडळ बिडळ नव्हे जानकीच्या रूपानं घरांत शिरलेली. "

"असं काय बोलतेस ग !–केव्हां आलीस? दोन प्रहरच्या एक्स-प्रेसनं ना? पहा मला कसं कळलं तें–अग तूं आलेली मला कळलं म्हणून तर मी आलों काम टाकून सारीं–तुझ्याकडं धांवत–पण तूं कां आलीस?"

"आपण विचारणारे कोण? माझ्या घरीं मी आलें."

"तुझं घर?"

"नाहीं का? हवं तर कोर्टांत जाऊन सिद्ध करीन या घरावरचा माझा हक्क."

जानकीनें कोर्टाचें नांव काढताच रघुनाथाच्या छातींत एकदम धस्स झालें.

झाल्यागेल्या भाडणाचें रघुनाथ–जानकी यापैकीं कोणीच चुकूनही कधीं नांव काढलें नाहीं.

\+ \+ \+

जानकीला परत येऊन सहा महिने लोटले होते. रघुनाथ कसले तरी कापडाचे गट्ठे घेऊन बाजारांतून आला होता. एके दिवशीं संध्याकाळीं "कधीं कळणार म्हणतें मी! अहो, इतकं का कापड आणतं कुणी? लहान मुलाचे कपडे महिन्या महिन्याला लहान होत जातात. लागेल तसं तसं कापड आणतात सारीं. आमच्या घरचं सारंच विचित्र आणि इतक्या लौकर कशाला ही खरेदी? चांगला चार महिन्यांच्या अवकाश आहे—" जानकी सकौतुक रागानें रघुनाथाची हजरी घेत होती! रघुनाथ प्रेमभऱ्या नजरेनें हंसत तिच्या भरदार देहाकडे पहात राहिला होता!

———— ——

# ६ तारक-तारा

कॉलेजच्या वसतिगृहांतील २९ नंबरची खोली. तीन प्रहरचे साडेतीन वाजून गेले होते. ते कार्तिक मासाचे दिवस होते, तरी त्या दिवशीं पावसाची चांगलीच झड लागली होती. वारा सोसाट्याचा सुटल्यामुळें हवेंत अंगाला झोंबणारा गारठा आला होता. एकंदर वातावरण निरुत्साहजनक होतें. त्यामुळें, त्यावेळीं घराबाहेर पडण्याची कोणालाही सहजासहजीं इच्छा होणें शक्य नव्हतें. तरी, वर सांगितलेल्या वसतिगृहाच्या आवारांत सुमारें एकोणीस वीस वर्षांचा एक तरुण नुकताच बाहेरून येऊन शिरत होता. त्याच्या चेहऱ्यामोहऱ्यावरून स्वारी थोडीफार रंगेल आणि चढेल स्वभावाची दिसत होती. त्याच्या अंगांतले कपडे बहुतेक भिजून चिंब झाले होते, आणि त्यावर वाऱ्याचा मारा बसत असल्यामुळे त्याचें अंग शहारून निघत होतें. तरी हातांतील गळणारी छत्री न मिटतांच " प्रेम हो जरी निजानुरागें " हें पद हलक्या आवाजांत पण लंब्या लंब्या आलापांत घोळवीत स्वारी जिना चढूं लागली. वर गेल्यानंतर आरंभीं सांगितलेल्या नंबरच्या खोलीसमोर उभें राहून त्या तरुणानें दारावर हळूच एकदोनदां टिचकी मारली, तोंच आंतून ' यस, कम इन ' असें उत्तर आल्यावर दाराला धक्का देऊन तो तरुण आंत गेला.

साधारणतः विद्यार्थ्यांची खोली म्हणजे अनावस्थेचें माहेरघर असावयाची; परंतु हा तरुण ज्या खोलींत शिरला ती या नियमाला अपवाद होती. आंत सामान थोडेंच होतें; पण तें नीटनेटकें लावून ठेविलें होतें. डाव्या उजव्या भिंतीना टेंकून दोन बरीचशीं शृंगारलेलीं मेजें मांडलीं होतीं. या मेजांना लागूनच दोन लोखंडी पलंग ठेवले होते. खिडक्यांना अलवानचे पडदे लाविले असल्यामुळें त्यावेळीं खोलींत अंधेरा तांबूस प्रकाश पडला होता. तरुण आंत गेला, तेव्हां जवळ जवळ त्याच्याच वयाचा दुसरा एक तरुण डाव्या हाताकडील टेबलाशेजारीं असणाऱ्या पलंगावर,

बेरेंचसें जाड पांघरूण घेऊन पडला होता. त्याला पाहून आंत आलेला तरुण म्हणतो, “ So you are in my sweet idiot ”

निजलेल्या तरुणानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां पहिल्या तरुणानें पुन: विचारलें “ कायरे, काय वाचतो आहेस ? ”

“ अं, वाचतो होय ? Love –a problem ! ”

“ मी सांगतों, तुम्ही लोक असे लव्ह लव्ह करीतच मरणार ! I say, this romance has spoiled our Indian youths ! ”

“ अहो आजोबा, आपलं वय काय ? पण कायरे वासू, ‘ लोकां सांगे ब्रह्मज्ञान आणि आपण कोरडा पाषाण ’ तूं रे कशाला अशा वेड्या वांकड्या हवेंत गांवांत धडपडत गेला होतास ? राहूं दे राजश्री, आपल्या नांवचे आलेलं पार्सल मी पोस्टमनजवळ पाहिलं होतं. साग तेंच आणा- यला गेला होतास ना ? अरे बाबा, आमचा आपला पुस्तकी रोमान्स. तुम्हां शास्त्रीय विषयांच्या लोकांना पाहिजे प्रॅक्टिकल. सांग, काय केलंस गांवांत जाऊन तें. ”

“ हो, बरी आठवण झाली. मी गांवांत कां गेलों होतों तें तुला सांगितल्यावाचून कसा राहीन ? शिवाय ज्या कारणाकरतां मी गांवात गेलों होतों त्याच बाबतींत मला तुझं साहाय्य पाहिजे आहे; पण तें काम सांगण्यापूर्वी मला तुला एक प्रश्न विचारायचा आहे. तूं यंदा दिवाळीला कुठं जाणार ? ”

हा प्रश्न या वेळीं विचारला जाईल अशी त्या दुसऱ्या तरुणाला कल्पना नव्हती, असें दिसतें. कारण तो ऐकताच त्याच्या चेहऱ्यावरचा तजेला जाऊन त्यावर थोडीशी दुःखाची छाया आली आणि त्यानें एक लांब सुस्कारा सोडला. वासुदेव त्यावेळीं स्टोव्हला पंप करीत होता म्हणून त्या तरुणाच्या चेहऱ्यांत झालेला हा फरक त्याला दिसला नाहीं. बराच वेळ झाला तरी आपल्याला उत्तर मिळत नाहींसें पाहून वासुदेवानें विचा- रलें “ कां रे, बोलत कां नाहींस ? ”

“ वासुदेव, मी काय बोलणार ? मी इथंच दिवाळी साजरी करणार. मी जाणार कुठें ? दरवर्षी मी तुझ्या घरीं येत होतों; पण यंदा

तू जाणार आपल्या यमुताईकडे. तूं नसलास तर मी काहीं नाहीं जाणार तुझ्या घरीं."

"वेडा आहेस तूं. आमच्या काकांनीं आणि काकूंनीं तुझ्यांत आणि माझ्यांत कधीं भेदभाव दाखविला आहे का?"

"छे, छे, वासू, अशी जर माझी कल्पना होईल तर देवाच्या घरीं मी कृतघ्न ठरेन! उलट माझी अशी पक्की समजूत आहे कीं, तुम्ही सारीं माणसं माझ्यावर प्रेम करता, म्हणून तर मी जीव धरून आहें. नाहींतर या जगांत जगायला तरी मला काय आधार होता?"

"आमचा कसला आधार? बुडत्याला काडीचा आधार म्हणतात त्यापैकींच. या अफाट समुद्रांत सांपडून भांबावून गेल्यावेळीं आमच्या घरच्या माणसांनीं तुला प्रेमाच्या बोटानं वर काढला इतकंच."

"पण त्यावेळीं तेंच मला अधिक होतं. पण वासू, मला अलिकडे असं वाटूं लागलं आहे कीं, आपल्या अगत्याचा, आपल्या सत्तेचा आणि प्रेमाचा एकादा तरी जोमाचा जिव्हाळा असल्यावाचून जीवित व्यर्थ आहे. तशा प्रेमळ जिव्हाळ्याविना सणासुदीचे दिवस, उत्साहाचे-आनंदाचे वाटण्याऐवजीं उदास-नव्हे काहीं कांहीं प्रसंगीं तर सुतकाच्या दिवसापेक्षांही दुःखद वाटतात. तरुणपणाच्या मनोहर सृष्टीमध्यें सोबतीशिवाय वावरणारी व लादलेल्या उपभोगशून्य विरक्त वृत्तीन कोंडल्यामुळं जिच्या इच्छा मेल्या आहेत अशी विधवा, आणि माझ्यासारखा सुखसोयींनीं संपन्न एकलकोंड्या अभागी यांची दशा एकच! खरोखर आमच्यापेक्षा, एकमेकाच्या समागमसुखांत शांतमनानं अहर्निश जीवितसमाधानाचा अनुभव घेणारं एकादं शेतकऱ्यांचं गरीब स्थितींतलं जोडपं अधिक सुखी, आणि परमेश्वराचं अधिक लाडकं असतं, असंच मला वाटतं!"

त्यानें पुनः एक निश्वास टाकला. त्याचे डोळे भरून आले आणि गळा दाटून आल्यामुळें पुढें त्याच्यानें बोलवेना.

आपल्या प्रश्नानें त्या तरुणाची तशी अवस्था झालेली पाहून वासुदेवालाहि थोडेसें वाईट वाटलें. तो म्हणाला, "तारानाथ, किती

कोवळ्या मनाचा आहेस रे तूं! वेड्या, असाच जर एकसारखा विचार करीत बसशील तर दुःख असह्य होऊन छाती भरून येऊन आणि दम कोंडून एकादे दिवशीं पटकन् तुझा जीवसुद्धां जाईल! लोक म्हणतात, तुमचा तारानाथ इतका निर्विकारी दिसतो कीं, त्याला अंःतकरण आहे कीं नाहीं अशीच शंका येते; पण तारानाथाचं लोकांना मुकं दिसणारं मन त्याच्या जिवाशीं काय बोलत असतं, हें जर त्यांना कळलं, तर त्यांचा अपवाद अनाठायीं आहे अशीच त्याची खात्री होईल. तरी पण तारानाथ, सुख आणि दुःख ही विचारांचीं अपत्यं आहेत, हें विसरतां कामा नये. तुझी आणि माझी स्थिती एकच; परंतु तुझ्यासारखा मी अश्रु गाळून जीवाला पोटांत कोंडीत नाहीं."

"नाहीं नाहीं, वासुदेव तूं कां माझ्या पंगतीला बसतोस? काका काकूंची तर गोष्ट राहूं देच; पण मला जर तुझ्या यमुताईसारखी एकच बहीण असती तर जगातील दुसरं कोणतंही सुख मी त्याज्यच गणलं असतं!"

"असं का बरं म्हणतोस, तारा? यमुताई, तुला माझ्या इतकाच किंबहुना माझ्याहून अधिकच मानते."

"वासुदेव काय उत्तर देऊं तुला? मानलेल्या भावाला कधीं खऱ्या भावाचा मान मिळाला आहे का? विहिणीचा व्यवहारी मान-पान मी म्हणत नाहीं; यमुताईसारख्या भगिनीचा सहोदर होण्याचा मान म्हणतों मी."

"तितक्या खोलपणानं विचार करूं गेल्यास पुनः मी आणि तूं समदुःखी असंच निष्पन्न होतं. यमुताई आणि मी तरी कुठं सहोदर आहोंत? आम्ही तरी चुलत भावंडेंच ना?"

"अरे दगडापेक्षां वीट मऊ. यमुताईला नाहीं सख्खा भाऊ आणि तुला नाहीं सख्खी बहीण, म्हणूनच तुमच्यामध्यें प्रेमाचा ओढा दिवसेंदिवस अधिकच वाढत चालला आहे. Love a-problem या ग्रंथाची कर्त्री काय म्हणते पहा:—' A powerful soul of the stronger sex, who, being curiously unfortunate cannot enjoy the pleasure of the tender love of a mother, a sister or a wife,

is one day or other of his youthful and energetic life, bound to realise his isolatedness and as the result of his realisation shall have a strong and passionate inclination for suicide.' हेंच वाक्य वाचून मी थांबलों आहें. माझ्या मनाचा फोटो जर या वेळीं घेतां येईल तर या ग्रंथकर्त्रीच्या वाक्याचा भावार्थ निराळ्या शब्दांनीं खोदलेला इथं स्पष्ट दिसेल. "

" तारानाथ, माफ कर, मी आतां बोलतोंच. आधींच तुझ्या मनाची ठेवण जरा बावळट–बावळट कां जरा बायकी घाटाची आहे म्हणेनास–त्यांतून इंग्लिश कवींच्या प्रेमविषयक काव्याचं वेदासारखं पठण चालविल्यानं तुझ्यासारख्या बुद्धिमान माणसाची एक नमुनेदार भागुबाईच बनली आहे. तुला प्रेम पाहिजे ना ? प्रेम असं खोलींत बसून मुळुमुळू रडण्यानं मिळत नसतं. तुझ्या आवडत्या इंग्रजी कादंबऱ्यांतील नायकांचच उदाहरण घेईनास ! कुणी कांहीं, कुणी कांहीं, पण प्रयत्न करून साध्याचीं साधनं जमविण्यांत गुंतलेला असतो, असंच वर्णन केलेलं आढळतं. चल हो 'नाईट एरंट,' मी देतों तुला एक 'लेडी लव्ह' गांठून.

—" नाहीं तारा, Don't take it lightly ! मला तुझी आतां खरो-खरीच भीति वाटूं लागली आहे. तूं केवळ मातृपितृप्रेमालाच नाहीं तर भगिनीप्रेमालाही आचवला आहेस. तेव्हां, राहिलं पत्निप्रेम. तेव्हां माझं म्हणणं असं, कीं एकाद्या पोरीचं–नव्हे चुकलों-एकाद्या सुशिक्षित तरुणीचं प्रेम तरी मिळीव. आपण असं समजूं या, कीं तूं आपल्या इकडील जुन्या गोष्टींतील प्रेमानं बेहोष झालेला राजपुत्र आणि मी त्या राजपुत्राच्या प्रत्येक सुखाची सोय करण्याचा मक्ता घेतलेला प्रधानपुत्र. हसूं नकोस ! Am serious. हा पहा त्या राजकन्येचा फोटो. तोच आणायला मी गेलों होतों गांवांत. "

वासुदेवानं पाकीट उघडलें आणि फोटो तारानाथाच्या हातीं दिला. त्याच्या खालचें नांव वांचून तारानाथाचा चेहरा रागानें लाल झाला.

तारानाथ म्हणाला " वासुदेव, तूं माझी अशी चेष्टा करशील, असं मला वाटलं नव्हतं. अरे, रावसाहेब रुपे यांची कन्या चंद्रिका तुझी वाग्दत्त वधू ना ? आणि तिच्यासंबंधीं असे उद्गार ? "

“ असे उद्गार म्हणजे तिला मी तुझी ‘ लेडी लव्ह ’ म्हणालों, हेच ना ? ”

“ हें काय थोडं झालं वाटतं ? तुझी भावी पत्नि म्हणजे माझी वडील बहीण, असं मी समजतों. ”

“ कोणाची भावी पत्नि ? माझी ? तें एक आमच्या काकांच्या कल्पनेंतील स्वप्न आहे, इतकंच. तू तिला माझी वाग्दत्त वधू म्हणतोस, पण तसं वचन रावसाहेब रूपे यांनीं दिलं आहे कीं नाहीं याचा आधीं अदमास घ्यायचा होतास. काका म्हणतात म्हणून तूंहि म्हणतोस वाटतं. तूं अगदीं चुकतो आहेस. मी या मुलीशीं लग्न करावं, अशी माझ्या-शिवाय आमच्या घरांतील प्रत्येक माणसाची इच्छा आहे. ही एका सुधारक दांपत्याची कन्या म्हणून इच्याशीं लग्न करून मी या आजच्या सुधारकांच्या कळपांत गाफीलपणें सामील व्हावं, असं काकांना वाटतं. रावसाहेब घरचे चांगले असून, चंद्रिका ही त्यांची एकटीच मुलगी. तिच्या लग्नांत वरमाई या नात्यानं आपली वाटेल ती हौस फिटेल असं वाटून, मी त्या मुलीशीं लग्न करावं, असा काकू हट्ट धरते. आपली शाळें-तील मैत्रिण चंद्रिका वहिनी होऊन घरीं आल्यास आपलं माहेर सुखाचं होईल, अशा कल्पनेनं यमुताई काका काकूंना सामील आहे, पण अशा सुमार स्वरूपाच्या स्त्रीच्या सहवासानं मी कायमचा असुखी होईन, याच्याकडे कोणाचंच लक्ष नाहीं. बाकी त्यांनींही खूप समजून असावं, कीं, असं जुलमाचं बाशिंग कधीं डोक्यावर चढत नाहीं म्हणून; चढलंच कदाचित्, तर त्याची पायमल्ली लौकरच झाल्याशिवाय रहात नाहीं. पण मी तितका प्रसंगच येऊं देणार नाहीं म्हणा ! ”

“ तूं वाटेल तें म्हण, पण ही मुलगी रूपानं साधारण आहे, हें तुझं विधान धिटाईचं आहे, असं म्हणावं लागतं. ”

“ अरे, जोंपर्यंत नानासाहेब इनामदारांची कालिंदी माझ्या डोळ्यां-समोर आहे, तोंपर्यंत या चंद्रिकेनं कितीहि धडपड केली, तरी तिचं तेज पडणार नाहीं. हा घे कालिंदीचा फोटो आणि तुलनात्मक दृष्टीनं तूंच विचार कर. ”

" मी म्हणतों, असेल कदाचित् कालिंदी चंद्रिकेपेक्षां अधिक सुंदर, पण तिचं शिक्षण तें काय—"

" ही शिक्षणाची शिफारस आपल्यासारख्या आयडियालिस्टापुढं! आम्ही आपले सौंदर्यासाठीं भुकेलेले. कालिंदीला ओ म्हणतां येत नसलं तरी तिच्या असाधारण सौंदर्यासाठींच मी तिच्याशीं लग्न करणार!"

" आणि तें काकासाहेबांच्या मर्जी विरुद्ध? पाहीन रावसाहेब, आपला हा निश्चय कितपत टिकतो तो! काकासाहेब जरा दत्तक घेण्याची भाषा बोलूं लागूं देत कीं, याल राजेश्री आपोआप वळणावर!"

" अरे, सौंदर्याची किंमत पैशानं का होत असते? संपत्ति आणि सौंदर्य यांच्या संयोगानं कदाचित् सौंदर्य-सेवनांत सौख्याची जास्त भर पडत असेल; पण जसं एखाद्या हडळीशीं लग्न केल्यानं घराचं स्मशान होतं, तशी तर संपत्तीच्या अभावीं कधीं घराची स्थिति होत नाहीं ना? जहांगिर बादशहाच्या सार्वभौम सिंहासनानं लावण्यदेवी जगद्दीपिकेचं वैभव वाढविलं नव्हतं, तर त्या अलौकिक तेजोराशीच्या सौंदर्यप्रभेनं सम्राटाचं ऐश्वर्य नटून निघत होतं."

" आणि त्याबरोबरच, त्या पट्टराणीनं साऱ्या साम्राज्याचीं सूत्रं आपल्या हातांत ठेवून, राजनीतींतील कमालीचं कौशल्य दाखवून, आपल्या बुद्धिवैभवानं मोठमोठ्या राजनीतिकुशल पंडितानांही लाजविलें होतें, हें नाहीं तूं ध्यानांत घेत. जगाच्या इतिहासांत उत्तम राण्या म्हणून प्रसिद्धीला आलेल्या बऱ्याच स्त्रिया आढळतात; पण बौद्धिक आणि शारीरिक सौंदर्यांत सारखेपणानंच असाधारण असलेली नूरजहान इतिहासात एकच हें विसरूं नकोस. पण जाऊ दे तें. बुद्धि आणि सौंदर्य यांत प्राधान्य कोणाला द्यावयाचं यासंबंधीचा आपला वाद आजपर्यंतच इतका माजला आहे कीं, तो एकाद्या मोठ्या ग्रथांतही मावणार नाहीं. तारानाथ, माझ्यावर तुझं प्रेम आहे का?" वासुदेवानें केविलवाण्या स्वरांत विचारलें.

" वासु, काय हा तुझा प्रश्न? माझं तुझ्यावर किती प्रेम आहे याची साक्ष देणारे दोघेच, एक परमेश्वर आणि दुसरा तूं. पण असा प्रश्न करावा असं तुला कां वाटलं?"

"तारा, तुझं प्रेम आणि माझ्याविषयींची तुझी कळकळ आज अजमावून पाहाण्याची वेळ आली आहे."

"सांग, काय वाटेल तें सांग, मी त्याला नाहीं म्हटलं तर–तर काय सांगूं?"

"हें खरं ना, तर मग आजपासून आठव्या दिवशीं तूं माझं नांव-गांव धारण करून दिवाळीसाठीं रावसाहेब रूपे यांच्या घरीं गेलं पाहिजे.'

"म्हणजे? मी नाहीं समजलों याचा अर्थ!"

"होय, माझा तो बेत व त्या बेताचीं कारणं सहजासहजीं समजण्यासारखीं नाहींत. मला काल काकांचं पत्र आलं आहे, त्यांत त्यांनीं जरा निश्चयानं लिहिलं आहे कीं, पुढच्याच मुहूर्तावर माझा विवाह चंद्रिकेशीं करायचा त्यांचा मानस आहे. तेव्हां सर्व नक्की होण्यापूर्वी मी चंद्रिकेच्या स्वभावाचं एकवार परीक्षण करावं, असं वाटल्यावरून त्यांनीं माझ्याबद्दल रावसाहेबांना पत्रहि लिहिलं आहे. आतां तूंच पहा, काकांचं हें करणं वरातीपाठीमागूनच्या घोड्याच्या थाटाचं आहे कीं नाहीं तें! काकांच्या तामसी स्वभावामुळं मला नाहीं असं म्हणावयाची सोय नाहीं. तशात लग्नासारख्या महत्त्वाच्या बाबतींत नवरदेवानं तोंड उघडलं कीं, मर्यादेचं उल्लंघन होतं, असा आमचा कौटुंबिक कायदा असल्यानं तर मला तोंड दाबून बुक्यांचा मार खावा लागत आहे. तितकंही मी सहन केलं असतं, परंतु आमच्या फिरत्या घराबरोबर त्याचे वासेहि फिरूं लागल्यामुळं, माझं डोकं आतां फिरून जाण्याच्या बेतांत आलं आहे!"

"बरं मग पुढं काय? मी काय करूं, म्हणजे त्या फिरणाऱ्या वाशांच्या चक्रांतून तूं बाहेर पडशील?"

"आतां तुझं काम इतकेंच कीं तूं माझं नांव धारण करून रावसाहेबांच्या घरीं जायचं. मी अमुक दिवशीं अमुक गाडीनं निघणार हेंसुद्धां माझ्याऐवजीं काकांनींच रावसाहेबांना कळविलं आहे."

"छे बुवा, हें नाहीं आपल्याला जमायचं! अरे, ही उघड उघड रावसाहेबांची फसवणूक आहे!"

" मी तुला सांगितलं ना, कीं परिस्थितीनं तुला एक नमुनेदार भागुबाई बनविली आहे म्हणून ! तेंच अखेरीस अक्षरशः खरं ठरणार. अरे, त्यांची फसवणूक होणार हें खरं आहे, पण पुढं आमचे काका आणि रावसाहेब माझ्या पुढच्या साऱ्या आयुष्याची फसवणूक करतील म्हणून मला आजच खबरदारी घेतली पाहिजे."

" या दृष्टीन पाहतां तुझ्यासारख्या माणसानं असं वागावं हें योग्य दिसतं, पण मी काय म्हणून त्या भानगडींत पडावं ? "

" असा प्रश्न तूं करशील असं मला वाटलंच होतं. म्हणून माझ्यावर तुझं प्रेम आहे का म्हणून मी प्रथम तुला विचारलं."

वासुदेवानें काळजाला चिमटा घेतल्यानें बिचारा तारानाथ निरुत्तर झाला. त्याला वासुदेवाचें म्हणणें कबूल करणें भाग पडलें. पुढील बेत निर्विघ्नपणें पार पाडण्यासाठी वासुदेवानें यमुताईचा विश्वास संपादावा, आणि तारानाथ रावसाहेब रुपे यांच्या घरीं असे तोंपर्यंत यमुताईच्या घरीं वासुदेवानें रहावें, असें ठरलें. त्या अज्ञातवासाच्या कालात कालिंदीचें प्रेम संपादावें, असा वासुदेवाचा बेत होता. ठरलेल्या बेताप्रमाणें यमुताईला पत्र लिहिण्याकरिता वासुदेव टेबलाशीं बसला.

[ २ ]

यमुताईशिवाय आपल्याला दुसरें अपत्य राहिलें नाहीं, म्हणून काकासाहेबांना कधीं वाईट वाटलें नाहीं. कारण, भावाच्या मुलावर—वासुदेवावर—त्याचें सख्या मुलासारखेंच प्रेम होतें. म्हणूनच, काकासाहेबांच्या जिंदगीचा मालक वासुदेवच होणार, असें सारा गाव बोलत होता. लहानपणीं आपत्ति भोगून, स्वतःच्या पराक्रमावर पुढें आल्यामुळें, काकासाहेबांच्या अंगीं एक प्रकारचा ताठरपणा आला होता. त्यांना वाटे, कीं, प्रत्येकानें आपल्या मताप्रमाणें वागावें. काकुबाईच्यासारख्या जन्मगांठीच्या असहाय्य सोबतिणीला तसें वागण्यावाचून गत्यंतरच नव्हतें. यमूला त्यांनीं लहानपणापासून आपल्या मनाजोगतें वळण लावलेलें, तेव्हां तिच्याकडूनही कांहीं तक्रारीला जागा मिळत नसे. राहतां राहिला वासुदेव. तो नव्यानें त्यांच्या कुटुंबात सामील झाल्यानें, त्याच्यावर आपलीं मतें

लादून त्याला अंतर्बाह्य आपलासा करून टाकण्याच्या नादांत गुंग असल्या-मुळें म्हणा, किंवा काकासाहेब हे पहिल्या पिढींतील सुधारक असल्यानें म्हणा, आपल्याला पटलेली सुधारणा दुसऱ्यावर लादण्यांत, आपणच आवडीनें प्रतिपादन केलेल्या मतस्वातंत्र्याच्या पुरस्काराला हरताळ फांसून अस्मानी सुलतानी गाजवीत असतों, हें काकासाहेबांच्या लक्षात येत नसल्यानें, कांहीं कांहीं वेळां वासुदेवाविषयी त्याच्या हृदयांत प्रेमाचा एखादा अंश तरी आहे कीं काय, अशीच एखाद्याला शंका आली असती.

बरें, वासुदेव तरी आपल्या ठिकाणीं ठीक होता म्हणावें, तर तसेंहि नव्हतें. प्रत्येक गोष्ट आपल्याच मनाप्रमाणें झाली पाहिजे, असें समजण्यांत तो काकासाहेबांचा मुलगा शोभला असता! या चुलत्या पुतण्यांचे स्वभाव हेकेखोरपणाच्या बाबतींत जितके सदृश तितकेच वासुदेवाच्या विवाहाच्या बाबतींत असदृश होते.

[ २ ]

वासुदेवानें आपल्या बहिणीला पत्र लिहिलें, त्याला आठ दिवस झाले. या आठ दिवसांत तारानाथाच्या मनाची स्थिति घटकेंत बदलणाऱ्या श्रावण मासांतील सावलीप्रमाणें होत होती. दुसऱ्याचें खोटें नांव धारण करून, तिसऱ्या एका अनोळखी गृहस्थाच्या घरीं भावी जांवई म्हणून जावयाचें, म्हणजे बुद्धिपुरःसर अनीतीचें कृत्य करणें आहे, असें तारानाथाचें सुशिक्षित मन त्याला वारंवार बजावून सांगत होतें. या मताचा पगडा मनावर बसला, म्हणजे तो हातपाय गाळून रावसाहेब रुपे यांच्या घरीं जावयाचें नाकारी. या त्याच्या पहिल्या एकदोन नकाराला वासुदेव घाबरला; पण पुढें पुढें तारानाथाच्या पुरतेपणीं जाणलेल्या गरीब व भोळ्या स्वभावाचा फायदा घेऊन, थोड्याशा वादविवादानें त्याची कबुली वासुदेव तेव्हांच मिळवी. तारानाथानें हातपाय गाळणें, म्हणजे वासुदेवानें आपल्या कल्पनेंतील सौख्याला लाथ मारावयास तयार होणें असल्यामुळें, त्याला तारानाथाचें वाटेल त्या उपायांनीं मन वळविणें अवश्य होतें, पण मौज अशी कीं, तसें करितांना तो आपला स्वार्थ लपवून तारानाथाच्याच फायद्याच्या बाबती पुढें करी. "तूं रावसाहेबांच्या घरीं गेलास तर कदा-

चित् कायमचीं प्रेमाचीं माणसं जोडण्याचा संभव आहे. " असें भविष्यही वर्तविण्याला तो मागें घेत नसे. स्वार्थानें एकदां भारल्यावर प्रत्यक्ष जन्मदात्या आईशींही प्रसंगोपात लपंडाव खेळण्यांत जर मानवी जिवाला दिक्कत वाटत नाहीं, तर बोलूनचालून परक्या घरच्या जोडलेल्या मित्राच्या व्यवहारात काहीं प्रसंगीं स्वार्थानें डोकें वर केल्यास त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं; म्हणूनच, एकवेळ परस्परांच्या जीवाला जीव देणारे दोस्त व त्यांचे कल्पनारम्य स्नेहसंबंध हे पुढें शब्दसृष्टींतील पोकळ पायाची इमारत, आणि स्नेहसंबंधाच्या गोष्टी ह्या त्या इमारतीवरील उसळणारे कळस, असेंच अखेरीस दिसून येतें.

ठरल्या दिवशीं, वासुदेवानें तारानाथरूपी रडतराऊताला अखेरच्या निश्चयाच्या घोड्यावर मारून–मुटकून बसवून, एकदाचा त्याला सकाळच्या साताच्या गाडींत घातला. गाडींत बसलेल्या तारानाथाच्या चेहऱ्या-वरील पडलेली प्रत्येक रेषा, तो मोठ्या संकटात सापडल्यामुळे त्याच्या जीवावर कसले तरी मोठें ओझें पडलें आहे, याची साक्ष देत होती. त्याच्या त्या चेहऱ्यावरील चिन्हावरून त्याला धीर देणें रास्त आहे, असें वाटून वासुदेव म्हणाला " तारानाथ, आपला हा बेत उघडकीला येईल अशी भीति तूं बिलकूल बाळगू नकोस ! रावसाहेब अगर त्यांच्या घरची मंडळी यांच्या नजरेला मी प्रत्यक्ष अगर चित्ररूपानें कधींच पडलों नाहीं. तेव्हां, या बाबतींत तूं बिलकूल साशंक होऊं नकोस. त्यांच्या घरात माझ्या नांवानं राहत असतां जर त्यांनीं तुझा कांहीं अपमान केला, तर मात्र मला कळीव. काहींतरी कारण काढून त्यांच्यावर दोषारोप करणं, हा तर माझा ठरलेला इरादा आहे. जर साराच सोहळा सुरळीतपणें पार पडला, तर 'मुलीच्या वागणुकीवर शिकारीसाठीं लपलेल्या वाघाची टपली नजर ठेवून तिचा स्वभाव-समाधानकारक न वाटल्यामुळें तिच्याशीं लग्न करून सुखाचा संभव नाहीं अशी माझी खात्री झाली आहे. सबब आपल्या इच्छेप्रमाणें मला रावसाहेबांच्या कन्येशीं संबंध जोडतां येत नाहीं,' असें मी काकांना स्पष्ट लिहिणार. तूं मात्र हुशारीनें ही कामगिरी पार पाड."

" वासुदेव, जावयास निघालेला आतां कांहीं मी थांबत नाहीं: तरी पण तुझं हें सारं कृत्य अविचाराचं किंबहुना स्वहिताला घातक होत आहे, असंच अद्यापि माझं मत आहे. तुला नसेल चंद्रिकेशीं लग्न करावयाचं तर तसं सरळ सांगायचं होतंस काकासाहेबांना; कादंबरींत दिसून येणारे हे लपंडाव व्यवहारांत खचित बरे नव्हत ! माझं काय, जर फशीं पडलों तर तुझ्या हितसंबंधांत पडल्यामुळेंच फसवणूक होऊन, तोंडफोडी झाली, अशा समाधानाच्या सांवलींत मी उभा राहीन. मग लोकनिंदेचा ताप कितीही प्रखर असला तरी मला बाधा होणार नाहीं. मुलीच्या नापसंतीच्या संबंधाचें म्हणून जें कारण तूं काढलें आहेस, तें मात्र अगदीं अन्यायाचं आहे ! चंद्रिकेला क्षणभरहि न पाहतां तिला दोष द्यावयाचा, हें पाप नाहीं का ? तिच्या बाबतींत तू इतका निष्ठुर कां होत आहेस, हेंच मला समजत नाहीं. " तारानाथ म्हणाला.

" तुझ्यासारख्या ' नाइट एरंट 'ला तें नाहींच समजायचं. तुला चंद्रिकेची इतकी दया येत असेल तर करीनास तूंच तिच्याशीं लग्न. बरं—ये आतां, गाडीची घटा झाली. "

तारानाथाची गाडी रात्रीं नऊ वाजतां रावसाहेब रुपे यांच्या गांवीं जाऊन पोहोंचली. वासुदेवानें सांगितल्याप्रमाणें त्याला नेण्यासाठीं राव-साहेबांकडून कोणीच आले नव्हते. जर त्याची त्या गांवांत इतरत्र ओळख असती, तर तितक्या रात्रीं तो रावसाहेबांचा बंगला शोधण्याच्या भानग-डींत पडला नसता. त्यानें एक धमनी भाड्यानें ठरवून गाडीवानाला राव-साहेब रुपे यांचा पत्ता सांगितला. सायंकाळीं पाऊस सुरू झालेला नुकताच उघडल्यामुळें रस्त्यांतून पाणी वहात होतें. साधारणपणें, सर्वत्र सामसुम झाल्याकारणानें, त्या थोडाफार शांत वातावरणांत झाडांच्या पानांवरून ठिबकणाऱ्या जलबिंदूंचा मंद नाद स्पष्टपणें ऐकूं येत होता. त्या शांत वातावरणांत तारानाथाच्या विचारशक्तीला चालन मिळालें. आपण येथ-पर्यंत तर आलों, पुढें आपल्या सोंगाची बतावणी कशी होईल ? ज्यांच्या-पुढें आपलें सोंग नाचवावयाचें, तीं माणसें कसल्या स्वभावाचीं असतील ? विशेषतः चंद्रिकेचा स्वभाव कसा असेल ? वगैरे प्रश्न तारानाथाच्या मनांत

उभे राहिले. एका तरुणीची फसवणूक करण्यांत आपलें अंग प्रामुख्यानें असावें, याबद्दल त्याला वाईट वाटत होतें; पण यावेळीं त्यानें त्या फसवणुकीचा मार्ग इतका आक्रमिला होता, कीं त्यातून परत फिरणें त्याला आतां शक्यच नव्हतें.

गार्डीनें गाव सोडल्यानंतर थोड्या वेळानें तारानाथाला एका बंगल्यांतून पियानोचा आवाज ऐकूं येऊं लागला. ह्या पियानोच्या स्वरांबरोबर इंग्रजी गाण्याचे कोमल ध्वनिही त्याच्या कानावर आले. तें संगीत खरोखरच संगीत होतें, त्यामुळें तारानाथाची चित्तवृत्ति किंचित् काल तल्लीन झाली. इतक्यांत गाडीवाल्यानें "उतरो साब, आया तुमारा बंगला," असें सांगितल्यावर तो गाडींतून उतरून बागेतून बंगल्याकडे जाऊं लागला. पियानोवर गाणारी व्यक्ति गाण्याच्या कोमल आवाजावरून स्त्रीच आहे, हें कोणीहि ओळखलें असते. ती चंद्रिकाच असेल काय, असा विचार यावेळीं तारानाथाच्या मनांत आला. पियानोवर जर इंग्रजी गाणें चंद्रिकेला गातां येत असेल तर काय बहार होईल, असें त्याला वाटलें.

पण बंगल्याचा व्हरांडा ओलांडून दिवाणखान्यात पाऊल टाकताच तारानाथाला निराळाच देखावा दिसला. एका आराम खुर्चीवर इंग्रजी पोषाक केलेला एक तरुण चिरुट पीत पडला होता. जवळच्या कोपऱ्यांत ठेवलेल्या पियानोवर गाणारी स्त्री श्वेतवर्णी इंग्रजी पोषाखांत दिसत होती. त्या स्त्रीला पाहून तारानाथाला कसेंसेंच झालें. ही रावसाहेब रुपे यांचींच माणसें कां? इंग्रजी पोषाखानें नटलेली ही तरुणी रावसाहेबांची चंद्रिका? रावसाहेबानीं वाटेल ती सुधारणा करावयाची होती, पण आपल्या महाराष्ट्रीय पोषाखाऐवजीं हा इंग्रजी पोषाख आपल्या मुलीला द्यावयाचा नव्हता, असें तारानाथाला वाटलें व रावसाहेब रुपे व त्यांची कन्या यांच्याविषयीं त्याचें मन एकदम कलुषित झालें.

अशा घोटाळ्यांत सांपडलेला तारानाथ पुढें जावें कीं नाहीं अशा विचारांत पडला असतां आरामखुर्चीवर पडलेल्या तरुणाचे लक्ष त्याच्याकडे जाऊन 'आपल्याला कोण पाहिजे?' असें त्यानें इंग्रजींत विचारलें.

"रावसाहेब रुपे येथें राहतात काय ?" तारानाथानें साशंक मुद्रेनें प्रश्न केला.

"छे, छे, आपण बंगला चुकलांत असें वाटतें." त्या तरुणानें उत्तर केलें, "येथें असिस्टंट सिव्हिल सर्जन डॉ. रुबेट राहतात."

क्षमा मागून तारानाथानें त्याची रजा घेतली. दारूनें झिंगलेल्या गाडीवाल्यानें रुपे आणि रुबेट यांच्या नांवाचा घोटाळा करून तारानाथाला या बंगल्यांत आणून सोडलें होतें. पुनः एकदां स्पष्ट खुलासा केल्यावर त्यानें शेवटीं तारानाथाला एकदाचें रावसाहेब रुपे याच्या 'चंद्रिका कॉटेज'मध्यें नेऊन पोचविलें.

तेथें त्याच्या जेवण्याखाण्याची वगैरे नीट व्यवस्था होऊन तो निजावयाच्या तयारीला लागला. तरी रावसाहेब अगर चंद्रिका यांपैकीं कोणीच दिसलीं नाहींत हें पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें व त्यांच्या-बद्दल एका नोकराजवळ त्यानें तपास केला. तेव्हां नित्याप्रमाणें तीं साडे-नऊ वाजतांच झोपीं गेलीं असें त्याला समजलें. त्यांच्या या वर्तनानें अपमान वाटण्याऐवजीं तारानाथाला समाधानच वाटून आजचें मरण उद्यांवर गेल्याचा त्याला आनंद झाला. कारण पहिल्याच धूळभेटीला आपल्याला तोंड देतां येईल कीं नाहीं, ही नवीनच शंका त्याला डंवचूं लागली होती, ती यावेळेपुरती तरी नाहींशी झाली, म्हणून त्याला बरें वाटलें. बिछान्यावर पडल्यानंतर, कसें होतें काय होतें, असें एकसारखें त्याच्या मनांत चालल्यामुळें त्याच्या डोक्यांत विचारांची गुंतागुंत माजून त्यांचें एक जाळेंच बनलें आणि त्या जाळ्यांत गुरफटला असतां तारानाथाचा डोळा लागला.

[ ५ ]

तारानाथाचा स्वभाव कशा प्रकारचा होता याची साधारण कल्पना वाचकांना आलीच असेल. लहानपणीं पोरका झाल्यानें, त्याचा आतां-पर्यंतचा बहुतेक काल त्याच्या दूरच्या नातेवाईकांच्या घरींच गेला होता. पैशासाठीं जवळ केलल्या या पोरक्या पोराला प्रेमाचा ओलावा कोठून मिळणार ? पूर्वस्थिति कळूं लागून, जगांतील स्वार्थाची जाणीव झाल्या-

वर तारानाथाच्या स्वभावाला एकलकोंडेपणा आवडूं लागला. आपण होऊन बोलावयाला जावयाचें नाहीं. कोणी बोलावयाला आलेच, तर त्यांच्याशीं कामापुरतें दोन शब्द बोलावयाचें, असा त्याचा जणु काय नियमच असे. मग मित्रमंडळींत मिळून मिसळून वादविवाद करणें, गप्पाटप्पा मारणें, हें त्याच्याकडून कसें होणार? त्याचें मन मूळचें उदार असल्यामुळें, त्याला एकांतामुळें कुढेपणाची दुर्गंधि मात्र प्राप्त झाली नाहीं. उलट ओसाडीच्या ओढ्यावर वाढलेल्या रानवेलीच्या फुलाप्रमाणें त्याच्या स्वभावाचा सुगंध वासुदेवासारख्या त्याच्या मित्राला मिळत असे. दुसऱ्या एकाद्याला एकांतवास हा शिक्षारूप वाटला असता; पण तारानाथाला त्याच्या आवडत्या पुस्तकांची सोबत असल्यानें, त्याची स्थिति उलट चांगलीच होती, असें म्हटलें पाहिजे. त्याची मुद्रा त्याच्या उदार मनाची साक्ष पटविणारी असे, तरी बारकाईनें पहाणाराला तिच्यांत उदासपणाची छटा दिसली असती. पौर्णिमेच्या मध्यरात्रीं आपल्या ऐश्वर्याच्या पूर्णत्वानें जगाला शोभा आणणाऱ्या चंद्राच्या प्रकाशाच्या पोटीं खेळणाऱ्या खिन्नतेशीं तारानाथाच्या चेहऱ्यावर दिसून येणाऱ्या उदासपणाचें साम्य असल्याने, तारानाथ एकप्रकारें आपलें नांव सार्थ ठरवीत होता. अलीकडे त्याला तीव्रतेनें भासू लागलेल्या प्रेमशून्य जगांतील एकटेपणाची छाया त्याच्या मुद्रेवर स्पष्ट दृगोचर होत असे. असो.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं तारानाथ उठला. मुखमार्जनादि विधी उरकल्यावर आतां पुढें काय होतें, याचा विचार करीत आपल्या खोलींत तो येरझारा घालीत असतां, चहाचें आमंत्रण आलें. रावसाहेब आपल्या खोलीत त्याचीच वाट पहात बसले होते. जवळच एक तरुणी चहाची तयारी करीत होती. तिला पहातांच ही चंद्रिकाच असावी, असा तारानाथानें तर्क केला. बराच वेळपर्यंत तारानाथाचें वर्तन एकाद्या नुकत्याच धरून आणलेल्या रानटी जनावराप्रमाणें होतें.

"वासुदेवराव, आपण काल रात्रीं आलांत?" रावसाहेबांनीं प्रश्न केला.

"होय."

वासुदेवराव म्हणून संबोधितांच तारानाथाच्या छातींत धडधडलें, गालावर लाली चढली आणि एखाद्या पहावयास आलेल्या अजाण पोरी प्रमाणें त्यानें मान खालीं घातली.

" वासुदेवराव, आपण आल्यावेळींच आपलं स्वागत मला करतां आलं नाहीं, याबद्दल मी दिलगीर आहें. "

" छे, दिलगीर असायचं कारण काय ? " तारानाथानें धीर करून उत्तर दिलें.

चंद्रिकेनें त्याच्यापुढें चहाचा पेला ठेविला आणि ' एकदम गरम शिऱ्याची वाटी ठेविली. आता तो खावयाला सुरवात करणार इतक्यांत त्याची नजर रावसाहेबाच्या चेहऱ्याकडे गेली आणि त्याच्या नजरेची व त्याच्याकडे लागलेल्या रावसाहेबाच्या शोधक व भेदक नजरेची ओझरती भेट झाली. चोराच्या मनात चांदणें म्हणतात, त्याप्रमाणें तारानाथाला वाटलें, कीं घनपदार्थ भेदून त्याला पारदर्शक बनविणाऱ्या एक प्रकारच्या विद्युत्किरणाप्रमाणें रावसाहेबांचीं दृष्टिकिरणें आपल्यावर पडून तीं आपण धारण केलेलीं खोट्या नांवगांवाचीं कवचें भेदून टाकून, वस्तुस्थितीच जणूं काय शोधून काढताहेत. तारानाथाची फारच तारंबळ उडाली. त्याला कांहीं सुचेनासें झालें. तितक्यांत चंद्रिकेनें कांहींशी त्याला, कांहींशी रावसाहेबांना उद्देशून ' चहा निवतो आहे ! ' अशी सूचना केली. त्याच्या विसकटलेल्या मनाची घडी नीट बसली नव्हती, म्हणून त्यानें त्या गरम शिऱ्याचा एक घांस व चहाचा एक तोंडभर घोट यांचा एकच भरणा तोंडांत भरला. ते दोन्ही पदार्थ गरम असल्यानें त्याचें तोंड आंतून चांगलेंच भाजून निघालें, कान लाल झाले, आणि डोळयांतून तितक्याच गरम अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. यावेळीं गंभीर राहून तोंडावरील एक सुरकुतीहि हलूं द्यावयाची नाहीं, असा रावसाहेबांचा निश्चय झालेला दिसला. चंद्रिका मात्र दयेनें द्रवली. अशाच थोड्या फार विचित्र प्रसंगांनंतर चहाचा समारंभ एकदांचा आटोपला.

दोनप्रहरीं जेवणाचे वेळीं, सकाळच्या संवयीमुळें तारानाथाची धांदल थोडीशी कमी प्रमाणांत–तरी उडाली, यांत शंका नाहीं. त्याची

धांदल पाहून आलेलें हंसू चंद्रिका मोठ्या शिकस्तीनें आवरीत होती. निश्चयानें केलेला हुकूम ऐकून ओठाच्या पोवळ्यांनीं दन्ताची मुक्तमाला आपल्या कोंदणींत कौशल्यानें कोंडून टाकिली, तरी गालांवरील चिमुकल्या खळग्यांनीं बंडखोर ठरून दगा दिलाच !

कचेरीला जातांना रावसाहेबांनीं चंद्रिकेला, घरच्या गाडींतून सायंकाळीं तारानाथाला फिरावयास घेऊन जाण्यास सांगितलें. तारानाथालाहि ते म्हणाले ' वासुदेवराव, मी आतां रात्रीचे आठ वाजेपर्यंत येणार नाहीं. तोंपर्यंत चंद्रिका तुमच्या दिमतीला राहील. तिच्याशीं असें भिडस्तपणानें वागूं नका. Try to make a best friend of her. I need not remind you of the fact that she is to be your life's mate !'

रावसाहेबांनीं जरी असा उपदेश केला, तरी तारानाथाचें मन कांहीं मोकळें होईना. सायंकाळपर्यंत त्याच्याशीं बोलण्याचा चंद्रिकेनें तीन चारदां प्रयत्न केला; परंतु, त्या अरसिकानें आपल्या कॉलेजच्या मित्रांना द्यावींत तशीं त्रोटक उत्तरें तिला दिलीं. गाडी जोडल्यानंतर चंद्रिका त्याला बोलवावयाला आली—

" फिरायला जायचं ना ?"

" होय."

गाडींत बसून बराच वेळ झाला तरी कोणी कोणाशीं बोलेचना. एकमेकांना अनोळखी असलेल्या आंग्ल प्रवाशाप्रमाणें दोघेंही गप्प बसलीं होतीं. शेवटीं चंद्रिका आपण होऊनच रस्त्यावरील विशेष गोष्टींची माहिती सांगूं लागली, तरी हुंकाराशिवाय तारानाथाकडून तिला प्रोत्साहन मिळालें नाहीं. शेवटीं दिवे लागणीच्या वेळीं त्याची गाडी रेसकोर्समधील अत्यंत उंचवट्याच्या जागीं आली तेव्हां चंद्रिकेनें विचारलें " इथं उतरून थोडं फिरावं म्हणतें."

" कांहीं हरकत नाहीं " तारानाथ म्हणाला.

तारानाथ प्रथम उतरला, मागून चंद्रिका उतरूं लागली. यावेळीं जोराचा वारा सुटल्यामुळें गाडीच्या पायरीवरून तिचे पाय सुटावयाला आणि गाडीच्या पावखड्यास तिचा पदर अडकावयाला एकच गांठ पडली

त्यामुळें ती तोंडावर पडण्याच्या बेतांत आली; पण सुदैवानें तारानाथ यावेळीं भानावर असल्यामुळें थोडक्यांत बचाविलें. चंद्रिकेला त्यानें एका हातानें वरच्यावर तोलून धरिली. नीट उभी राहिल्यावर तिनें तारानाथाकडे कृतज्ञतेनें पाहिलें. याचवेळीं तरुण तारानाथाची नजरहि तिच्याकडे गेल्या· मुळें सहज सद्‌गुणी, सरल चंद्रिका लज्जित होऊन अधोवदन झाली. यावेळीं झालेल्या परस्पराच्या स्पर्शमात्रानें त्यांचीं शरीरें रोमांचित झालीं. आतां तारानाथाच्या मागील अमर्याद मर्यादेचें ग्रहण सुटलें व चंद्रिकाही लज्जेमुळें अधिक मनोहर दिसूं लागली.

आमच्या फार वेळपर्यंतच्या 'मूक नायका'नें प्रश्न केला "तुला कांहीं लागलंबिगलं तर नाहीं ना?"

तारानाथाच्या बोलण्यातील हा एकेरीपणा चंद्रिकेच्या लक्षांत आल्या-शिवाय राहिला नाहीं. तरीपण आपल्या लक्षांत ही गोष्ट आलीच नाहीं, असें दाखवून तिनें उत्तर दिलें "सांवरलं म्हणून बरं झालं बाई, नाहींतर बत्तीशीच बाहेर आली असती.

"बत्तीशी निखळली असती तुझी, परंतु अजागळपणा पदरीं बांधला जाऊन तोंडफोड झाल्यामुळें जगांत तोंड दाखवायला जागा राहिली नसती मला!"

"मग मला सांवरून धरण्यांत परार्थापेक्षां स्वार्थच अधिक होता म्हणायचा!"

[ ६ ]

तारानाथाला जाऊन चारपांच दिवस झाल्यानंतर एके दिवशीं वासुदेवाला यमुताईचें पत्र आलें. त्यांतील मजकूर त्याला सर्वस्वी निरु-त्साही करण्यासारखा होता. तिनें लिहिलें होतें:—

"ती. दादास, यमुताईचा नमस्कार.

तुझें पत्र पावलें. बेत समजला. तुझ्या बेताविषयीं काय लिहावें तेंच समजत नाहीं. असा बेत तुझ्यानें करवला तरी कसा? बाकी, माझ्या-सारख्या शिक्षणांत मागासलेल्या मुलीला जें अयोग्य वाटतें तेंच कॉलेजां-तील मुलांना व्यवहार्य वाटत असेल. असो. तूं यंदा दिपवाळीसाठीं आमच्या

येथें येणार हें वाचून तर मला फार आनंद झाला आहे. खरंच दादा, कां नाहीं होणार? पण तूं ज्या हेतूनें येथें येणार आहेस तो फलद्रुप होईल ही अशा मात्र बिलकूल धरूं नकोस. भेटल्यावेळीं आणि पत्रद्वारें तूं केलेल्या आग्रहाकरितां मी तिकडून कालिंदी तुला देण्याबद्दल नानासाहेब इनामदारांच्याजवळ बोलणे काढविलें. तेव्हां नानासाहेब म्हणाले, कीं काकासाहेबांसारख्या सुधारकाच्या पुतण्याला मी नाहीं देणार माझी मुलगी! आणि काल मुरलीधराच्या देवळांत कालिंदीच्या आईच्याच तोंडून कालिंदी तुमच्या कॉलेजांतील देशपांडे नांवाच्या विद्यार्थ्याला द्यावयाचें ठरलें असल्याचेंहि मी ऐकलें. खटपट करण्यांत माझ्याकडून मी कसूर केली नाहीं; परंतु, दादा, लागाबांधा नाहीं त्याला कोण काय करणार? तूं मात्र तारादादासकट साऱ्यांची फसवणूक केली आहेस. बिचारा तारादादा सरळ हातांनीं परत येवो, म्हणजे झालें. रावसाहेबांना जर हें सारें गौडबंगाल उमगलें, तर ते तारादादाला चतुर्भुज करावयालाहि कमी करणार नाहींत! म्हणून म्हणतें, तूं मात्र आपल्या मित्र धर्माला जागला नाहींस, असेंच मी म्हणेन. असो, झालं गेलं होऊन गेलं. आता दिपवाळीला पुरता आठवडाच उरला आहे, तर येणार असशील तर लौकर निघून ये. तूं येणार नसशील तर तसें कळीव; कारण तसें झाल्यास आम्ही दोघेहि दुसऱ्या गांवीं दिपवाळीकरिता जाणार आहों. तुझ्या पत्राची वाट पहात आहे. क. लो. हे वि.

तुझी

**यमुताई.**"

स्वतःकडे अडाणीपणा ठेवून यमुताईनें वासुदेवाच्या डोळयात चांगलें अंजन घालण्याचा प्रयत्न केला होता; पण या पत्राचा त्याच्या मनावर विशेष परिणाम झाला नाहीं. कालिंदीविषयींचा डाव हुकला तर चंद्रिकेला वरून काकांना तरी संतुष्ट करावें, असा त्यानें बेत केला. एखादी गोष्ट वासुदेवाच्या मनांत येण्याचा अवकाश, मग ती गोष्ट त्यानें केली नाहीं, असें झालेंच नाहीं. सरळ रावसाहेबांच्या घरचा रस्ता धरावा, आणि खरा वासुदेव तो मी, आणि घरांत शिरलेला तो नामधारी असें सांगून

काकांच्या इच्छेप्रमाणें चंद्रिकेचें पाणिग्रहण करावें, असें त्यानें ठरविलें. मात्र हा आपला बेत तारानाथाला कळवावा, असा विचार करून त्याप्रमाणें लगेच त्यानें त्याला पत्र लिहिलें, व त्याचा सल्ला विचारला. तारानाथाचें उलट टपालानें उत्तर आलें. त्यांत त्यानें " आपण येथें यावें, मग काय तें उभयतांच्या विचारानें ठरवूं. " असें लिहिलें होतें. हें उत्तर वाचून वासुदेव संतापला. त्यानें पत्र फाडून त्याचे तुकडे तुकडे केले. तो स्वत:शीं पुटपुटला "Senseless brute!" म्हणे तेथें या, या कोणाच्या येथें? बसला असेल तेथें घृतकुल्या मधुकल्या करीत, मग असेल कशाला आमची दरकार! पण म्हणावें राजश्री, पाणजावई म्हणजे खरा जांवई नव्हे, हें आपल्याला ठाऊक नाहींसें दिसतें! तेथें मी प्रगट झालों तर उभ्या गांवांत तुकडा मोडावयाला न मिळाल्यामुळें तुझे हाल कुत्रादेखील खाणार नाहीं; परंतु मला तसें करावयाचें नाहीं. मला माझ्या मित्रधर्माला जागावयाचें आहे!"

रावसाहेबाच्या गांवीं, रावजीपंत नावाचे कापडाचे व्यापारी काकासाहेबांचे स्नेही होते. वासुदेव त्यांच्या घरीं उतरला. रावसाहेब आणि रावजीपंत यांची व्यवहारापुरती तोंडओळख असल्यानें आपल्या इच्छित कार्याची पूर्वतयारी करण्यासाठीं रावजीपंताच्या घरीं कांहीं काळपर्यंत अज्ञान वासांत राहणें वासुदेवाला कठीण गेलें नाहीं. तो आला त्या दिवशीं दोनप्रहरींच, यावेळीं रावसाहेब कचेरीला गेले असतील आणि तारानाथ एकटाच असेल अशा समजुतीनें वासुदेवानें, सही न करितां, "मी येथें आलों आहे. सायंकाळीं, सरकारी आराम बागेंत मला येऊन भेटावें," अशी चिठ्ठी रावजीपंतांच्या गड्याबरोबर रावसाहेबांच्या बंगल्यावर पाठविली.

गडी आला त्यावेळीं तारानाथ वामकुक्षी करीत होता. चंद्रिका बंगल्याच्या व्हरांड्यांत वर्तमानपत्र वाचीत बसली होती. गड्यानें नामधारी वासुदेवरावांचा तपास केला व त्यांना चिठ्ठी द्यावयाची आहे असें सांगितलें. ते झोंपले आहेत, असें सांगून चिठ्ठी चंद्रिकेनें मागितली. पण ती इतर कोणाजवळ द्यावयाची नाहीं अशी ताकीद असल्याचें सांगून तिच्याकडे ती देण्याचें गड्यानें नाकारिलें.

" तूं कुणाकडून आलास ? " चंद्रिकेनें विचारिलें.

" रावजीपंत कापडवाल्याकडून. "

" त्यांनीं का चिठ्ठी दिली आहे ? "

" नाहीं, त्याच्या घरीं आलेल्या पाहुण्यांनीं. "

" त्या पाहुण्यांचें नांव काय ? "

" त्यांचें नाव नाहीं मला ठाऊक."

" बरं आहे, कांहीं हरकत नाहीं. ते पाहुणे आमच्या ओळखीचे आहेत, दे ती चिठ्ठी इकडे. मी देईन आमचे पाहुणे जागे झाल्यावर त्यांना. "

नाइलाज झाल्यामुळें गड्यानें चिठ्ठी चंद्रिकेच्या हातांत टाकिली व तो निघून गेला.

तारानाथ जागा झाल्यावर चंद्रिकेनें चिठ्ठी त्याला दिली. ती वाचतांच, अलीकडे चारपांच दिवसांत आनंदी व प्रफुल्लित दिसणाऱ्या त्याच्या चेहऱ्यावर चिंतेच्या रेषा एकदम उमटल्या.

हा फरक ध्यानांत आलाच नाहीं, असें दाखवून चंद्रिकेनें हंसत विचारिलें " कोणाकडून आली आहे चिठ्ठी ? "

" माझा एक कॉलेजांतील मित्र येथें आला आहे, त्यानं पाठविली आहे ही चिठ्ठी. "

" कॉलेजांतील मित्र ? काय त्यांचं नांव ? "

" वासु–ता–ता–रा–नाथ. "

" अग बाई, घशांत घुंगरडं गेलं कीं काय ? काय पण आवाजात फरक झाला आणि शब्द घोटाळले. " चंद्रिका जरा खोंचून म्हणाली. " मला आज आपल्याबरोबर फिरावयाला येतां येणार नाहीं. मला आज माझ्या मैत्रिणीकडून बोलावणं आलं आहे. "

" जा, माझी कांहीं हरकत नाहीं. "

चंद्रिका आपल्याशींच पुटपुटली, " आपली कशाला हरकत असेल ! "

[ ८ ]

सायंकाळीं चारांच्या सुमारास वासुदेव आरामबागेंत जाऊन तारानाथाची वाट पाहूं लागला. एक तास होऊन गेला, तरी तारानाथाचा पत्ता नाहीं, हें पाहून वासुदेवाच्या संतापाचा पारा चढूं लागला. जसजसा एक एक पळ लोटूं लागला आणि तारानाथ येण्याचें कांहीं चिन्ह दिसेना तसतसें त्याचें डोकें भडकत चाललें. तारानाथाला वाटेल तशीं दूषणें व शिव्याहि तो देऊं लागला. शेवटीं एकदांचा सहा वाजतां तारानाथ दूरच्या फाटकांतून येताना दिसला. तो दिसतांच, आपण कोठें आहो हें त्याला कळविण्यासाठीं वासुदेवानें खिशांतून आपला हातरुमाल काढून फडकाविला. तारानाथाला खूण पटली आणि तो वासुदेवाकडे येऊं लागला. तारानाथाला वासुदेवानें बागेच्या अगदीं एका निर्जन बाजूला नेलें व म्हणाला "तारानाथ, साऱ्या गोष्टींचा विचार करून, मी असें ठरविलें आहे कीं, आज रात्रींच्या गाडीनं तूं कोणालाहि न कळवितां येथून निघून गेलं पाहिजे. उद्यां सकाळीं खरा वासुदेव म्हणून मी रावसाहेबांच्या घरीं जाणार आहे."

"पण त्यांचा तुझ्यावर विश्वास कसा बसेल ?"

"त्याची नको आपल्याला काळजी ! आमच्या घरच्या मंडळींच्या फोटोची एक कॉपी मी बरोबर आणिली आहे. त्या कॉपीवरून खरा वासु-देव तो मीच अशी मी खात्री पटवून देईन रावसाहेबांची."

"आणि मी कोण म्हणून त्यानीं विचारलं तर ?"

"तोतया म्हणून सांगेन !"

"वा, पुढें मागें त्याची व माझी कोठें गांठ पडल्यास त्यांनीं आमच्या अब्रूचा धागान् धागा ढिला करावा, छान !"

"तारानाथा, या अडचणी अगदीं क्षुल्लक असून, तूं त्या केवळ अभिलाषबुद्धीनें काढितो आहेस, हें मी ओळखून आहे, आणि तसंच पाहिलं तर मी कां तुझ्या भविष्याची काळजी करावी ? तरी पण मी तुला आज एवढं वचन देतों, कीं सारं कार्य व्यवस्थितपणें पार पाडून शांततेचं साम्राज्य सुरू झाल्यावर तुझ्याबद्दल मी त्यांची क्षमा मागेन. मग तर झालं ना ?"

“ पण चंद्रिकेला हें—”

“ चंद्रिकेला काय ?—चंद्रिकेला आपण विसरा आतां महाराज ! तारानाथ, मला सगळं कळतं आहे, समजलास ? मित्राच्या वाग्दत्त वधूचा अभिलाप धरणं हें महापाप आहे ! आज रात्रीं तूं येथून निघून गेलंच पाहिजे ! नाहीं गेलास तर उद्यां सकाळीं रावसाहेबांच्या घरीं माझ्याकडून फुकट आपली फजिती करून घेशील. आतां जा. रात्रीं स्टेशनवर मी तुला भेटेन.”

पुढें एक अक्षरही न बोलता वासुदेव झपाट्यानें निघून गेला. तारानाथहि तेथून जड पावलांनीं आणि विपण्णांतःकरणानें रावसाहेबांच्या बिऱ्हाडीं चालता झाला.

तारानाथाच्या आधीं चंद्रिका घरीं आली होती. गेल्या तीन चार दिवसांप्रमाणें आज तिनें तारानाथाचें स्वागत केलें नाहीं. रावसाहेबहि आज त्याच्याबरोबर बोलावें, तसें बोलले नाहींत व रात्रीचें जेवण झाल्यावर ‘ आज माझें डोकें दुखतें आहे ’ असें सांगून ते आपल्या शयनगृहात गेले. तारानाथाच्या डोक्यात यावेळीं विचारांनीं नुसतें काहूर करून सोडलें होतें. शेवटीं वासुदेवाच्या सांगण्याप्रमाणें वागावयाचें ठरवून तो आपल्या खोलींत जाऊन निघण्याची तयारी करूं लागला.

यावेळीं रात्रींचे दहा वाजून गेले होते. तारानाथाची जाण्याची तयारी होऊन त्यानें पोषाख केला. आतां संधि साधून मागच्या फाटकानें पाय काढावयाच्या तो विचारात होता. इतक्यांत चंद्रिका अगदीं आकस्मिक त्याच्या खोलींत आली. तारानाथाची स्वारी हातांत बॅग घेऊन उभी होती. तें पाहून आश्चर्य दाखवून ती म्हणाली “ म्हणजे ? ही बांधाबांध काय म्हणून ? आपण पोषाखही चढविला आहे. आपण चाललांत कुठं ? आहे तरी काय बेत ?”

“ तें तुला उद्यां सकाळीं समजेल. मला आतां गेलंच पाहिजे. चंद्रिके, मी एक दुर्दैवी प्राणी आहे ! उपकार कर आणि माझं कधींही स्मरण होऊं देऊं नकोस ! ”

तारानाथाला गहिंवर आला, त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले; पण चंद्रिकेला याचें कांहींच वाटलें नाहींसें दिसलें. ती सस्मित आणि उपरो-

धिक नजरेनें त्याच्याकडे पहात होती. त्या तिच्या निष्ठुर वर्तनामुळें झालेल्या जखमेवर ही खाऱ्या पाण्याची धार धरीत आहे, असेंच तारानाथाला वाटलें. प्रेमाच्या बाजारांत फसवणुकीचा आला त्यापेक्षा आतां अधिक अनुभव येणें नको, म्हणून होतां होईल तों तेथून लौकर पाय काढण्याच्या इराद्यानें तारानाथ बाहेर जाऊं लागला. पण चंद्रिका दारांत उभी राहून म्हणाली "हें काय भलतंच ? चांगली दिवाळी दोन दिवसांवर आली आहे आणि असं एकाएकीं जायचं म्हणजे काय ? मी नाहीं जाऊं जायची !"

"चंद्रिके, मी कोण आहे व काय केलं आहे हें कळल्यास मला येथें राहण्याचा आग्रह करायचं सोडून देऊन तूं उलट माझा तिरस्कार करूं लागशील."

"तर मग मी मुळींच जाऊं देणार नाहीं ! खरा प्रकार मला कळलाच पाहिजे !"

"चंद्रिके, मी तुझ्या पायां पडतो. माझं गुपित रावसाहेबांच्या कानांवर जाण्याच्या आधीं मला येथून पाय काढला पाहिजे. चंद्रिके, या संकटांतून पार पाडण्यास तुझ्यावाचून मला आतां कोणीहि साहाय्य नाहीं. मला जाऊं दे." तारानाथ अगदीं काकुळतीला आला.

"तें कांहीं नाहीं !" चंद्रिका म्हणाली. "मी नाहीं जाऊं द्यायची; मी बाबाना हाक मारतें—पण कशाला, ते पहा बाबा आलेच."

रावसाहेबांना पाहून तारानाथ मटकन् खालींच बसला. त्याच्या डोळ्यांपुढें काजवे चमकूं लागले. "तारानाथ" रावसाहेब म्हणाले "आज रात्रीं तुम्ही येथून पळता पाय काढणार, हें मला संध्याकाळींच कळलं होतं. जाण्याचा विचार आतां सोडून द्या."

रावसाहेब आतां आपल्याला पोलीसच्याच ताब्यांत देणार, असें तारानाथाला वाटलें. पांचदहा क्षण थांबून रावसाहेब पुनः म्हणाले, "भावी जामात या नात्यानें तुमच्या हस्तें यंदा लक्ष्मीपूजन करविण्याचें मी ठरविलें आहे."

"रावसाहेब, दया करा आणि माझी थट्टा करूं नका, मला जाऊं द्या. आपण समजतां तो मी नव्हे. कृपा करून मी कोण तें आपण विचारू

नका. मी अज्ञान आहे असं समजून, माझे अपराध उमगल्यावर मला आपण क्षमा करा."

"छे, छे, विचारायचं कारण नाहींच. तुम्ही कोण हें तुम्ही येथें येण्यापूर्वींच आम्हांला समजून चुकल आहे. जाणून बुजूनच तुमच्याकडून लक्ष्मीपूजन करायचं मी ठरविलं आहे. ही पहा निमंत्रणपत्रिका. तुम्हीच पहा तींत तुमचं 'तारानाथ' असं नांव छापलं आहे कीं नाहीं तें."

तारानाथानें पत्रिका पाहिली तों खरेंच रावसाहेबांनीं सांगितल्या-प्रमाणें तींत मजकूर होता.

तारानाथ रावसाहेबांचे पाय धरून म्हणाला "रावसाहेब, अशा खोटेपणानं वागणाराला आपण देतां तो मान योग्य नाहीं. आपण या अजाण बालकाला क्षमा करा."

"तारानाथ, झाल्या प्रकाराबद्दल तुम्ही कांहींहि वाटून घेऊं नका. अशा प्रकारचे अपराध तुम्हां तरुणांकडून व्हायचेच. मात्र त्यात अंतः-करणाचा दुष्टपणा नसला पाहिजे. आजपर्यंत मी ऐकत असलेली आपली स्वभावप्रशंसा, प्रशंसा नसून उलट वस्तुस्थितीच्या वर्णनांतील कमतरताच आहे, असं मला तुमच्या चार दिवसांतील सहवासानं कळून चुकलं आहे. वासुदेवापेक्षां तुमचीच निवडणूक अनेक कारणांनीं मला श्रेयस्कर वाटल्यानं तुम्हालाच जावई करण्याचं मी ठरविलं आहे. तीं कारणं कळतीलच सावकाशपणानं. शिवाय तुमच्याबद्दल एक तोंडी सर्टिफिकेट आमच्याकडे आलं आहे," असें म्हणून रावसाहेब चंद्रिकेकडे पाहूं लागले; पण ती तेथें होती कुठें ? पुढला होणारा प्रसंग ओळखून लज्जेनें ती केव्हांच पळाली होती.

इतकें सारें झालें तरी, रहस्यभेदाच्या जाणिवेनें उद्भूत झालेल्या भीतीला हद्दपार करून, तिची जागा चंद्रिकेसारख्या सुशील, सुंदर आणि सुशिक्षित तरुणीचीं पत्नी म्हणून लाभ होणार या कल्पनेनें होणाऱ्या अत्यानंदाला मिळवितां येईना. सकाळीं वासुदेव येऊं दे आणि तुम्ही रात्रीं स्टेशनवर न गेल्यानं तो येणारच—तो आल्यावर आढ्यतेनं कांहीं सांगूं लागल्यास निर्विकार चेहऱ्यानं सारें ऐकून घेऊन, शेवटीं तें आम्हांला

सारं माहित आहे, असं थंडपणानं सांगून, त्याला चांगलं फजित करावयाचं असं चंद्रिकेचं म्हणणं पडलं आहे. पण, त्याची अकल्पितपणानं फजिति करायची नाहीं व कांहींहि करून त्याला सकाळीं आठाचे आंत घडलेला प्रकार कळवायचा, असा तारानाथाचा आग्रह पडला. यावर बराच वादविवाद होऊन, शेवटीं तारानाथाच्या मताप्रमाणेंच करावयाचें ठरलें: पण कसें कळवायचें याबद्दल मोठी फिकीर येऊन पडली. अखेरीस चंद्रिकेनें युक्ति सुचविली. एक निमंत्रणपत्रिका वासुदेवाला आतांच पोस्टानें पाठविल्यास सारें काम होईल, असें ठरवून त्याप्रमाणें एक पत्रिका वासुदेवाला पाठविण्यात आली.

दुसरे दिवशीं सकाळीं, तारानाथ रात्रीं स्टेशनवर न गेल्यामुळें संतापलेला वासुदेव त्याची फजिती करण्याच्या उद्देशानें रावसाहेबांच्या बंगल्यावर जाण्यासाठीं निघणार, इतक्यांत पोस्टाच्या शिपायानें त्याच्या हातांत त्याच्या नांवचीं दोन पत्रें दिलीं. त्यापैकीं एकांत निमंत्रणपत्रिका होती. ती पत्रिका त्यानें कमींत कमी पंधरा वेळां वाचली असेल; पण तिच्यातील मजकुराचा त्याला बोधच होईना ! दुसरें पत्र यमुताईचें होतें. त्यात तिनें फक्त " दादा क्षमा कर. मी काय व कां केलं तें तेथें मी आल्यावर समक्षच सांगेन. " इतकेंच लिहिलें होतें.

[ १० ]

वासुदेवाबद्दल तारानाथानें रावसाहेबांच्या घरीं दिवाळसणाकरितां जावें असें ठरल्यानंतर वासुदेवानें यमुताईला पत्र लिहून आपला बेत कळविला. पण तो यमुताईला न आवडून तिनें त्या बेताची बातमी पत्रद्वारें आपल्या मैत्रिणीला–चंद्रिकेला–दिली. चंद्रिकेनें ते सारे रावसाहेबांना सांगितलें. त्याप्रमाणें यमुताईनें, त्या दोघांनीं लावलेल्या सुरुंगाच्या खालीं सव्वाहात आपला सुरुंग लावल्यामुळं, वासुदेवाचा सारा बेत ढांसळला. आपणच रचलेल्या फसवणुकीच्या कटांत वासुदेव आपणच फसला.

चंद्रिकेच्या तोंडून ही सारी हकीकत ऐकल्यावर तारानाथ म्हणाला, " यमुताई माझ्या पाठची बहीण नसून, तिनें यावेळीं माझी पाठराखण केलीन् म्हणावयाची. "

" तिचं आपल्यावर फारच प्रेम आहे. आपल्याविषयीं तिनं फारच कळवळून आणि जिव्हाळ्यानं लिहिलं आहे. "

" कोठें आहे तें पत्र ?"

" अगदीं इतकी घाई नको काहीं, मी तें पत्र दाखविणार होतेंच."

यमुताईच्या पत्रांतील तारानाथासंबंधींचा महत्त्वाचा भाग पुढील-प्रमाणें होताः—

" आमचा वासुदादा जरा अधिक शहाणा असल्यानें त्याला नेहमीं कसल्या तरी भानगडी हव्या असतात. तो एकटाच जर कांहींहि करता तर मी इतकी तळमळलें नसतें. पण तो प्रत्येक खेपेला तारादादाला त्यांत गुंतवितो आणि मग त्याच्याकरितां मला मध्यें हात घालावा लागतो. आतांचा प्रकार त्यापैकींच आहे; पण नेहमींपेक्षां अधिक वाईट, आणि लाजिरवाणा आहे. शेवटीं चंद्रिके, तुला इतकेंच सांगावयाचें आहे, कीं माझा तारादादा साधाभोळा आहे, त्याला संभाळून घे. तुझ्याशिवाय आतां त्याला दुसरा तारक–तारा नाहीं ! "

पत्र वाचून होतांच तारानाथाच्या नेत्रांतून गहिंवरून कृतज्ञतेच्या अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. तारानाथ म्हणाला, " माझ्या ताईला केव्हां भेटेन असं मला झालं आहे. "

" तिला आणि तिच्या नवऱ्याला बाबानीं मुद्दाम यंदा येथें दिपवाळीकरितां बोलाविलं आहे. फार करून उद्यांच तीं येथें येतील. "

———

# ६ आंधळ्याची शाळा

कित्येक दिवस मी त्या आंधळ्याला त्या पुलाच्या वळचणीला हातांत एक अल्युमिनियमचा कटोरा घेऊन उभा असलेला पहात होतों. एके काळीं याचें शरीर चांगलेंच धष्टपुष्ट असावें असें त्याच्या शरीरावरच्या खाणांखुणावरून स्पष्ट दिसत असे; परंतु, पोसून वाढलेलीं हाडें आतांच्या उतरत्या वयांत त्याला इतकीं जड झालीं होतीं कीं, त्यांच्या भाराखालीं तो पुरता वांकून गेलेला होता. 'नाहीं आतां हा भार सोसवत' असें सुचविण्यासाठींच कीं काय त्याची मान एकसारखी डावीकडून उजवीकडे घड्याळाच्या लंबकासारखी हालत असे. एका सुरकतीची किमत पंधरा वर्षे धरली असती तर त्याच्या गळयाच्या आणि हनुवटीच्या कांतड्यावर स्पष्टपणें उमटलेल्या सुरकत्यांवरून त्या आंधळ्याचें वय निदान पाऊणशे वर्षांचें ठरलें असतें. "पांडुरंगाच्या भगताच्या आंधळ्यावर दया कर रे बाबा!" असें तो येणाऱ्या जाणाऱ्याची चाहूल लागतांच म्हणत असे. त्याच्या जाड्याभरड्या आवाजात असा एक कंप आलेला असे कीं ऐकणाराच्या कानांतून शिरून तो काळजापर्यंत पोहोचत असे. हाताहाताच्या अंतरावर त्या पुलाच्या आसपास बसलेल्या इतर भिकाऱ्यांप्रमाणें तो एकसारखा आरडाओरड करीत असलेला मला कधींच आढळला नाहीं. थोडें ओरडावें आणि पुष्कळ घ्यावें, अशा प्रतिष्ठित भिकाऱ्याच्या--म्हणजे नामांकित संस्थांच्या चालकांच्या–यशस्वी धोरणानें त्यानें आपली भिकेची कामगिरी चालविलेली होती, हें मला चारसहा दिवसांतच कळून आलें. आरडाओरड करून, पोटावर चापट्या थापट्या मारून दहांतील एकाकडून दमडीटोली मिळविणाऱ्या त्याच्या सहव्यवसायी शेजाऱ्यांपेक्षा या आंधळ्याचा धंदा अधिक किफायतशीर चालत असलेला मला दिसून आला. दहांतील किमानपक्ष सहा सात लोक तरी त्याच्याच कटोऱ्यांत कांहींतरी टाकल्याशिवाय पुढें होत नसत. प्रारंभीं कित्येक दिवस मी मात्र मख्खपणानें त्याच्या दात्यांच्या

संख्येंत जाणून बुजून सामील होत नव्हतों. मी मनांत म्हणे, त्या आंधळयाची भाक पांडुरंगाच्या भक्तांना आहे, मी पक्का वंशपरंपरेचा शैव ! मी काय म्हणून त्याला भीक घालावी ? तो दयेला पात्र असला, तरी वैष्णवांच्या कृपेनेंच त्याला जगविलें पाहिजे—इत्यादि.

+ + +

पाऊस मुसळधार लागत होता; तरी मी सिनेमाला गेलों होतोंच. पाऊस नेहमींचाच होता. पण आठवड्याच्या शेवटच्या दिवसापर्यंत सोड-लेला चित्रपट पुनः कांहीं दिसणार नव्हता. म्हणून संध्याकाळीं सुसाट सुरू झालेल्या पावसांतूनच मी सिनेमाचें थिएटर गांठलें होतें.

अडीच, पावणेतीन तास चाललेली चित्रपटाच्या आनंदाची बर-सात एकदांची थाबली, तरी पावसाची सरबत्ती एकसारखी एकाच जोमानें चालली होती. पोटऱ्यांपर्यंत पोहोंचेल इतकें पाणी रस्त्यावरून वहात होतें. खराट्याचें स्वराज्य चालविण्याचीही लायखी नसलेल्या आमच्या लोकांची कर्तबगारी आळीआळींतील घाणीसह पावसाच्या पाण्याच्या रूपानें साऱ्या रस्त्यांनीं तुडुंब वहात चालली होती. त्या गांवगंगेच्या पुरांतूनच माझ्या-सारखे उशीराचे पांथस्थ एकेक पावलानें वाट कापीत होते. बाकी बहुतेक सामसुमच होतें.

खोलीकडे जातांना मला पूल ओलांडणें भागच होतें. पूल ओलांडून त्याच्या उतरणीवर तोल संभाळून चालत असतां, कां कोणास ठाऊक, मला त्या आंधळयाची एकाएकीं आठवण झाली. संध्याकाळपासून धो धो पाऊस लागलेला, कसा तो बापडा आपल्या पोटाची आग शमविण्याचें साधन मिळवूं शकला असेल ? पाण्यानें आग विझत असली, तरी आजच्या पावसानें त्या आंधळयाच्या पोटाची आग भडकविली जाण्याचाच संभव आहे. पडल्या पावसावर संतुष्ट होऊन पुढल्या उभ्या वर्षाची बेगमी होणार या आनंदांत दंग होऊन सारा शेतकरीवर्ग देवाला दुवा देत असेल तरी तो आंधळा रागानें देवाला शिव्या देत असेल. एकूण जगांत सग-ळ्यांनाच सुखी होण्याला जागा नाहीं तर ? एकाच्या सुखासाठीं दुसऱ्याला दुःख पदरांत बांधून घेणें भाग पडतें ना ? असे विचार एकामागून एक

माझ्या मनांत सरासर सरकूं लागले. उतरणीच्या चिखलावर पाय सरकूं नये, म्हणून डोक्यांत सरकणाऱ्या विचारांना मी आवरूं पहात होतों. पण ते कसले मला आवरतात? कधीं न येणारे गंभीर विचार माझ्या डोक्यांत आलेले! पहिल्या दिवाळसणाला आलेल्या पहिल्या जांवयाची बेफिकीर वृत्ती धारण केली होती त्यांनीं!

आज तो आंधळा आपलें दिवसभर ताटकळलेलें शरीर कुठें आडवें करील? नेहमीं तो रस्त्यावर पडत असला, तर दिवसाप्रमाणें आज रात्रींही त्याला दोन पायांवर आपले अवजड शरीर उभेंच ठेवलें पाहिजे! दीन-दुबळ्यांबद्दल काय ही आमची अनास्था! दया, धर्म, मिश्रविवाह आणि पुनर्विवाह हीं नेहमीं दुसऱ्यांनींच करावींत असें प्रत्येकालाच वाटतें, तसेंच आपल्या दीनदुबळ्यांची व्यवस्था लोकांनीं नीट लावावी, असें मला वाटलें तर त्यात आश्चर्य काय? किंवा माझा दोष तरी कोणता?

छे:! तो आंधळा त्या दिवशीं माझा गुरुच झाला म्हणाना? किती आणि कसले विचार त्यानें माझ्या डोक्यांत घुसविले! मॅट्रिकपासून एम्.ए. पर्यंत कांहीं नाहीं तरी दीडदोनशें पुस्तकें अभ्यासावीं लागलीं होतीं. पण त्यापैकीं एकानें किंवा साऱ्या ग्रंथांनी मिळून मला कधीं इतका खोल विचार करायला लावलें नव्हतें. त्या ग्रंथाचा तरी काय दोष? त्यांचा हेतू मला पदवी–पंडित करण्याचा होता. मला विचारवंत करण्यासाठीं कांहीं त्यांची योजना नव्हती.

आंधळा माझा गुरु झाला आणि मी त्याच्या शाळेंतील एक विद्यार्थी बनलों.

तरी, होतां होईल तों ह्या शाळेंत नादारी मिळवावी असेंही पण माझें लबाड मन अस्पष्टपणें मला सुचवीत होतेंच. म्हणजे जर आतां पुन: केव्हां तो आंधळा दिसला तर त्याला पै पैसा द्यावा, असें मनांत येतें न येतें तोंच 'माझ्याच पै पैशांवाचून त्याचें काय अडलें आहे? शेंकडो लोक त्याचे दाते आहेत' असें कांहींसें त्या मनानें मला सुचविलें.

\+ \+ \+

पुलाचा उतार संपवून मी पुढच्या वळणानें आडव्या रस्त्याला लागणार; तों समोरच मला तो आंधळा दिसला. त्याचें वाकलेलें शरीर, तो फाटका लांबलचक, घाणेरडा, खिशांच्या कडाना कळकटून काळा पडलेला खाकी कोट, त्याचें तें घोगऱ्या आवाजाचें खांकरणें, वगैरे खाणाखुणांनीं मला त्याची ओळख तावडतोब पटली. तो रस्त्यावरील दिव्याच्या बरोबर खालीं उभा होता. पाठीवरील कोटाच्या तीन चार मसक्यातून त्याच्या पाठीवर उभे राहिलेले पावसाच्या पाण्याचे थेंब दिव्याच्या प्रकाशांतून चमकत असलेले मला लख्ख दिसले. गार पाण्याचे थेंब आंधळ्याच्या पाठीवर खडे असले, तरी त्यांच्या दर्शनानें माझ्या सर्वांगावर एकदम शहाऱ्याचें रानच्या रान उठलें! भुताच्या कल्पनेप्रमाणे भूतदयाही आपल्या भेटीसरशीं माणसाच्या अंगावर शहारे उठविते, अशी त्या दिवसापासून माझी पक्की समजूत झाली आहे. एकदां वाटलें, आपल्या अंगावरचा धड कोट घालून त्याची उघडी पाठ झाकावी; पण शंका अशी आली कीं, माझ्या भिजून चिंब झालेल्या कोटानें त्या बापड्याची थंडी कमी व्हावयाच्या ऐवजीं, कदाचित अधिक तर वाढावयाची नाहीं? कदाचित् माझ्या चिंब कोटानें त्याच्या लंग्जवर परिणाम होऊन, त्या बिचाऱ्याला न्यूमोनियाही होण्याचा बराच दांडगा संभव आहे! नव्हेच तें; माझा धर्म होईल पण त्या अनाथाचें कर्म उभें राहील, तेव्हां माझा कोट काढून देण्याचा बेत मी रहीत केला. परंतु, मनाची चुटपुट कांहीं थांबेना. तेवढ्यांतच माझें परंपरागत तत्त्वज्ञान माझ्या सहाय्याला आलें म्हणून वेळ निभावली. माझें सांठलेलें, गोठलेलें तत्त्वज्ञान माझ्या आत्म्याला म्हणालें, " बा आत्म्या, तूं कां त्या आंधळ्याच्या आप्तेष्टांपायीं तळमळतोस? जो तो आपल्या पूर्वकर्माचीं फळें भोगत असतो. नाहीं कोणी म्हणावें, पूर्वीच्या जन्मीं तो आधळा आपल्या देशांतील एखादा संस्थानिक असेल, त्यानें आपल्या शेतकरी प्रजेला अशाच पावसांत उपाशी पोटीं शेतारानांत राबविलें असेल आणि त्यांच्या श्रमाच्या संपत्तीवर यानें सारी हयात ऐतखाऊपणानें ऐषआरामांत घालविली असेल, म्हणून या जन्मीं देवानें त्याला अशा स्थितींत ठेवून, भिकेचा कटोरा हातीं दिला असेल. तूं याची उघडी पाठ झाकूं पहाणें, म्हणजे प्रत्यक्ष ईश्वरी न्यायनिवाड्याला विरोध केल्यासारखें होणार आहे. ' कन्टेम्प्ट ऑफ कोर्ट

ऑफ दी ऑलमायटी.' माझ्या सांठीव तत्त्वज्ञानाची शिकवण माझ्या अंतरात्म्याला तंतोतंत पटली, आणि त्याच क्षणीं मनाला लागलेली चुटपुट, विजेचें बटन दाबल्याबरोबर जसा विजेचा प्रवाह थांबतो तशी झटकन् थांबली. अर्थातच, वाचक हो! आंधळयाला कोट देण्याचा माझा विचार पूर्वी जसें शाळेंतील मास्तर मला सहजपणानें वर्गाच्या बाहेर हाकलून देत असत, तशा मजेनें माझ्या मनांतून बाहेर काढून लावला!

मी त्या आंधळ्याच्या बराचसा जवळ आलों. मला एक चमत्कारिक दृश्य दिसलें. आंधळा मला पाठमोरा होता; त्याच्यापुढें छत्री धरून एक झकपक कपडे केलेला मनुष्य उभा असावा असें मला वाटलें. पुढचा माणूस आंधळ्याच्या मानानें बराच टेंगू असावा असेंही अनुमान मला त्व्हांच करतां आलें.

माझी चाहूल लागतांच तो आंधळ्यापुढचा मनुष्य तोंड वळवून झपाट्यानें चालूं लागला. त्याची ती कानाकडे खांदे उभारून व बाहेरच्या बाजूनें फेंगडीं पावलें टाकीत जाण्याची लकब मला ओळखीची वाटली.

चाल ओळखीची; पण माणूस ओळखेना.

नव्या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला आपण जावें; आणि 'तद्दन नव्या चाली म्हणून गर्जलेल्या चाली ऐकण्यासाठीं आपण कान टंवकारलें असतां, पहिलेंच पद पाहिलेल्या नाटकांतील एखाद्या चालीसारखें थेट वाटावें; आपल्याला तें माहितीचें पद आठवूं नये, म्हणजे जशी एकसारखी आपल्याला मळमळ सुटते तशी त्या छत्रीवाल्याची चाल पाहून माझ्या मनाची स्थिति झाली.

मी आंधळ्याजवळ गेलों, तों मला एक चमत्कार दिसला.

जिला बाला म्हणतां येणार नाहीं, किंवा तरुणी म्हणणेंहि रास्त होणार नाहीं अशी एक–काय म्हणूं? मुलगी?–मुलगी त्या आंधळ्याचा हात धरून सावकाश चालली होती.

मी न्याहाळून पाहिलें—माझी इच्छा नव्हती न्याहाळण्याची, पण सरावामुळें डोळे तिकडे वळले. त्यांत माझा काय दोष? कॉलेजमधल्या वांडांनाच सुंदर चेहरे हव्या तितक्या बेदरकारपणें पाहण्याचा हक्क आहे,

आणि शिक्षणाच्या गोष्ठ्यांतील शेवटच्या भिंतीवर डोकें आपटल्यामुळें कॉलेज सोडून एका जपानी दुकानांत कारकुनी करणाऱ्या पोऱ्याला (?) तो हक्क नाहीं, असा सामाजिक कायदा थोडाच आहे ? तरुण आहे तो पाहणारच. सारेच पाहतात. कांहीं ठळठळीतपणें डोळे ताठरून पाहतात; कांहीं कोपऱ्यांत बुबुळें खेंचतात, कांहीं कळेल न कळेल अशी 'अप ॲण्ड डाऊन' डोळ्यांची कवाईत करून आपल्या मनाची खुमखुम जिरवितात. असलाच तर तपशिलांत फरक असतो, तरुण—पण सुंदर हं—स्त्रीकडे पहाण्याचें तत्त्व सर्व तरुणांना आणि वृद्धांना मान्य असतें.

आधळयाच्या बरोबरची तरुणी सुंदर तर खास होती. तिनें पाठीवर शेपटा सोडला नव्हता; तरी मला तें वैगुण्य वाटलें नाहीं. डोक्यावरून पदर घेणें, हीही एक रूढ होऊं पाहणारी फॅशनच आहे कीं नाहीं ? मला तर ती मुलगी 'एक्स्ट्रा स्ट्रॉंग' फॅशनेबल वाटली. पुरती रूढ न झालेली डोक्यावरच्या पदराची फॅशन जारीनें अंमलांत आणलेली होतीच, तशीच मद्राशाच्या धोतराप्रमाणें 'सत्यं त्वरितेन परिसिचामी' या तंत्रानें तिनें आपलें वस्त्र गोल गुंडाळलें होतें. फॅशनेबल फॅशनेबल म्हणजे आणखी तें काय ? प्रथमदर्शनींच मी तिला फॅशनेबल ठरवून टाकली. आता नेसलेलें वस्त्र मळकट आणि फाटकें होतें—चिंता नाहीं, 'वासांसि जीर्णानि यथा विहाय' वगैरे मला पाठ होतेंच. 'मी देईन तिला एकदम चारसहा फॅशनेबल पातळें—विकत घेऊन—नाहीं तर उधारीनें आणून......'

काय मनुष्य जलद विचारावरून वाहात जातो पहा ! तो आंधळा कोणाचा कोण ? त्याची मुलगी ती कोण ? मी याक्षणीं तिला पाहतों काय, आणि पुढच्या क्षणीं तिला फॅशनेबल टरविण्यासाठीं उधारीनें पातळें आणून देण्यास तयार होतों काय ? यांत चमत्कार कांहीं नाहीं. याला प्रथमदृष्टिपातांत झालेलें प्रेमपतन, असें म्हणतात. पुष्कळ कादंबऱ्यांतून आणि बहुतेक लघुकथांतून असतेंच कीं असें घडलेलें.

"कोण होता तो गृहस्थ ?" आंधळयाला उद्देशून पण त्या मुलीकडे पहात मी विचारलें.

माझ्या प्रश्नानें आंधळा चपापला असावा, असा मला भास झाला. मुलीनें माझ्याकडे पाहिलेसें केलें आणि आपली दृष्टि पायांकडे वळविली.

किती रम्य दिसत होती ती ! भिजलेली सुंदर तरुणी, दिव्याच्या प्रकाशांत उभी ! काय असेल तें असो, इंटर क्लासांत परीक्षेसाटीं वाचावें लागलेल्या मृच्छ-कटिक नाटकाची आठवण झाली.

" आंधळेबाबा, कोण होता तो ?–अहो, आतां तुमच्या पुढून गेला तो ? " मी त्या मुलीकडे दृष्टि न वळवितां, जरा रेटकसपणानें प्रश्न केला.

माझ्या प्रश्नाबरोबर त्या मुलीनें पटकन् डोळे वर करून माझ्याकडे पाहिलें. एका क्षणाच्या एकशतांश भागाइतक्या काळापुरत्याच आमच्या नजरा एकमेकांना भिडल्या. पण तेवढ्यांतच मला वाटलें, कीं तिच्या नजरेंत भीति आणि शोधकपणा यांचें मिश्रण झालेलें होतें. खोंकून, घसा साफ करून, जरा चिडकेपणानेंच तो आंधळा म्हणाला, " असेल कुणी चोरटा ? आम्हाला काय विचारतां दादा त्याच ? "

" तुमच्याजवळ बराच वेळ बोलत असलेला दिसला. मला वाटलं तुमच्या ओळखीचा असावा कुणी. पाठमोरा पाहिला, त्याचं चालणंबिलणं माझ्या ओळखीच्या माणसासारखं वाटलं, म्हणून विचारतों आंधळे बाबा...रागावूं नका. " मी समजुतीच्या स्वरानें म्हणालों.

" आम्ही गरीबांनीं कशाला तुमच्या सारख्यांच्यावर रागवावं, महाराज ? तुम्ही आमचे दाते. आज ना उद्यां केव्हां तरी मला गरीबाला पैसा द्यालच. आजवर नाहीं दिला म्हणून काय झालं !—चल चंद्रे, धरमशाळेंतच आज पडलं पाहिजे. "

"आजवर दिलं नाहीं म्हणून काय झालं !" हे त्या आंधळ्याचें वाक्य माझ्या मनाला झोंबलें. रोज एकदां तरी मी त्याच्या अंगावरून जातों; पण त्या वाटक्यात कधीं कांहीं टाकीत नाहीं, हें त्या 'अडोळशा'लाही पक्कें कळलें हें पाहून मी सर्दच झालों.

दहा पंधरा पावलें पुढें गेलेल्या आंधळ्याला मी हटकलें, " ए आंधळ्या ! " आंधळा थांबला, मी त्याच्या कटोऱ्यांत एकदम मधल्या सुट्टी-तील आठ सिंगल्स्ची किंमत टाकली.

" काय हाय ग चंद्र ? " आंधळ्यानें मुलीला विचारलें.

" पावली हाय बाबा " चंद्रीनें सांगितलें.

हाय ! " आहे " च्या ऐवजीं " हाय ? " सुशिक्षित बायकोचा नवरा म्हणून समाजांत मिरवायचं या माझ्या गुप्त पण धगधगीत महत्त्वाकांक्षेला आंतल्याआंत जोराचा मुका धक्का बसला. चंद्री एकदांच "हाय" म्हणाली, पण तिनें मला मनांतल्या मनात दोनदां तीन उद्गारचिन्हांसह हाय हाय ! ! म्हणावयाला लावलें.

" पावली ! हाय रे भगवाना ! महाराज, " आंधळा मला उद्देशून म्हणाला, " मी पंधरा पैसे तुमास्नी कुठलं परत देऊं ? आजच्या पावसा मुळं एक पैबी मला मिळाली नाहीं बगा ! "

" छे, छे ! मला पंधरा पैसे परत नकोत आंधळेबाबा. मी तुम्हांला चार आणेच दिले आहेत. "

माझ्या देणगीच्या घोषणेबरोबर चंद्रीनें अशा कांहीं खोचक पण कृतज्ञतेच्या दृष्टीनें मजकडे पाहिलें कीं, मी, माझी मनीबॅग, तिच्यांत पैसे टाकणारी नोकरी, पदवी, मुंबई युनिव्हर्सिटी हीं सारीं या जगात धन्य, त्रिवार धन्य आहेत असें मला वाटलें.

" विठ्ठला, पाडुरंगा, सुखी राखरे बाबा या दात्याला ! याचं घर सोन्या चांदीनं भरूं दे; पोराबाळाच्या रत्नांनीं भरूं दे," आंधळा बडबडला.

पोराबाळांनीं माझं घर भरण्याचा आशिर्वाद खरा करणें, कदाचित् या आंधळयाच्या मर्जीवरच परमेश्वरानें अवलंबून ठेवलें नसेल ना ? अशी शंका माझ्या मनांत आली आणि चंद्रीकडे पाहण्याचें टाळणें मला अशक्य झालें.

" तें राहूं दे; पण का हो आंधळेबाबा, तुम्ही मला ओळखतां ?"

" नाहीं बाबा." आंधळयानें मला एकदम उत्तर दिलें.

" मग आजवर दिलं नाहीं म्हणून काय झालं, असं तुम्ही कसं म्हणालांत ? " मी त्याला दाबून विचारलें.

" हां तसं ओळखतों कीं ! " आंधळा हंसत असावा असें वाटलें.

" मी देत नाहीं-कधीं दिलं नाहीं हें कस तुम्हांला कळलं ? "

" तुमच्या पावलांच्या आवाजानं कळलं. रोज माझ्या पुढून रस्त्यानं कितीतरी माणसं जातात. त्या सगळ्यांचीं पावलं मी जाणतों. रोज

माझ्या पुढून जातां पण मला कायबी देत नाहीं, म्हणून तर तुमचीं पावलं मला पाठ हाईत म्हनाना !"

"अस ?" आश्चर्यानें गांगरून गेल्यामुळें मला याहून अधिक म्हणवेनाच. "पण काय हो आंधळेबाबा, हें तुम्हांला कम कळतं ?"

"देवाची देणगी. माझी त्येनं बाराव्या वर्षी नजर नेली, अन् दुसऱ्या गोष्टी दिल्या, त्येच्यातच चालीवरनं माणूस पारखायची इद्या दिली—चल चंद्रे—पांडुरंगा, कृपा कर रे बाबा दात्यावर."

आधळ्याबरोबर मीही दुरून पण चंद्रीच्या बाजूनेंच चालू लागलों.

डोळ्यावाचून 'पाहण्या'ची, जाणण्याची शक्ति देवानें आंधळ्यांना दिलेली असते. मला नवीनच गोष्ट कळली. आंधळ्याच्या शाळेंतील धडा नंबर—इतक्या गोष्टी मी त्या दिवशीं शिकलों कीं या धड्याचा अनुक्रम लक्षांत रहाणेंच शक्य नाहीं.

"ही चंद्री तुमची कोण ?" शंभर एक पावलें चालून गेल्यावर मी मध्येंच त्या आंधळ्याला विचारलें.

आंधळ्यानें उत्तर देण्याच्या आधीं घशांतल्या घशांत 'च्याय्' असें काहीं तरी म्हटलें असावेंसें मला वाटलें.

"ही माझी लेकीची लेक हाय दादा, आई बा बाळपनींच ग्येले. लहानपनापून संगटच हाय बगा."

"लग्न केलं आहे कीं नाहीं ?"

"कुठलं ओ ! कसं होनार तिचं लगीन ! मी तर असा भिकारदास ! अन् नकोबी आमास्नी लगन; आमच्यासारक्याला पैका कुठला मिळायला ? माझ्या आंधळ्याची कांठी मजजवळ असू दे."

लग्नाच्या बाता चालल्या असतां चंद्रीनें माझ्याकडे तीन चारदां तरी पाहिलें असावेंसें वाटलें—कारण अंधारांत मला तसें स्पष्ट कांहीं दिसलें नाहीं. मी वरचेवर तिच्याकडे पहात होतों. माझी नजर तिच्याकडे वळतांच ती खुदकन् हसून, डोक्यावरचा पदर सावरून, हळूच 'इस्स् ग बया' असें म्हणून सणसणीत मुरका मारीत असावी, असा संशय येण्यास मात्र मला बराच आधार मिळत होता वेळोवेळीं.

दुसऱ्या दिवसापासून नित्य नियमानें मी त्या आंधळयाच्या वाटे-ग्यांत जातायेतां एक एक पैसा टाकण्याचा परिपाठ पाडला. आजारी म्हणून ह्पिसांत चिठी पाठविली तरी आंधळयाला दोन पैसे देण्यासाठीं मी पुलावरून जावयाचाच. तीच चंद्री त्याच्या आसपास असली, तर दोन पैशांच्या ऐवजीं दोन आणे मिळत असत त्या आंधळयाला.

हां ! मी मात्र त्या आंधळयाला सक्त ताकीद दिली होती कीं त्यानें विठोबाच्या नांवानें मला आशिर्वाद देतां कामा नये, ' कैलासनाथा, दात्याचं कल्याण वगैरे वगैरे, ' असें त्यानें म्हटलें पाहिजे.

आंधळयानें माझी ताकीद तीन महिन्यांत एकदांही तोडली नाहीं.

त्या तीन महिन्यांत माझा पगार दोन तीन रुपयांनीं कमी झाला होता, असेंच मी समजत होतों.

[२]

काय तें माझें जीवन ! जगण्यासाठीं—केवळ जीव कुडीच्या ताब्यात ठेवण्यासाठीं, तिला मुशाहिरा म्हणून अन्न आणि वस्त्र देण्यासाठीं कोण ती सकाळपासून संध्याकाळपर्यंत धडपड ! सकाळीं बिछाना सोडला आणि रात्रीच्या विश्रांतीचा भरपूर आनंद मिळाला आहे, असें कधींच झालें नव्हतें. मी पोटाचा गुलाम झाल्यापासून सहा वाजता उठा, पांच वाजतां झोपेला सोडचिठ्ठी द्या, ' चला आटपलं पाहिजे लौकर. साडेनऊ वाजतां ऑफीसांत हजर झालं पाहिजे ' ही हुरहुर कांहीं मनांतून जात नसे. रविवारीं तरी ती दगदग सुट्टी घेईल म्हणावं तर ' आहे आजच्या दिवस मोकळीक, पण उद्यांपासून आहेच घड्याळाकडे पाहून वागावयाचें—घड्याळासारखें जगायचें ! ' या विचारानं सारा दिवस रुखरुख लागलेली असायची ! सुखाच्या एका दिवसापेक्षा दुःखाचे सहा दिवस मला उलटपक्षीं बरे वाटत. कारण, त्या सहा दिवसांत ' सुखाचा रविवार येणार ' या आशेचें सुख मला किती तरी भोगावयाला मिळत असे. आणि त्याच्या उलट ' उद्यांपासून दुःखाला आरंभ होणार ' या विचारानें सुट्टीचें सुख नासल्या दुधाप्रमाणें चोथा पाणी होऊन जाई.

" मला पुष्कळदां वाटे, नोकरी सोडून द्यावी. निदान मोठी रजा घेऊन तरी दूरदूर कुठं तरी जावें. पण नोकरी सोडावी, तर परीक्षा पास होतांच पन्नासाचा कमावता कर्तबगार (!) म्हणून वर्षानुवर्षं बेकार राहिलेल्या माझ्या मित्रांचें अभिनंदन व्यर्थ होणार आणि मीही त्यांच्याच पंगतीला बसणार अशी भीति वाटे—रजा घ्यावी, तर हंगामी पडलो मी, मॅनेजर म्हणणार, 'एव्हढी रजा पाहिजे, तर कायमचीच रजा घे'! म्हणजे काय, पोटाच्या बिगारींतून माझी सुटका होण्याची आशा कांहीं कुठं दिसेना.

महिनाभर नाहीं, तरी कमींत कमी पंधरा दिवस आमच्या मॅनेजरच्या पर्सनल क्लार्कला मधल्या सुटींत पावलोणी खायला घातलेच मी. लोण्याचा उपयोग झाल्याशिवाय राहिला नाहीं. ह्या क्लार्कचे काळीज पावावरच्या लोण्यानें मऊ पडलें आणि 'दिवाळीच्या चार दिवसाच्या सुट्टीला जोडून आठ दिवसांची रजा तुम्हांला खात्रीनें देववितो,' असें त्यानें बऱ्याच प्रसगीं टिचून सांगितलें.

बारा दिवसाची रजा माझ्या ताईच्या सासरीं काढावयाचा मी निश्चयही करून टाकला. ताईला मात्र कळविलें नाहीं. कारणें तीनः—(१) मला रजा मिळेलच अशी साडेपंधरा आणे खात्री असली तरी पुऱ्या सोळा आण्याच्या भरवंशानें आधीं बेताबातांचा जमाखर्च करणें धाडसाचें होतें. (२) ताईला आणि तिच्या नवऱ्याला एकदम हजर होऊन चकित करून सोडण्याची हौस वाटत होती. (३) मी येणार अशी जाहिरात केली, तर ताईला धास्ती, आणि तिच्या नवऱ्याला भीति वाटणार होती, हे मला ठाऊक होतें. एका शिप्याच्या हाताखालीं दुय्यम म्हणून काम करणारा माझा मेहुणा कसाबसा तीस–एकतीस दिवसांच्या श्रमानंतर ८–१० रुपयांचा धनी होत असे. त्यातच माझें तिसरें तोंड पडलें, तर साऱ्यांचीच अर्ध्या पोटाची उपासमार होणार होती, हें उघड असल्यानें तें बिचारें दांपत्य आधींपासून चिंतेनें करपूं लागेल, याची मला कल्पना होतीच. तरीपण मी मनांत ठरवून टाकलें होतें कीं यदाची दिवाळी ताईकडे चोपायची. मी स्वतःला विचारीत असे 'मला ताईकडे जायला का दिक्कत वाटावी? आतांपर्यंत वेळोवेळीं मिळून मी ताईला शंभर एक रुपये पाठविले आहेत. भाऊबिजेला आणखी वाटेल तर दहा रुपये देईन; मग त्यांनी मला

दहा बारा दिवस दोन्ही वेळां पोटभर जेवायला कां घालूं नये ? 'अवश्य घातले पाहिजे' असें माझें मलाच उत्तर मिळे. गरीबी आणि तिची कन्या टंचाई, या दोन मोठ्या तरबेज मास्तरणी आहेत! त्यांच्या ताब्यांत गेलेल्या माणसाला त्या पक्का गणक, आणि हुशार हिशेबी बनवितात. त्यांच्या हिशेबांत फक्त खुद्दांचें खातें असतें. दुसऱ्यांच्या—मग त्यांचा रक्ताचा संबंध असला तरी—नावें पडलेल्या रकमांत पैची चूक व्हायची नाहीं ती !

दिवाळी एकच महिन्याच्या टप्यावर आली होती. दिवस काय, घटका, पळें मोजीत होतों मी. रजेचा अर्ज आधीं आठ दिवस द्यायचा, आणि "पर्सनल क्लार्क" या पदवीच्या माझ्या पर्सनल मित्रानें आपलें पर्सनल काम म्हणून रजा मिळवून द्यायची, असा अगदीं कडेकोट बंदोबस्ताचा कट तयार होऊन राहिला होता या सुमाराला. साहेबाच्या सेंटिमेण्टला–भावनेला–धक्के बसतील असा अर्ज तयार करण्याच्या तयारीसाठीं, एकोणिसाव्या शतकांतील नामांकित इंग्रजी कवींची सारीं सुनीतें–मला परीक्षांसाठीं वाचावीं लागलीं होतीं तीं—रोज सकाळीं एक दोन याप्रमाणें मी सात आठदा वाचून संपवून टाकलीं होतीं. मी मराठी कवींचा आधार घ्यावा असें वाटल्यावरून, ताज्या ताज्या कवींचीं एक दोन चोपडीं मागून आणलीं, माझ्या साहित्यिक म्हणविणाऱ्या मित्रांकडून. पण पहिल्या पारायणांतच माझी खात्री झाली, कीं मराठी कवींच्या पद्धतीनें मी भावनाचें घुसळण माझ्या अर्जांत सुरू केलें, तर साहेबांच्या भावना विरघळण्याऐवजीं बेफाम भडकतील, आणि थोडी रजा मिळावयाच्या ऐवजीं मला कायमचीच रजा मिळावयाची ! म्हणून वैदिक लग्नानें घरीं आणलेल्या दुसऱ्याच्या मुलीप्रमाणें दुसऱ्याचीं आणलेलीं पुस्तकें, आजन्म जवळ बाळगण्याचा माझा नेहमींचा निर्धार विसरून जाऊन, एखाद्या नवमतवाद्यानें संध्याकाळीं सिनेमाला नेलेली मैत्रिण तिच्या बापाच्या घरीं सोडून पुढें चालूं लागावें त्याप्रमाणें मराठी कवितांचे संग्रह (!) ज्यांचे त्यांना परत करून शांत चित्तानें खोलीकडे परत आलों.

अर्जाचा मसुदा तयार करण्यासाठीं, पैशाला चार या भावानें दोन आणे दहा पैशांचे कागद खराब करूं लागलों.

[ ३ ]

पुढच्या आठवड्यांत अर्ज गुदरावयाचा या आनंदांत मी होतों. ' पुढच्या आठवड्यांत लग्न, नंतर एकदोन दिवसांत आपली पत्नि माहेरीं जाईल, ती माहेरीं पोहोंचून एक दोन दिवसाची जुनी होते, न होते, तों आपलें पहिलें प्रेमपत्र तिच्या हातीं पडेल, ' इत्यादि प्रकारचें मनोराज्य लग्नाच्या आढीला लावलेला नवरदेव ज्या उत्सुकतेच्या तळमळीनें करीत असेल, त्याच तळमळीनें मी अर्जाच्या पाठवणीचा विचार करण्यात तल्लीन झालो होतों.

परंतु, ठरलेली नवरी एकाएकीं पटकीनें जगावेगळी व्हावी, म्हणजे त्या गाभुळलेल्या नवरदेवाची जी अवस्था होईल, तशीच, कल्पना नसतांना आकाशीची कुऱ्हाड माझ्यामाथीं कोसळल्यामुळें माझी दुर्दशा झाली.

म्हणजे, आमच्या हपिसचा मॅनेजरसाहेब एका उचकीसरशीं चचला आणि त्याचे चरणीं सादर होणाऱ्या माझे अर्जाचे मनोरे पायातच गडप झाले, अशी समजूत कोणी करून घेऊं नये. साहेब चांगला सॅंडोसारखा धटिंगण होता, त्याला काय धाड होणार होती !

माझ्या जिव्हारीं माझ्या मेहुण्यानींच—दिनकररावांनीं—निराशेचा वार केला होता. ते म्हणे कोणा मित्राला चोरीच्या प्रकरणांत जामीन राहिले होते आणि तो सच्चा दोस्त शंभर रुपयांची रोख जामिनगत पटतांच एका रात्रींत फरारी झाला होता. रोख भरण्यासाटीं तयार केलेले शभर रुपये दिनकररावांनीं दुहोत्राच्या दरानें एका मारवाड्याकडून काढले होते. त्या मारवाड्यानें घायकुतीला येऊन कोर्टाकडून दिनकररावांच्या सुदामी संसारावर जप्ती आणण्याचा चंग बांधला होता. आरोपी फरारी झाल्यानें अंगावरची दीडशे रुपयांची जामिनकी ताबडतोब भरण्याची सरकारी तसदी त्यांतच दिनकररावांच्या मानेवर धार धरून राहिली होती. घरांत स्वस्थता असेल म्हणावें, तर माझी ताई, जगाची गम्मत पहायला उतावीळ झाल्यानें चार महिने आधीं मरुन जन्माला येणाऱ्या एका वीरभद्राची माता झाली होती. पुत्र-शोकाच्या जबरदस्त धक्क्यानें ती इतकी हदरली, कीं आठ पंधरा दिवसांच्या आंत तिला परक्या ठिकाणीं नेऊन, चांगले चार सहा महिने औषधपाणी केलें

नाहीं, तर ती पुत्रदर्शनासाठीं परलोकीं गमन करावयास मागेंपुढें पहावयाची नाहीं, अशी डॉक्टरनें दिनकररावांना भीति घातली होती. अगदीं कोकणी स्वस्ताईचा थारेपालट करावयाचा म्हटलें तरी दोनशें एक रुपयांचा खर्च येणार होता. सारांश, हवें ते करून एक, दोन, फार तर तीन दिवसाच्या आंत मी पांचशे रुपयांची रवानगी केलीच पाहिजे, अशी दिनकररावांनीं मला आपल्या पत्रात मेहुण्याच्या चढेलपणानं सूचना दिली होती. कुठली दिवाळी, कुठली माझी रजा आणि कशाचा माझा रजेचा अर्ज! दिवसभराच्या वाट-चालीनंतर आरामासाटीं आपण वळकटी पसरण्याच्या विचाराला लागावें, तर आपण उतरलेल्या घराला एकदम चोहोंकडून आग लागावी, तशी माझी स्थिति झाली.

कोण हा संकटांचा वर्षाव दिनकररावांवर! असल्या संकटांची पुढें आपल्यावर बरसात कोसळणार आहे, असें आधीं समजेल, तर एकाद्या रजपूत कादंबरींतील धीरोदात्त नायकसुद्धां आपल्याला पहिल्या प्रकरणांत मारून टाका म्हणून कादंबरीकाराला गळ घालावयाचा!

तें पत्र वाचून आधीं मला दिनकररावांच्या बापाचा आणि मग त्यांचा स्वतःचा मनस्वी संताप आला. 'जामीन कोणा होऊं नये' ही ओळ, दिनकररावांच्या बापानें आपल्या घराच्या साऱ्या तुळयावर खडूनें खात्रीनें लिहलेली नसली पाहिजे. दिनकररावांच्या कोवळ्या मनावर जामीनकीचें दुष्परिणाम त्यांनीं अप्रत्यक्षपणें उमटविले असते, तर त्यांनीं माझ्या गळ्याला अडीचशेच्या जामिनकीच्या रोखीचा फांसा खात्रीनें लावला नसता या विचारानें मला दिनकररावांच्या बापाचा राग आला होता. दिनकररावांचा संताप येण्याचे कारण म्हणजे त्यांनीं गीतेच्या शिकवणीची शुद्ध पायमल्ली केली होती. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' हें वचन लक्षांत घेऊन, फलाची आशा न धरितां नेटका प्रपंच करणें, त्यांचें कर्तव्य होतें. धर्माची हेळसांड करून दिनकरराव दुर्योधनाप्रमाणें आपल्या-सह स्वकीयांचा नाश करायला उठले होते.

असल्या उद्वेगी विचारांचा वाफारा विसकटून गेल्यावर मला वाटलें, खरोखरीच का एखाद्या माणसावर एकदम इतकीं संकटें येणें शक्य आहे?

नशिबाचा खेळ झाला, तरी त्याला कांहीं तरी सीमा आहे कीं नाहीं? परंतु, लवकरच दिनकररावांच्या संकटाच्या सत्यतेबद्दल शंका घेतल्याचा मला पश्चाताप वाटूं लागला. दुर्दैवाचे तडाखे खावे लागल्यानें, कळवळणाऱ्याला ढोंगी म्हणण्याइतका जगांत मोठा दुसरा दुष्टावा नाहीं असें मला वाटूं लागलें.

त्या दिवशीं मी हपिसात रजेची चिठ्ठी पाठवून दिली.

आंधळ्याला पैसे द्यायचें भानच राहिलें नाहीं.

दिनकररावांची मागणी पुरी करणें मला शक्यच नव्हतें. माझा पगार तो काय, माझा खर्च तो किती, आणि त्यांतून पांचशेची रक्कम शिल्लक राहणार तरी कशी? आपलें वैगुण्य दिसूं न देतां,—कारण वेळोवेळीं माझ्याकडून लहान सहान रक्कमा उचलूनही मी उधळ्या आहे, असा दिनकररावाचा माझ्यावर सततचा आरोप होता—दिनकररावांची समजूत कशी काढावी या विचारांतच मी तो दिवस माझ्या खाटेवर पडून काढला.

दुसरा दिवस तसाच कसाबसा गेला. ऑफिसांत गेलों, काम केलें, पण साध्यासुध्या कामांत इतक्या चुका झाल्या कीं, 'अंगांत ताप फणफणून डोकें गरम झालं असतांना कशाला ऑफिसांत आलास? कालच्यासारखी आज—आणखी ८ दिवस—नाहींतर कायम रजा घ्यायची होतीस!' असें मॅनेजरसाहेब मला म्हणाले. मला वाटलें, 'किती दयाळू माणूस आहे हा!' परंतु, कायम रजेची सूचना कांहीं एकंदरीनें बरी नव्हती. तिनेंच मला हीव भरणार कीं काय, अशी भीति दाखविली. कायम रजा आणि मलेरिया हीं सख्खीं भावंडें! एकदा एखाद्याला चिकटलीं कीं सुटत म्हणून नाहींत.

साहेब म्हणाला आठ दिवसांची रजा घे. रजा, रजा, आतां कशाला रजा!

माझा मित्र जो पर्सनल क्लार्क, त्यानें तर माझ्या डोक्याला हात लावून पाहिला. कुठें गोळ्याबिळ्याची भावना झाली आहे कीं काय, याचा अंदाज घेण्यासाठीं त्यानें माझ्या खाका बगला चांचपून पाहिल्या. कर नाहीं त्याला डर कशाची? मी पर्सनल क्लार्कपुढें खाका वर करून

खुशाल उभा राहिलों. मी प्लेगानें किंवा दुसऱ्या कसल्याही ग्रंथिक रोगानें पछाडलेला नाहीं, अशी खात्री झाल्यावर अंदाज चुकला म्हणून हिरमुसले-पणानें पर्सनल क्लार्क साहेबानें हजेरी घेतल्यासारखा चेहरा करून, आपल्या जागेवर निघून गेला.

तिसरा दिवस उजाडला, दिनकररावांचें दुसरें पत्र आलें. मला उभ्या जगांत जवळच्या नात्याची काय ती एकुलती एक बहीण. तिच्या मांडल्या संसारावर बेलिफची सावली पडली असता तिच्या मंगलसूत्राचा धनी उरली जामिनकी भरण्याच्या नालायखीपायीं तुरुंगाच्या उंबरठ्यावर दीड दोन पावलें टाकून उभा असतां, स्वतः ती माझी एकुलती एक बहीण पुत्र-शोकाच्या धूमधडाक्यानें स्वर्गाचे भाडेंतोडे विचारीत असतां, मी यःकश्चित पांचशे रुपयासांठीं जीव घालमील करीत रहावें, यासारखा अमानुषपणा नाहीं. अशा प्रवचनानें दिनकररावांचें पत्र खच्चून भरलें होतें.

तें पत्र वाचून, मी स्वगत भाषण करायलासुद्धां मागें पुढें पाहिलें नाहीं. कुलीन स्त्रियानीं रंगभूमीवर काम करणें हेंच रास्त, या तत्त्वाला सक्रिय सहानुभूति दाखविण्यासाठीं 'आंधळ्याची शाळा' हें नाटक कमींत कमी डझनवेळा तरी पाहिलें होतें. त्यामुळें, स्वगत भाषणांचा विसंगतपणा जरी माझ्या मेंदूवर पुरता कोरला गेला होता, तरी दिनकररावांच्या पत्रानें माझ्या मनाची अशी घुसळण केली होती कीं, स्वगत भाषणाची उकळी दाबणें त्यावेळीं मला शक्य नव्हतें. मी मोठ्यानें म्हणालों, 'बाब्या, चांडाळा ! कशाला जन्माला आलास ? त्याऐवजीं तुझ्या ताईच्या एकुलत्या एका पहिल्यावहिल्या राजेश्री चिरंजीवाप्रमाणें उपजतांच कां नाहीं मेलास ?–'

स्वगत भाषणाच्या रंगांत मला सुचले, माझ्या ऐवजीं, ताई उप-जतांच गचकती, तरी, तरीही तसा निर्वाणीचा प्रसंग ओढवताना !

खरेंच, ताई जशी माझी एकुलती एक बहीण, तसा मी नाहीं का तिचा एकुलता एक भाऊ ? मीच का जेव्हां तेव्हां तिच्यासाठीं एकुलते एकपणाचा विचार करावा ? तिनें का माझ्या एकाकीपणाचा विचार करूं नये ?

या प्रश्नांची कांहीही उत्तरें मिळालीं, तरी एकदम पांचशें रुपयांची रक्कम कशी उभारावयाची? भाषण पाठ करून ओरडून दाखविण्याचा धंदा करणाऱ्या नाटकवाल्यांना सुद्धां मोठ्या रकमांचें एकदम दर्शन होत नाहीं, तर खर्डेघाशा कारकुनाच्या स्वगत भाषणानें कसे पैसे हातीं लागणार?

काय करावें, कसें करावें, दिनकररावांना पांचशें रुपये देणें माझें कर्तव्य आहे कीं नाहीं, याचा विचार करण्यांत तिसरा दिवस आला तसा गेला. ऑफिसांत माझ्या हातून चुका होतच होत्या.

त्या तीन दिवसात दोन दिवस त्याच्या अंगावरून जाऊनही मी आंधळयाला एक पैसाही दिला नाही. असे आंधळ्या पांगळयाना पैसे देण्यांत उधळपट्टी करीत गेलों, म्हणून आज मी माझ्या एकुलत्या एक ताईच्या मागणीची पुरवणी करायला असमर्थ ठरलों–असें मला वाटूं लागलें होतें.

तिसरे दिवशीं रात्रीं खानावळींतून जेवून मी खोलीकडे परत जात असतां पुलाच्या उतरणीवरच्या बोळाच्या तोंडाला पुनः तो खादे वर करून फेंगड्या पावलांनीं चालणारा गृहस्थ दिसला. पाऊस नसतांना त्यानें डोक्यावर छत्री धरली होती. तोंड लपविण्याचा हेतू असावेसें मला वाटलें. तो कोणाची तरी वाट पहात असावासें दिसलें. तेव्हढ्यातच चंद्रीच्या हाताला धरून तो आंधळा पुढें झाला, आणि छत्रीवाल्याला आड करून उभा राहीला. 'काहीं तरी खास भानगड आहे' असा मनाचा जोराचा हुंकार मिळाल्यानें मी त्यांच्या बाजूला वळलों.

माझी चाहूल लागतांच छत्रीवाला पूर्वीप्रमाणेंच तोंड वळवून–चुकवून पुढें सटकला.

पुनः मला वाटलें, छत्रीवाल्याची चाल माझ्या ओळखीची आहे. अगदीं डोळ्यासमोर आहेसें वाटलें, त्या चालीचा धनी! तोंडावरचा शब्द सुचत नाहीं, तसेंच ओळखीच्या माणसाचें नांव आयत्यावेळीं आठवत नाहीं–पुष्कळदा होतें नाहीं असें?

\+ + +

" कोण होता तो?" मी चंद्रीलाच विचारलें. ती घोटाळली.

" आमासी काय पुसतां दादा?" आंधळ्यानें मध्येंच तोंड घातलें.

" मागेंही असाच तुमच्याशीं बोलत उभा होता तो. तो तुमच्या ओळखीचा आहे खास!" मी जरा दटावणीनें म्हटलें.

" उगीच दमदाटी कशाला करतां रावसाहेब?" आंधळाही ठांसून म्हणाला, " तुमच्यावानी तो एक दाता आहे; कधींमधीं दान करतो मला तो!"

पुढें काय बोलावें तें मला सुचेना.

" आज दोन तीन दिवस महाराज तुमी बी आमां गरीबावर माया पातळ केलीया; अगावरनं जातां पन काय बी देत न्हाई."

काय सांगणार मी त्या आंधळ्याला कपाळ! एकदां वाटलें, कुणाजवळ तरी मन मोकळें करून टाकावेंसें वाटलें होतें, तें त्या आंधळ्याजवळच ओकून टाकावें; षट्कर्णी व्हायची भीति नव्हती. दुसऱ्या क्षणीं वाटलें, आंधळ्याऐवजीं चंद्रीजवळच आपल्या हृदयाच्या कपाटाची किल्ली द्यावी. तिसऱ्या क्षणीं तिसराच विचार मनांत आला आणि कोणालाच न सांगतां मी गप्प उभा राहिलों.

' आंधळ्याचा दाता ' असें म्हणून आंधळ्याचा हात धरून चंद्रीनें कळकट कटोरा पुढें केला. मी खिशात हात घातला आणि प्रचंड आनंदानें सबंध अधेलीच्या अधेली त्या कटोऱ्यांत टाकली. अधेली म्हणजे पैशाची नव्हे रुपयाची.

आंधळ्यानें आणि चंद्रीनें माझ्यावर आशिर्वादाची, देवाच्या दरबारांत चालणाऱ्या शिफारसीची अगम्य अशी खैरात केली.

आंधळ्यापांगळ्यांना दिडकीही द्यावयाची नाहीं, असा माझा निश्चय मी होऊन मोडला, म्हणून खंती वाटण्याऐवजीं मला त्या दानानें प्रचंड आनंद झाला—कारण ती अधेली कमीत कमीं एकूण पन्नास दुकानदारांनीं ' नही चलेगी, दुसरी लाव ', असें म्हणून, साशक नजरेनें माझ्याकडे पहात पहात मला परत केली होती. त्याच अधेलीनें मला

चंद्रीचा संतोष आणि आंधळ्याचे असंख्य आशीर्वाद मिळवून दिले होते. पदरीं पडलेलें खोटें नाणें खपल्याचा चोरटा आनंद कसा असतो तें मी सांगायला हवें असें नाहीं. प्रत्येकाला केव्हांना केव्हा त्या आनंदाचा अनुभव आलेला असतोच.

चौथे दिवशीं दिनकररावांची अर्जंट तार आली पैसे पाठवून देण्याबद्दल. पैसे आले नाहींत तर पुनः कांहीं त्यांची अगर ताईची या जन्मांत गांठ पडणें शक्य नाहीं, अशी ती त्या तारेंत उघड उघड धमकी होती.

ब्रह्महत्या, भगिनीघात, या उभय पातकांचा जोडराक्षस उरली हयात माझी पाठ पुरविणार होता.

ती हयातच तडकाफडकीनें संपविली तर ? असेंही एकदां माझ्या मनांत आलें.

पण एकाच्या मूर्खपणासाठीं दुसऱ्यानें कां आपल्या जिवाला मुकावें ? दिनकररावांना मूर्खपणा करायला आयुष्यांत भरपूर अवकाश मिळाला होता. त्यांनीं आपल्या आयुष्याच्या आगगाडीचे रूळ मधेंच तोडले तरी मुळींच दिक्कत बाळगण्याचें कारण नाहीं. मला अजून आयुष्यांतील सर्वांत मोठा मूर्खपणा म्हणजे शुभमंगल विवाह करावयाचा होता. तें कांहीं नाहीं, ज्याचा त्याला वांटा मिळालाच पाहिजे. अशा उत्तरानें मी आत्महत्येचा आतताई विचार दूर सारला.

दिनकरराव असोत, कीं मी असो, पण आमच्यापायीं माझ्या ताईनें कां आपले प्राण गमवावेत ? या माझ्या अंतरींच्या प्रश्नाला मात्र उत्तर सांपडेना.

जीव देण्याऐवजीं गहाण टाकून, दिनकररावांना पांचशे रुपये पाठवून, माझ्या ताईच्या प्राणावरचा धोका टाळलाच पाहिजे असें माझ्या मनानें ठाम घेतलें.

मनानें खूप धरलें धोरणांत, तरी आचरणांत यायचे कसें ?

काढूं का कर्ज ? पण मला कर्ज तरी कोण देणार ?

काय करावें तें मला सुचेना.

चितेनें माझ्या मुद्रेवर सफेता फिरविल्यानें मी चार दिवसांतच चार महिन्याच्या आजारांतून उठल्यासारखा दिसूं लागलों.

+ + +

पांचवे दिवशीं पहांटे दिनकरराव आपल्या चार दोस्तांसह माझ्या दारांत येऊन उभे राहिले. चौघे खांदा द्यायला आणि दिनकरराव माझी व्यवस्था लावायला आले आहेत, असें वाटून मी त्या पंचकडीच्या दर्शनानें प्रेतासारखा पांढरा फटक पडलों.

वास्तविक पाहतां, दिनकररावांच्या तोंडावर प्रेतकळा असायला हवी होती. पण ते तर तावड्या गाभ्याच्या पेरुसारखे रसरसलेले दिसत होते. त्याचे सगे मात्र वर्षानुवर्षं खाणावळीच्या अन्नावर पोसल्यासारखे सुकलेले, गालबसके दिसत होते. काय हवे तें करून वाटेल तर हपीसांतील रक्कम मालकाच्या परवानगीशिवाय आपलीशी करून, पांचशे रुपयांची तरतूद करण्याची जेव्हां दिनकररावांनीं मला एकांतांत गळ घातली, तेव्हं काय तो त्यांच्या चेहऱ्यावर ओढला ताणला बापुडवाणेपणा दिसत होता.

असे पंधरा दिवस गेले.

ती पंचकडी खुशाल दोन्ही वेळां माझे पाहुणे म्हणून खाणावळींत चाव्या मारीत असे. मला थाग पत्ता लागूं न देतां, शेजारच्या फराळाच्या दुकानांतून सकाळ, दुपार, संध्याकाळ मिळून रोज अडीच तीन रुपयांचें फराळाचें माझ्या नावावर उधार आणून चापीत. फराळवाल्यानें जेव्हां ४७८८ ची बाकी मागितली तेव्हां कुठें मला पंधरा दिवसांच्या पाहुणे–दिवाळीचा पत्ता लागला. साडे सदतीस रुपये खाणावळीचे झाले होते. एकूण जवळ जवळ दोन महिन्यांच्या पगाराचा ह्या गुलामांनीं फन्ना पाडला होता.

काय तुम्हांला होतें आहे आतांशा, सांगा तरी बाबूराव! असें मोठ्या जिव्हाळ्याच्या कळकळीनें माझे मित्र पर्सनल क्लार्क यांनीं मला विचारिलें. मला त्यांची कळकळ खऱ्या भावाची वाटली, कारण माझ्या पुढें असलेला गरम चहाचा पेला, आणि बशींतील लोणी पाव यांचे मोल आपण देणार असल्याचें आधींच त्यांनीं सांगितलें होतें. खायला घालून

स्वास्थ्याची चौकशी करणारा खात्रीनें औपचारिक कळकळ दाखविणार नाहीं.

"काय सांगू तुम्हांला साहेब?" असें रडकें पालुपद गाऊन, मी मिस्टर पर्सनल क्लार्कना माझ्यावरच्या संकटाची कच्ची हकीकत सांगितली आणि त्या संकटातून सुटावें कसें याबद्दल त्यांचा सल्लाही विचारला.

गंभीर चेहरा करून, त्यानीं आपल्या टाळूवरची अर्धा डझन केंसाची बट कुरवाळीत कुरवाळीत थोडासा विचार केल्यासारखें केलें.

"पांचशे रुपये घेतल्यावांचून काहीं तुमचे मेहुणे येथून हालतीलसें दिसत नाहीं. पहातां पहातां अर्ध्या महिन्यात त्यांनीं तुमचा दोन महिन्यांचा पगार फस्त केला; असेंच त्यांना ठेवून घ्याल, तर आणखी दोन महिन्यांत ते हजाराच्या खड्यांत आणतील तुम्हाला. असे कां बुडता?"

"मेहुण्याकडून लिहून घेऊन कर्ज तरी द्या त्याला," आपल्या विचाराचे फळ पर्सनल क्लार्कनीं माझ्या पसंतीसाठीं पुढें ठेवलें.

आपलें म्हणणें रास्त आहे साहेब; पण मी कुठून देऊं पांचशे रुपये? यांच्या पायीं खाणावळीचें आणि फराळवाल्यांचें कर्ज माझ्या गुडघ्यापर्यंत आलें आहे. त्यातून पाय काढून पुढचे पाऊल कसें टाकायचे, या फिकीरींत मी आहें. आणि आपण म्हणता, दिनकररावांना पांचशे रुपये दे–देऊं कसे?" मी अजीजीनें डोळ्यात पाणी आणून विचारिलें.

"तुम्हीच सहाशें रुपयांचें कर्ज काढा ना," पर्सनल क्लार्कनीं सुचविलें.

"तेंही माझ्या मनांत आलें; पण माझ्यासारख्या हातावरच्या पोटाच्या धन्याला कोण कर्ज देतो?"

"तसं तर खरंच—" एक पची चूक काढण्यांत चूर झालेल्या एकनाथासारखा चेहरा करून मिस्टर पर्सनल क्लार्क म्हणाले.

पुन: ते गंभीर झाले.

त्याच सुमाराला आमच्या हपिसांतला दुसरा एक सुंदरराव नांवाचा कारकून आपली टिफीन संपवून, रुमालांत तोंड खुपसून, सासऱ्याच्या अंगावरून जाणाऱ्या नव्या सुनेसारखा लाजत, मुरडत आमच्या

टेबलाजवळून चालला होता. त्याला पहातांच पर्सनल क्लार्कचा चेहरा तळत्या तुपांत पडलेल्या बुंदीच्या कळीसारखा फुलला.

" अरे सुंदरराव ! " अशी हाक देऊन, पर्सनल क्लार्क खुर्चीवरून उठलेच.

सुंदररावाला बाजूला घेऊन दहा मिनिटेंपर्यंत ते त्यांच्याशीं कांहीं कुजबुजत होते.

मला वाटलें, काय माणसाची जात आहे पहा. इतका माझ्याशीं सहानुभूतीनें बोलणारा माणूस, सुंदरराव दिसतांच, आधीं आपलें काम साधण्यासाठीं, मला माझ्या चिंतेच्या चिंतनांत तसाच टाकून चालता झाला !

दहा मिनिटांनंतर सुंदररावासह पर्सनल क्लार्क माझ्याकडे परत आले.

" बाबूराव, काळजी करूं नका, वेळ पालटली, तुमचे ग्रह उलट्याचे सुलटे झाले. या सुंदररावांच्या माहितीचा एक सावकार आहे. तो तुम्हांला हवी तेवढी रक्कम कर्जाऊ देईल. व्याज जबर असतें पण चिंता नाहीं. सुंदरराव नेहमीं त्या सावकाराकडून कर्ज घेतो आणि आपला निम्मा पगार व्याजफेडीसाठीं लावून देतो. "

मला कर्ज मिळणार आणि दिनकररावांची ब्याद चांडाळचौकडीसह एकदांची टळणार या कल्पनेनें मला झालेल्या आनंदापुढें तोरण्याच्या पडक्या बुरुजांत मोहरांचा हंडा सांपडल्यानें शिवाजी महाराजांना झालेला आनंद, म्हणजे हिमालयापुढें पांढऱ्या डिकाच्या चिमुकल्या खड्यासारखा होता.

" पण साहेब, बाबूरावांच्या निम्या पगाराच्या कपाती–पोहोचेबद्दल हपीसांतील कोणीतरी जबाबदार माणूस जामीन लागेल त्या सावकाराला. " सुंदररावानें सांगितलें.

" असं ? तेंही खरंच ! " असें उदासपणानें म्हणून पर्सनल क्लार्क पुनः गंभीर झाले. रोग्याला क्षयाची भावना आहे, हें त्याला कसें सांगावें, या फिकीरींत पडलेल्या डॉक्टरासारखा तेव्हां त्यांचा चेहरा दिसत होता.

मीही त्यांच्याकडे तपासून झालेल्या रोग्याच्या आशाळभूत नजरेनें पाहूं लागलों.

एक मोठा सुस्कार सोडून पर्सनल क्लार्क म्हणाले,

"काळजी नको; मी राहीन बाबुरावांना जामीन. मोठा होतकरू तरुण आहे हा माणूस! मॅनेजर पुढच्या महिन्यांतच यांना एकदम पंचवीसांची बढती देणार आहे—ऑफिशिअल सिक्रेट आहे हें, पण तुम्हां दोघांना सांगायला कांहीं हरकत नाहीं. आजच्या आज सावकारी करार करून टाका, म्हणजे आजच्या पगाराची निंपटच सावकाराला लाऊन सुटतां येईल. पंचवीस रुपयांची इनक्रीमेंट झालीच नाहीं; असें वर्ष दोन वर्षे बाबूराव समजतील. कोणी सांगावें? त्या मुदतींत बाबूराव शंभर सव्वाशेचे हपीसरही होतील. साहेब त्याच्यावर बडा खुष आहे—"

"साहेब, साहेब—काय करूं हो तुम्हांला!" गहिंवरून मी मध्येंच बोललों, "आपले उपकार मी कसे फेडूं?"

"तेंहि मी वेळ आली म्हणजे सांगेन—त्यावेळीं मात्र आजच्या शब्दांची आठवण ठेवा म्हणजे झालं. बाबुराव, तुमच्यावर माझी फार दिवसांची नजर आहे—फार फार मोठं काम करून घेणार आहें मी तुमच्याकडून— "

माझा उपकारकर्ता पुढें माझ्यावर काय संकट आणणार आहे, याची मला त्यावेळीं थोडी तरी कल्पना येती तर—?

\+ + +

ठरल्याप्रमाणें त्याच दिवशीं रात्रीं, सुंदरराव मला सावकाराकडे घेऊन निघाला.

मोठा चमत्कारिक होता तो सावकार! रात्रीं बाराच्या पुढें भेटावयाचा म्हणे. तो आधीं कधीं भेटला—तर—पण नव्या कुळांची तो नेहमीं मध्यरात्रीच्या पुढें गांठ घ्यावयाचा.

इतकी वर्षें मी काढलीं, पण गांवाच्या त्या भागांत मी कधींच फिरकलों नव्हतों. जगांत इतकी घाणेरडी वस्ती असूं शकते आणि माणूस म्हणविणारे प्राणी त्या तसल्या वस्तींत राहतात, असें जर आधीं मला

कोणी सांगितलें असतें तर सांगणारा मोठा कल्पनासंपन्न कादंबरीकार म्हणून मी एकदम कबूल केलें असतें.

मोठ्या रस्त्याला लागून एक बोळ, त्याला आडवा असलेला एक लहान बोळ, दुसऱ्याला काटकोन करून निघालेला तिसरा त्याहून चिचोळा बोळ, असे एकाहून एक अरुंद होत गेलेले पांच बोळ मागें टाकून सहाव्या बोळांत सुंदररावाच्या मागून मी चालूं लागलों. म्युनिसिपालटीचा एक कंदील अक्षरशः जळत होता त्या बोळाच्या मध्यावर. कंदिलांतील दिव्यावरची कांचेची चिमणी चिमणीसारखी भुरकन उडून गेली असल्यानें, तो दिवा भडकला होता, जशी कांहीं काचेची चिमणी म्हणजे त्याची पत्नी आणि ती त्याला सोडून निघून गेली, म्हणून त्याच्या अंतरात्म्याचा भडका होऊन दुःखाचे काळ्या धुराचे फवारे बाहेर पडत होते. त्या उजेडांत सुंदरराव मला पाठमोरा दिसला, तेव्हां मला कांहीं तरी बरेंच दिवस हरवलेलें सापडल्यासारखें वाटूं लागलें. परंतु, बोळांतील असह्य दुर्गंधीमुळें माझें डोकें इतकें उठलें होतें कीं, गडबडीनें घर बदलीत असतां अस्ताव्यस्त झालेल्या वस्तूप्रमाणें माझ्यांतील साऱ्या वस्तूंचा गडबडगुंडा उडाला होता. त्यामुळें सुंदररावाला पाठमोरा पाहून, हरवलेलें काय सांपडलें, आणि हरवलेलें होतें काय? याचाच मला निर्णय करतां येईना.

शेवटचा बोळ बंदिस्त होता. म्हणजे त्याला एकच तोंड असून दुसऱ्या तोंडाला एक मोठेंसें घर होतें. त्या घराच्या दरवाज्यापाशीं सुंदरराव थांबला. मला तेथपर्यंत पोहोचणें अवश्य होतें. दरवाजाला लागूनच माजलेल्या उकीरड्यांचा डोंगर ओलांडून जाणें महा शिताफीचें काम होतें. उकिरडे ओलांडण्यांत सुंदरराव अट्टल तरबेज होतासें दिसलें.

गेलों कसाबसा. मीही तो उंबरठा ओलांडलाच. March on ye Soldiers, and the Alps will go down themselves असें कायसेंसें इटालीच्या स्वारीच्या प्रसंगीं नेपोलियन आपल्या शिपायांना म्हणाला, त्याचें स्मरण झाल्यानेंच मी तो उकीरडा ओलांडू शकलों!

सुंदररावानें दारावर धक्के दिले, घोगऱ्या आवाजांत 'गोंदुबुवा, गोंदुबुवा' अशा दहाबारा हांकाही मारल्या.

" बुवा आले आहेत का?" सुंदररावानें विचारलें.

" कवाच " त्याला उत्तर मिळालें; उत्तराचा आवाज अस्पष्टपणें मला ओळखीचा वाटला.

"इये कोन दुसरं?" त्याच आवाजांत प्रश्न आला.

" माझे स्नेही आहेत; बुवांचं नवं कूळ—"

जुन्या पद्धतीच्या घराच्या चौकांतून मला सुंदररावानें सोप्यावर नेलें. सोप्यावरून एका अरुंद आणि किरकिऱ्या जिन्यानें आम्ही एका छपरेली माडींत शिरलों. त्या माडीच्या एका कोनाड्यांत टिनपाटी राकेलचा उघडा दिवा जळत होता. दार उघडणाऱ्या स्त्रीनें एक फाटकें घोंगडें आंथरलें; त्यावर मला बसावयाला सांगून सुंदरराव म्हणाला, "इथंच बसा अं थोडे, मी आधीं बोलून येतों; त्यांची खात्री झाल्याशिवाय ते एकदम नव्या माणसाला भेटत नाहींत–जामिनकी पत्करल्याबद्दल पर्सनल क्लार्कसाहेबांचें पत्र द्या पाहूं माझ्याजवळ."

सुंदरराव निघून गेल्यावर, मला त्या जागेचा भयाणपणा जाणवूं लागला. दार उघडणारी बाई त्या माडीच्या दारांतच उभी होती. तिचा सुंदरसा पण उग्र चेहरा पाहून तर मला तोंवर वाचलेल्या साऱ्या गुप्त पोलिसांच्या टोळयांचीं वर्णनें भराभर आठवूं लागलीं! जसा कांहीं त्या कादंबऱ्यांच्या वाचनाचा परीक्षेंत मी पेपरच लिहावयाला बसलों होतों, हें मी कबूल करतों, कारण मला जगांत राहून किती तरी सुखें उपभोगायचीं होतीं.

"चला आंत." सुंदरराव येऊन म्हणाला, "बुवांची खात्री पटली; ते तुम्हांला या घटकेस सहाशें रुपये द्यायला तयार आहेत. रुपयाला रोज एक आणा व्याज मागत होते."

"काय! रुपयाला रोज एक आणा?" मी घाबरून उठत विचारिलें; मी लगेच मटकन् खालीं बसलों; व्याजाचा दर ऐकून कंबर खचल्यानें मी खालीं बसलों नाहीं, तर गडबडीनें उठूं लागल्यानें वरच्या उतरत्या तुळवटानें माझें माथें बडवलें, म्हणून मी बैठक मारली.

" घाबरू नका. रुपयाला एक आण्याऐवजीं शंभर रुपयांना रोज एक आणा मी बुवांना व्याज कबूल करावयाला लावलें आहे. चला आंत-कर्जरोख्यावर सही करा, पैसे घ्या, आणि करा मला रिकामा." सुंदरराव त्रासिकपणानें म्हणाला.

उगीच आपल्यासाठीं बापड्या सुंदररावाला त्रास नको म्हणून मी त्याच्याबरोबर आंतल्या माडींत गेलों.

समोरच एक भली मोठी कणिंग होती. तिच्या पलिकडून मिणमिण उजेड आणि रुपयांचा आवाज येत होता. त्या आवाजाच्या श्रवणानें कित्येक वर्षांपूर्वी मला सोडून गेलेली माझी आईच स्वर्गांतून माझ्याशीं बोलते आहेसें मला वाटलें.

कणगिला डावें घालून आम्हीं पुढें झालों. मी माझ्या सावकाराला एकदां पहावें तरी म्हणून डोळे वर केले-तर मला काय दिसलें ?

तोंडांतून जळजळीत ज्वाला टाकणारा, आकाशाला हात टेंकून उभा राहणारा आक्राळविक्राळ झोटिंग मला दिसला असता तर मी जितका दिङ्मूढ झालों नसतों, तितका त्यावेळीं माझ्यासमोर दिसणारा माणूस पाहून मी एकदम सुन्न झालों.

पुलाच्या उतारावर उभा राहून भीक मागणारा आंधळा होता तो!

चांगला धडधाकट, आणि ढळढळीत डोळे असलेला तो आंधळा पाहून मी साहजीकच दिङ्मूढ बनून गेलों होतों.

" या दादा " तो बुवा-गोविंदबुवा-सोंगाडा आंधळा मला म्हणाला.

" अरे चोरा ! आंधळ्या ! " मी चिडून ओरडलों. मोठ्यानें हंसून आंधळा म्हणाला-" कोण आंधळा मी-कां तुम्ही ? "

" थांब चोरा असले धंदे करतोस काय ? उद्यां पोलिसांत सारी वर्दी देऊन तुझ्या या भिकेच्या सावकारीबरोबरच तुझीं हाडें मोडतों " मी गर्जना केली.

" हें पहा, उगीच बकवा कशापायीं करतां ? आंधळा गंभीर होऊन म्हणाला, " ह्या घराला आल्यावर मुकाट्यानं सारं पार पाडाल तर ठीक, नाहीं तर—" आंधळयानें माझ्यामागें नजर टाकली.

तिघे तगडे जवान, आधीं दिसलेल्या दरवाजांतील बाईच्या खुनी नजरेनें माझ्याकडे पहात होते. छातींतील बैठक सोडून माझें काळीज पोटाकडे सरकत चाललेसें मला वाटूं लागलें.

तेव्हढ्यांतच चंद्री तेथें आली. तिच्या डोळ्यांत मिस्किलपणा आणि चेहऱ्यावर उपरोधिक स्मित दिसत होतें. " हं आटपा लौकर. घरांत दिनकररावासारखा खादीचा काळ हमेश बाळगायचा नसेल तर मुकाट्यानें कर्जरोख्यावर सही करा. " सुंदररावाची सूचना मला ताबड-तोब पटली.

[ ६ ]

—सुंदररावाप्रमाणेंच मी त्या आंधळ्याला रात्रीं दहाच्यापुढें रस्त्यांत गाठून चार दोन दिवसांनीं व्याजाचे पैसे देत असतों. अर्थातच मी त्याच्या वाटींत भिकेचे पैसे टाकीत नाहीं.

—मनोती, सुंदररावाचें कमिशन वगैरे वजा जाऊन, सहाशेच्या कर्जरोख्याच्या पोटीं माझ्या पदरांत साडेपांचशेच पडले.

जामिनगत, ताईचा प्राणांतिक आजार, वगैरे दिनकररावांच्या शुद्ध थापा होत्या. आपल्याला शिलाईचें काम येतें, अशा समजुतीच्या जोरावर ते एका प्रमुख नाटक कंपनीचे भागीदार झाले. त्यांच्याबरोबर आलेले ते दिनकररावाचे सहव्यवसायी होते. माझ्या कपाळीं जबर व्याजाचें आंधळ्याचें कर्ज मारून उभारलेले पांचशे रुपये दिनकररावांनीं आपल्या भागीचें भांडवल म्हणून नाटक कपनींत घातलें ! माझा 'साला' मला आतां एकसारख्या शिव्या मोजत असतो. कारण मी त्याच्याजवळ पांचशेची वचनचिठ्ठी मागून अविश्वास दाखविला असा त्याचा माझ्यावर आरोप आहे !

—सुंदररावाची आणि माझी गांठ घालून दिली त्या उपकारांच्या फेडींत, आणि भावनेच्या भरांत मी उपकारांची भाषा बोललों होतों, त्या जोरावर मिस्टर पर्सनल क्लार्क आपल्या कुणालाच न पटणाऱ्या मुलीशीं लग्न करण्याची मला गळ घालूं लागले. माझा नकार मिळणार अशी शंका येऊन, ते, आंधळ्याला दिलेली माझ्याबद्दलची जामिनगत मागें

घेण्याची धमकी देऊं लागले आहेत. प्रमोशनलाही फांद्या पाडण्याची भाषा उघड उघड बोलूं लागले आहेत! माझ्यावरच्या उपकारांची फेड, माझ्या गळ्यांत आपल्या लेकीची धोंड बांधण्याच्या अपकाराच्या रूपानें ते परत मागतील अशी मला कल्पना तरी होती का?

+ + +

—गोविंदबुवा, त्याचे तिघे मुलगे, एक मुलगी, तिघी सुना, आणि बारा नातवंडे अशी वीस लोकांची कौटुंबिक सहकारी मंडळी शहराच्या निरनिराळ्या भागांत आंधळ्या पांगळ्याच्या सोंगानी रोज कमीत कमी पंधरा ते तीस रुपयांची कमाई करितात. त्या कुटुंबाची थोडीशी शेती आणि पंचवीस ते तीस हजारांची सावकारी असून व्याजाच्या एकचतुर्थांशात कुटुंबियांचा खर्च भागवून, तीं सारीं माणसें एकसारखीं भांडवलांत भर टाकीत असतात, इत्यादि माहिती बेताबेतानें सुंदररावानें मला सांगितली. माझ्यासारखा भोळा शिकारी गांठून आणल्याबद्दल आपल्याला भरपूर कमिशन मिळत असल्याचें सांगावयास तो भामटा कचरला नाहीं.

—पहिल्याच दिवशीं ती फेंगडी चाल सुंदररावाचीच असली पाहिजे हें मला उमगलें नाहीं म्हणून मी रोज आरशात पाहून केंस साफ करीत असतां, ' हत् मूर्खा ' असें मोठ्यानें म्हणत असतों.

+ + +

गोविंदबुवा नांवाच्या आंधळ्याच्या शाळत मी काय शिकलों?

—जगांत पुरता डोळस कोणीच नाहीं.

—जगांत माणुसकीनें वागणें पाप आहे! कारण माणूस या पदवीला सर्वस्वी पात्र होणारा प्राणी क्वचित्च भेटतो.

—' मुके, आंधळे, पांगळे आणि थोटे, अशा दुर्बलांना करा साह्य मोठें, ' असा उपदेश करणारा डोळस नसला पाहिजे.

—सुंदर मुलीच्या चेहऱ्याकडे पाहून दानधर्म करूं नये, कारण तिचा बाप किंवा आजा महा बदमाष असतो.

—कोणी निष्कारणपणें आपल्या होतकरूपणाची स्तुती करूं लागून उपकारांचें ओझें लादूं लागला, तर त्याला हिडिंबा, शूर्पणखा या स्त्रीरत्नांच्या शाळेंत खुलून दिसणारी लग्नाची मुलगी आहे असें बिनदिक्कत समजावें.

—' प्रभो, सांभाळ, आंधळयांची चाले माळ ' व ' आंधळयासी जग सारेंची आंधळें !' या ओळी लिहिणारे कविराज खात्रीनें डोळस होते.

आणखी किती तरी बारीकसारीक गोष्टी मला त्या आंधळ्यांच्या शाळेंत शिकायला मिळाल्या; परंतु त्या साऱ्याच कशाला सांगत बसूं ? मान सांगावा जगाला आणि अपमान ठेवावा आपला आपल्याला ! होय ना ?

———

# ७ धर्माची टोपी

दत्तू–फत्तू–! वांगीबिंगी, कामबीम, गादीबिदी, काकाबोका, असल्या-पैकीं कांहीं दत्तूफत्तू हें द्वंद्व नव्हे.

मराठी नियतकालिकांतील मजकूर आणि छपाईच्या चुकांचा समुद्र; कोणत्याही म्युनिसिपालिटीचा कारभार व सांवळा गोंधळ; ताजा पदवीधर व उथळ विचार; शाळा–मास्तर व कृतघ्न समाजाचा अकारण अनादर; नवा नवरा आणि सासुरवाडीचा रुसवा; संसाराचा आरंभ आणि त्याबरोबरच घरांत होणारा पिजाऱ्याच्या यंत्राचा टणत्कार; इत्यादि प्रकारच्या ठाम जातींच्या जोड्या चुकून एखादे वेळीं फुटलेल्या आढळ-तील; परंतु, दत्तू आणि फत्तू या दुकलीचा विजोड झालेला कोणालाही आढळावयाचा नाहीं.

दोघेही अगदीं बाळ व आळी–मित्र.

एक हिंदु, दुसरा मुसलमान !

देशांत वारंवार हिंदुमुसलमानांचे दंगे झाले, त्यांचीं वर्तमानपत्रांत आलेलीं वर्णनें दोघांनींही एकत्र बसून वाचलीं; परंतु, केव्हां तरी कोणीं तरी स्थापलेल्या धर्माच्या वेडापायीं, त्यांनीं कांहीं आपल्या मैत्रीच्या क्षेत्रांत बेकीचें बियाणें रुजविण्यासाठीं, बालपणापासून चालत आलेल्या एकीची कापणी–मांगलणी केली नाहीं.

शहाजी राजे व रणदुल्लाखान, एकीच्या ज्या ऐटीनें विजापूर दरबारांत वावरत होते, त्याच ऐटीनें ते दोघे सवंगडी ‘ शाळेच्या चिमण्या जगांत ’ वावरत असत.

त्याचा अर्थ असा नव्हे कीं, दत्तू–फत्तूमध्यें कधीं बोलाचालीचे अगर कुरबुरीचे प्रसंग उद्भवलेच नाहींत. एका दावणीच्या खोंडाच्या दोस्तीपैकीं त्यांच्या दिल्लगीचा प्रकार होता. एका दावणीच्या दोन खोंडांची कारणानें कांहीं काळ जोडी फुटली, तर एक दुसऱ्याच्या विरहानें

हैराण होऊन चारापाणीही सोडतो; दुसऱ्याची तिकडे तशीच अवस्था होते. तेंच, ते खोंड पुनः एकत्र आले, कीं भेटल्या क्षणींच एकमेकाला ढुश्शा देऊं लागतात. ढुश्शा देणें म्हणजेच एकमेकांवरील प्रेम दाखविणें, अशी त्यांची समजूत असते जशी कांहीं !

दोन वकील एकत्र आले असतां ते आधींच बैठकींत अगर संगतींत असलेल्या 'अ—वकील' प्राण्यांना जळल्या आगकाडीप्रमाणें आपल्या विचारांतून फेंकून देऊन, कोर्टांतील 'विकत भांडणांची' बातचीत करण्याचें क्वचित् प्रसंगीं विसरण्याची माणुसकी दाखवितील; कामाच्या कागदपत्रांचीं, किंवा तपासावयाच्या वह्यांचीं पुडकीं खाकोटींत मारल्यावांचून घराकडे परतलेला एखादा कारकून अगर शाळामास्तर कधीं कुणाला आढळेल; रोगी खात्रीनें केव्हां मरणार, तें दोन डॉक्टर्स एकमतानें एकदम सांगण्याचा संभवही केव्हां तरी निर्माण होईल; शहाण्यासंवरत्या दोन बायका सबंध एक तास गुण्यागोविंदानें एकत्र राहण्याचा चमत्कार करून दाखविणेंही एखादे काळीं शक्य होईल; परंतु, दत्तू आणि फत्तू एकत्र आले, आणि एकानें दुसऱ्याची खोडी काढली नाहीं, आणि त्याबद्दल दुसरा परत फेड करण्याच्या तयारीला लागला नाहीं, असें कधींही होणें शक्य नाहीं.

तरी पण, स्नेहाच्या मुळया हृदयांत खोलवर पोहोंचल्या असल्यामुळें, तसल्या निमित्ताच्या वावटळीनें त्यांची स्नेहलता कधीं वठली नाहीं. मग त्या लतेला कडू फळें येण्याची गोष्टच कशाला हवी ?

कांहीं तरी युक्तिप्रयुक्तीनें दुसऱ्याची 'गंमत' करण्याच्या नादांत दत्तू आणि फत्तू गुंतलेले असावयाचे. त्यांच्या त्या आपसांतील गंमतीची मौज अगर शोभा, तिसऱ्या कोणाला चुकूनसुद्धां पहावयाला मिळावयाची नाहीं. फारच फार झालें, तर त्यांतल्या त्यांत त्या दोघांनाही अधिक जवळचासा वाटणाऱ्या एखाद्या सोबत्याला, घडलेल्या गमतीचा इतिहास पुढें मागें, केव्हां तरी प्रसंगानें, कळला तर कळावयाचा.

'गंमत' अंगलट आली, तर दत्तू, "खूपच केलीस हं, पण तूं फत्तू ! पसंत आहे आम्हकू," असें म्हणून, चटकन्

रिकामा होतो. फत्तूच्या मनाची ठेवण मात्र तितकी ऐसपैस आणि साफ नाहीं. त्याच्या मनाला गांठीपदर असल्यामुळें, खुनशी-पणानें दत्तूच्या गंमतीचें देणें सव्याज परत केल्याखेरीज त्याला चैनच पडत नाहीं.

\+ \+ \+

आधुनिक गवयांप्रमाणें, दोन विधर्मी रागांतील चिजाचे अंतरे एकत्र करून, बनवलेली एक नवीन चीज, म्हणजे दत्तू–फत्तूची मैत्री, हें आतांपर्यंत वाचकांच्या ध्यानांत आलें असेलच. त्यांचीं अंतरंगें परस्परापासून थोडीं फार भिन्न असलीं व रागालोभाच्या प्रसंगानीं त्या अंतरंगी रागांचे आरोह–अवरोह वरचेवर बदलत असले, तरी त्यांच्या मैत्रीचा जीवनसूर एकच आहे; तो म्हणजे मुलखाचा विक्षिप्तपणा ! जगाकडे पाहण्याची त्यांची दृष्टि जरी एकच आहे, तरी जगाच्या दृष्टीनें ती विचित्रच ठरलेली आहे.

कॉलेजमध्यें परीक्षा; दोघेही कॉलेजच्या वसतिगृहांत वर्ष दोन वर्षं सारखे राहिलेले; तरी इण्टरमिजिएटच्या परीक्षेला दत्तू–फत्तू आपले एकदम मुंबईला जावयाला निघाले !

" हा हो काय दत्तोबा तुम्ही चमत्कार केला ? चांगली उंबरठ्यांत परीक्षेची सिद्धता असतांना तुम्ही मुंबईचा फॉर्म कां भरला ? " असा एका विद्यार्थ्यानें धाडस करून दत्तूला प्रश्न केला.

त्याला दत्तूनें तावडतोब उत्तर दिलें, " कॉज ॲण्ड इफेक्ट, हा लॉजिकमधला भाग तुम्हांला अजून नीटसा समजलेला दिसत नाहीं मिस्टर ! पंधरा दिवसांवर परीक्षा आली कीं हो ! If not now, when ? Next year perhaps, eh ? अहो, ज्याअर्थी दारची सोय लाथाडून मुंबईपर्यंत परीक्षेसाठीं आम्हीं धांव घेणार आहों, त्या अर्थी त्याला कांहीं तरी तसेंच जाडजूड कारण असलें पाहिजे, हें तुमच्या ध्यानांत यायला हवं होतं. एकच कारण कां ? आम्हाला मुंबई पसंत करण्याला अनेक भयंकर कारणें आहेत. खोबऱ्याच्या तेलाची फोडणी दिलेली, कारवारी खाना-वळींतील आमटी कोरड्या पोह्यांसारख्या भाताबरोबर खाऊन पाहण्याची

झालेली अनावर इच्छा—कारण नंबर एक—दुसरें कारण म्हणजे आमच्या फत्तूनें पूर्वी मुंबई कधींच पाहिलेली नसल्यानें, तो ट्रॅमबीमखालीं सांपडून मरेल ही भीति—आणि तिसरें म्हणजे—"

"पुरे पुरे, चीत झालों बुवा!" पृच्छकानें मध्येंच सांगितलें.

"अगदीं चारीमुंढे चीत झालांत? आपला परीक्षेचा अभ्यास सोडून पुनः नाहीं ना दुसऱ्यांच्या उठाठेवी करण्यांत वेळ दवडणार?" दत्तूनें शेवटीं टोला दिलाच.

फत्तूनें दुसऱ्या एका उत्सुकाला भलतेंच, नव्हे मासलेवाईक उत्तर दिलें होतें.

"दत्तोबा आमचा प्रायव्हेट सेक्रेटरी पडला; त्यानं ठरविलं या खेपेला मुंबईला परीक्षेला जायचं; आम्ही मुकाट्यानं तें कबूल केलं. किती तरी दिवस त्याचा नाद चालला आहे, एकदां समुद्र पाहायचा म्हणून. मी इथं बसून, त्याला समुद्र पाहण्याची युक्ति सांगितली."

"सिनेमात ना?" फत्तूला गार करण्याच्या हेतूनें मोठ्यानं हंसून, त्याच्याशीं बोलणाऱ्यानें विचारलें.

"छे छे, सिनेमांत तरी जायच्या यातायाती कशाला हव्यात! आपल्या खोलींत बसून समुद्र पाहतां येतो. सांगू तुम्हाला? पृथ्वीच्या परीघाला, दहा कोटी, पंचवीस लक्ष, ब्यांशी हजार, बाराशें पचाहत्तर पूर्णांक, एकोणीसशें वीस, सत्राशे चाराशांनीं गुणून, त्या गुणाकारांत शिवाजीचा जन्मशक मिळवायचा; त्या बेरजेंतून अवरंगजेबाची जन्मतारीख उणी करून, एक संख्या तयार करून ठेवायची; इतकी यातायात करूनही जिवंत राहिलांतच, तर एक बारडीभर पाणी घ्यावयाचे, त्या पाण्याचे ड्राम करून, ड्रामांचें थेंब बिनचूकपणें ड्रॉपरनें मोजून, जी संख्या येईल, तिला आधीं तयार करून ठेवलेल्या संख्येनें सपाटून गुणत गुणत सुटायचें—असें करून जें उत्तर येईल; ती त्या बकेटांतील पाण्याची समुद्रपट असें खात्रीनें समजावें. गुणाकारासाठीं जितके कागद खराब झाले असतील, तितके सारे बकेटांतील पाण्याच्या तळाशीं ठेवून वजनासाठीं आपलें डोकें त्यांत बुडवावें; आणि डोळे उघडावे म्हणजे खोलींतल्या खोलींत समुद्र कसा छान दिसतो!"

फत्तूला खास वेड लागलें असावें, अशी कल्पना होऊन त्याच्याशीं बोलणारा विद्यार्थी कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें त्याच्या पुढून झपाट्यानें निघालाच.

+ + +

" दत्तू माझा खासगी कारभारी आहे " असें फत्तू ज्याला त्याला सांगत सुटला असल्याची बातमी एक दोन दिवसांतच दत्तूला समजली. ती गोष्ट त्याच्या मनाला लागली. तरी पण, त्यानें ती मनांतल्या मनांत ठेवली; फत्तूला तिचा जाब विचारला नाहीं.

योग्य वेळीं ते दोघे मित्र रात्रीच्या गाडीनें मुंबईला जावयास स्टेशनावर आले.

तीन तीन बोटाच्या रुंदीचे, तांबडे जांभळे पट्टे असलेला, हिरव्या रंगाचा शर्ट; त्याला लांबलचक कानांची उंचच्या उंच कॉलर; पाच पट्ट्याचा, एकोणीस बटणांचा, बंद गळ्याचा व धड ना आंखूड, धड ना लांब, असा निमजातीचा वरकोट; प्रकाशाला व प्रदर्शनाला हपापलेल्या गोषांतील स्त्रीप्रमाणें बाहेर डोकावणारा कोटाच्या बाहींत खाद्याजवळ खोंचलेला, हळदी रंगावर गुलाबगेंद असलेला हातरुमाल, अवाढव्य बोंग्याचा पांढरा, मळकट चोळणा; पायांत पठाणी वहाणा; डोक्याला गडद तांबड्या रंगाची व लांबलचक गोंड्याची उंचच्या उंच टोपी असा फत्तूनें प्रवासासाठीं पोषाक केला होता.

साफा, सुरवार, पांढरा लांबलचक शैरवानीवजा कोट; आंत रेशमी शर्ट; पायांत दिल्लीचा चढाव; असा सरदारी थाटाचा पेहराव दत्तूनें चढविला होता.

गाडी सुटायच्या ऐन वेळेला, 'हा, आत्तां सोडा पिऊन येतो बघ!' असें फत्तूला गडबडीनें सांगून, दत्तोबानें आपला डबा सोडला. गाडी सुटली तरी तो परतला नाहीं. धांदलीपायीं दुसऱ्या डब्यांत दत्तोबा बसला असेल, पुढच्या स्टेशनावर तो आपल्या डब्यांत परत येईल, अशा सरळ कल्पनेनें फत्तेखानानेंही आपल्या मित्राबाबत विशेष चिंता केली नाहीं.

सारी रात्र उलटली तरी दत्तू परत आला नाहीं, हें सकाळीं, मुंबईला गाडी आल्यावर, फत्तूला कळलें; कारण, तोंपर्यंत मुसलमानी अरेरावीनें ऐसपैस जागा पटकावून, तो डाराडूर झोंप काढीत होता.

जागा झाल्यावर दत्तू डब्यांत दिसेना, अनोळखी मुंबईंत तर देह येऊन पडलेला, तेव्हां मात्र फत्तू मनांतल्या मनांत बराच गडबडून गेला. आपल्याप्रमाणेंच आपला जिगर दोस्तही दुसऱ्या डब्यांत झोंपीं गेला असेल, व गाडी थांबतांच प्लॅटफॉर्मवर उतरला असेल असें कल्पून आपल्या व दत्तूच्या सामानासकट खालीं उतरून, गर्दीमध्यें दत्तू कोठें दिसतो का, तें फत्तू टेहळूं लागला. तों डोळे चोळीत चोळीत दत्तमहाराज एका सेकंडक्लासच्या डब्यांतून बाहेर पडत असलेले त्याला दिसले.

"याचा अर्थ काय दत्तू ?" जवळ जाऊन, चिडीनें फत्तूनें प्रश्न केला.

"चूप ! मोठ्यानें बोलूं नकोस; ही मुंबई आहे, खेडवळाप्रमाणें बकूबक् करशील, तर तुझ्याबरोबर माझीही या शहरांत किमत ठरेल, —चल, मुकाट्यानं हमाल ठरीव आणि सामान घेऊन ये. मी तिकिटाच्या दरवाज्याशीं जाऊन आपण कळविल्याप्रमाणं हॉटेलवाल्याचा कुणी मनुष्य आला आहे कीं काय, तें पाहतों." असें सांगून, दत्तू पुढें सटकलाच.

दोस्ताच्या दमदाटीनें बिचारा फत्तू सर्दच झाला.

"अरे वा; देशीच आहे, पन् तुझा साहेब लई तेज दिसतोय् कीं !" आपल्या साहेबाचें सामान सांभाळीत प्लॅटफॉर्मवर उभा असलेला एक देशी पट्टेवाला फत्तूला सलगीनें म्हणाला.

रागानें त्याच्याकडे एकवार पाहून, फत्तू तेथून निसटला.

अशा रीतीनें ती 'हिंदु—मुसलमानोंकी एकी' एके सकाळीं मुंबईस येऊन दाखल झाली.

बोरीबंदराच्या फाटकांतून दत्तू बाहेर पडूं लागला. तिकिटवाल्यानें साहजिकच त्याजजवळ तिकीट मागितलें. दत्तूनें दोन तिकिटें दिलीं. 'दुसरें कोणाचें ?' अशासारखा तिकिटवाल्यानें प्रश्न केला. दत्तूनें फत्तूकडे पाहिलें, मग हलक्याशा आवजांत त्याला कांहींतरी सांगितलें. हमालाच्या डोक्या-

वर सामान देऊन, तेव्हढ्यांतच फत्तू फाटकाजवळ येऊन पोहोंचला. ‘ हमारे खान्सामेका ’ असें कांहीसे दत्तूचे शब्द त्यानें ऐकले.

फत्तूच्या दुखावलेल्या मनाला त्या शब्दांनीं चांगलीच जखम केली.

“ हें सामान कोणाचं ? ” फत्तूमागून फाटकांतून बाहेर पडणाऱ्या हमालांच्या डोक्यावरील सामानाकडे हात करून तिकीटवाल्यानें विचारलें.

फत्तूनें तिकीटवाल्याकडे रागारागानें पाहिलें. परंतु उत्तर म्हणून दिलें नाहीं.

“ आमचेंच तें सामान आहे, म्हणून सांग ना ” फाटकाबाहेर तीन एक हातांच्या अंतरावर उभा असलेला दत्तू, फत्तूवर गरगुरला. मालकानें नोकराला चापावें, तसें दत्तूचें तें गुरगुरणें होतें.

माफीहून त्याचें सामानसुमान पुष्कळच अधिक असल्याचा संशय आल्यानें, तें वजन करून पाहण्यासाटीं तिकीटवाल्यानें त्या दोघांनाही थोडें थांबावयास सांगितलें.

“ मला वेळ नाहीं; माझा हा माणूस इथं थांबेल. जर कांहीं जास्ती कमी पैसे पडतील, तर हा माझा इसम देईल; त्याला पावती द्या म्हणजे झालं.” असें तिकीटवाल्याला सांगून,धांदलधडपडीनें फत्तूच्या हातांत पांच रुपयांची एक नोट कोंबून दत्तू तेथून सटकलाच.

पुढें अर्ध्या एक तासानें गाडी ठरविण्यासाटीं गाड्या उभ्या असलेल्या ठिकाणीं हमालासह फत्तू आला.

“ शूच्-शूःच्-शूःच् ” तोंडानें असा आवाज करून व हातानें टाळ्या वाजवून, दत्तूनें त्याचें लक्ष आपल्याकडे वेधलें. आधींच गाडी ठरवून फत्तूची वाट पहात दत्तू एका गाडींत बसला होता.

“ दत्तोबा, याचा अर्थ काय ? ” गाडी हॉटेलच्या वाटेला लागल्यावर फत्तूनें गुरगुरत विचारलें.

“ कशाचा ? ” रस्त्याकडे पहात निर्विकार चेहऱ्यानें दत्तूनें उलट प्रश्न केला.

“ तूं मला खान्सामा म्हणालास त्याचा अर्थ काय ? ” फत्तू आतां फारच चिडला होता.

" प्रायव्हेट सेक्रेटरी–म्हणजे खासगी कारभारी–याचा जो अर्थ, तोच खानसाम्याचा अर्थ–" हंसत फत्तूकडे रोखून पहात खोंचकपणानें दत्तूनें उत्तर दिलें.

फत्तूला उत्तर मिळालें–खूण पटली.

" अस्सं काय ? " असें दटावणीनें म्हणून फत्तू रस्त्यावरच्या रहदारीकडे पाहूं लागला. त्याच्या बोलण्याचा व मुद्राविर्भावाचा खरा अर्थ ' बरं आहे, पाहून घेईन' असा असावासें दिसत होतें.

\+ \+ \+

चार साडेचार दिवस परीक्षेच्या धादलींत गेले. सकाळीं लौकर उठावयाचें, नैमित्तिक मुखमार्जन चहापानादि विधी आटोपावयाचे आणि जें एकदा त्या दिवसाच्या दोन विषयाच्या पुस्तकात डोकें खुपसावयाचें, तें साडेनऊ पावणेदहाच्या सुमारास वर काढावयाचें; नंतर कावळ्याच्या परिपाठाचें फडफडीत स्नान, कोंबड्यासारखें वचावचा जेवण, कीं परिक्षेच्या जागेकडे कुत्र्यासारखी धूम ठोकावयाची; सायंकाळीं साडेपांच वाजतां परीक्षेच्या गिरणींतून जें बाहेर पडावयाचे तें सकाळपासून संध्याकाळपर्यंत पोटासाठीं खऱ्याखुऱ्या गिरणींत राबणाऱ्या मजूरांप्रमाणेंच शरीराचा लोळागोळा आणि जिवाचा कोरडा पिवळा बरोबर घेऊनच बाहेर पडावयाचें, असा यंत्राच्या ठराविकपणाचा दत्तू–फत्तूचा त्या चार दिवसांचा दिनक्रम असल्यामुळें, त्यांना इतर उचापती आणि नसते धंदे करावयास आवकाशच नव्हता.

शेवटच्या दिवशीं एकच पेपर होता. फत्तूचें लिहिणें निम्या वेळांत, म्हणजे अवघ्या दीड एक तासांत आटोपलें होतें. आपली ' उत्तरिका ' ( मराठी भाषाशुद्धि की जय ! ) आपल्या वल्लभाच्या ( वल्लभ Supervisor किंवा Overseer–डिक्शनरी पहा–पुनः भाषाशुद्धी की तीनदां जय !!! ) हातीं देऊन, फत्तू लौकरच परीक्षेच्या कर्मभूमींतून बाहेर आला होता.

" अरे फत्तू , कुठं गेला होतास तूं इतका वेळ ? " अदमासें चार वाजण्याच्या सुमारास फत्तू हॉटेलमधील त्यांच्या खोलींत परतला, तेव्हां त्याला दत्तू हंसून म्हणाला.

"दिल-चमनच्या शोधाला!" फत्तूनें हंसून उत्तर दिलें; "अरे यार, परीक्षेच्या जान्हममधून माझा दोस्त दत्तू आज बाहेर पडणार, त्याच्या दिलाला आरामीआराम वाटेल, असं परेस्तान शोधून काढणं, माझं एक पवित्र कर्तव्यच नाहीं का?"

"आणि जसा कांहीं तुझा जीव चैनींतच होता गेले तीन चार दिवस? तुला नाहीं का आरामीची जरूर? आपल्यासाठीं हवं असलेलं लग्न, आई-बापांच्या सुखाच्या खातीं खर्ची टाकणाऱ्या स्वार्थत्यागी तरुणांपैकींच एक तूं मला दिसतोस!" दत्तूनें फत्तूला टोंचलें.

"दोस्त दत्तू, तूं मला असा हिणवूं नकोस. नुसती तुझी नेहमींची हास भागेल, अगदीं पोट भरून भागेल, असंच परेस्तान मी हुडकून काढलं आहे."

"पोट भरेल असं परेस्तान?"

"जिभेनं चाखलीं नसतील, असल्या पक्वानांनीं पोट भरेल असं परेस्तान नुसतं 'उदयुं' खाशील, तर चीत् होऊन जाशील!"

"उदयुं? उदयुं, हें काय आहे? तिखट का गोड?"

"चल् माझ्याबरोबर. खाऊन बघच तें एकदां एक प्लेटभर आणि मग मला साग–मलाच का तुझ्या पोराबाळांनाही सांगत बैस कीं, 'मुंबईच्या गुजराथी फराळाच्या दुकानांत उदयुं खाल्लं होतं एकदां, त्याची आठवण जन्मांत विसरणार नाहीं'–अरे यार, एकदांच उदयुं! बस्स! सारं जग उदयूनं भरून जातं एकदम! वाहवारे उदयुं!!"

"सारं जग उदयूंनं भरून जातं? म्हणजे उदयुं ही काय एक प्रकारची दारूबिरू तर नाहीं ना?"

"दत्तू, काय भ्याडबीड आहेस कीं काय? दारू न पीतां दारू प्याल्यासारखं काय बडबडतोस? बेट्या, एक प्लेटभर उदयुं खाऊन बघ, असं तुला मी आतांच सांगितलं ना? दारू कधीं कुणी प्लेटनं प्याला आहे का? दारू म्हणजे, हुलग्याचं माडगं का नाचण्याची अंबील? तद्दन एकदम हिंदु आहेस बघ!"

संधि सांपडल्यावर बोलण्यांत फत्तूची आणि खाण्यांत दत्तूची जीभ आंवरतां आवरावयाची नाहीं.

फत्तूच्या जिभेची शाब्दिक आतषबाजी चालली होती, तेव्हां भडक वर्णनाच्या अज्ञात उदयूबद्दलच्या विविध कल्पनांनीं निर्माण केलेलें पाणी दत्तूच्या जिभेवरून ठिबकत होतें. जणूं कांहीं फत्तूच्या जिभेच्या आतषबाजीनें कांहीं आग भडकलीच तर ती विजविण्यासाठीं दत्तूच्या जिभेची पूर्वतयारी होती.

" पण फत्तू, तुला रे कशी कळली त्या उदयूंची चव ? "

" त्यांत काय अवघड आहे ? परीक्षेहून येतां येतां वाटेंत दिसलं एक गुजराथी हॉटेल; शिरलों मी त्यांत. पण दोस्त दत्तू, काय सांगूं तुला, उदयूंची प्लेट पुढं आली, आणि पहिलाच घास मी तोंडांत घातला पण उदयु मला जाईचना बघ, तश्शी प्लेट टाकली आणि धांवत सुटलों एकदम !—"

" आणि तें तसलं न जाणारं पक्कान्न खायला मला नेणार आहेस—होय ना ? "

" काय केलीस पण आपल्या या दोस्ताची परीक्षा तूं ! अरे, तुला टाकून उदयु मला गिळवेना, तुझ्या आठवणीनं गळा दाटून आला, म्हणून तर यार, मी भरलेली प्लेट तश्शी टाकून तुझ्याकडं धांवत आलों, तें विसरून माझी अशी शोभा करतोस होय ? "

" मित्रा फत्तेखाना, खरं हें ? चल, चल तर मग—आतां उशीर नको. "

" सबूर ! एवीं तेवीं आतां मी इथवर आलोंच आहे, तर आधीं चांगला बाथ घेतों, छान, स्वच्छ कपडे करतों—"

" हॉटेलमध्यें कायससं तें उदयु का काय तें गिळायला जायचं, तर त्याला जामानिमा रे कशाला फत्त्या ? " शर्यतींतील हौशी जवाना प्रमाणें दत्तूनें त्रासिकपणानें विचारलें.

" हें बघ दत्तू, " दत्तूची उत्सुकता उदयूंसाठीं जितकी वाढत होती, तितका फत्तूचा गंभीरपणा आणि हालचालींचा थंडपणा वाढत, पसरत

चालला होता; म्हणून व्याख्यानाच्या आरंभीं, एखादा उदात्त वाणी-विचारांचा वक्ता जसा गोल आणि खोल आवाज काढतो, तसा आवाज काढून तो बोलूं लागला, "आज आपलं परीक्षेचं सुतक फिटलं. आतां आपण स्नान करून मोतीचे कपडे टाकून देऊं. चांगले कपडे करूं; आजचा आपला मुंबईतला शेवटचा दिवस, म्हणून टेसांत असायचं; हवं तितकं हिंडायचं, लागेल तितकं खायचं असं मी ठरवूनच टाकलंय, उदयूंच्या ढेकरा देत देत; तसंच सिनेमालाही जावं, असं माझ्या मनानं घेतलं आहे. मुंबईत सिनेमाला जायचं म्हणजे, टिप्टॉप् असलं पाहिजे. आपल्या नेह-मींच्या पद्धतीनं गेलों, तर आपल्याला मवाली समजतील ना—"

नकटीच्या लग्नाप्रमाणें उत्सुकतेच्या कार्यालाही सत्राशें विघ्नें असतातच असें दत्तूला वाटलें.

कारण फत्तूच्या मताप्रमाणें सारा ऐटबाज पोषाख करून झाला पण आयत्या वेळीं दत्तूची टोपीच कुठें सांपडेना !

"तुझा आहे धेडगुजरी पोषाख, माझा आहे अस्सल इंग्रजी, तेव्हां मी उघड्या डोक्यानं बाहेर पडलों तरी चालेल; पण—'

"तेच तर. मी नाहीं बोडक्यानं येत—'

त्यावेळीं कॉमरेडी बोडकेपणा तितकासा—नव्हे, मुळींच—बोकाळला नसल्यानें बोडकें बाहेर हिंडणें दत्तूच्या जिवावर येत होतें.

आपल्या डोक्यावरचें संकट दुसऱ्याच्या डोक्यावर कसें ठेवावें, या विचारांत गढलेल्या इंग्रज मुत्सद्यांप्रमाणें उदास मुद्रा करून दत्तू आणि फत्तू संबंध दहा मिनिटें एकमेकांकडे पहात बसले होते.

उदयूंसारखा, कधींही न पाहिलेला, न चाखलेला पदार्थ, जिभेवर घोळवावयाला उतावळा झालेल्या दत्तूला तो काल दहा युगांसारखा वाटला.

"फत्तू,—"

"काय दत्तू?—"

"कांहीं तरी उपाय काढ, आणि काढ मला एकदांचा या संकटाच्या वेढ्यांतून बाहेर."

" उपाय होय ? " रोग्याच्या आजाराचें नक्की निदान न झालेल्या डॉक्टराप्रमाणें चांचरत फत्तूनें प्रश्न केला आणि तो ताबडतोब विचारांत गढून गेल्याप्रमाणें दाखवूं लागला.

दत्तूच्या मनामताप्रमाणें आणखीही दोन युगें अधिक गेलीं.

" आहे–खास उपाय आहे. " ' जमीन जमीन ' म्हणून ओरडणाऱ्या कोलंबसाबरोबरच्या खलाशाच्या आनंदानें दोन मिनिटांनंतर फत्तू म्हणाला.

" काय करायचं ? " दत्तूनें विचारलें.

" माझी फेझ् घाल ना तूं–" फत्तूनें उपाय सुचविला.

' ऑ !—" राधेच्या शोधांत असतांना, अकल्पितपणें प्रेमाचा लघळपणा करूं पाहणाऱ्या कुब्जेच्या मुखदर्शनानें व साश्चर्य भीतीनें जसा कृष्णाचा चेहरा उकलला गेला असता, तसा फेझ् घालण्याच्या सूचनेनें दत्तूचा मुखडा फुलून निघाला !

" मला तर हा एकच उपाय दिसतो आहे. दत्तोबा, तुझा नेहमीं आपला ज्यात त्यांत अडेलपणा असतो बघ. तुला उदयुं खायला घालावं, म्हणून मी शक्य ती खटपट केली; तुझ्या नशीबांत तें नाहीं; त्याला मी तरी काय करणार ? मी मात्र यापुढं फार वेळ उदयूंकरितां माझ्या पोटाला कष्ट देणार नाहीं. हा मी चाललों–येणार तर ये, नाहीं तर बैस बुरखाबिब्बीसारखा घरींच—" निर्वाणीची घोषणा करीत फत्तू बसल्या बैठकीवरून ताड्दिशीं उठला आणि आपली टोपी डोक्यावर ठेवून, खोलीच्या बाहेर पडला.

" फत्तू, अरे फत्तू, येतों मी–दे ती तुझी टोपी–" दत्तू अजीजीनें ओरडला.

डोक्याला नको तें काम करावयाला पोट भाग पाडतें !

विवाहांत विचित्रपणा करणारा नवरदेव आपल्या ' विजातीय ' नववधूला बरोबर घेऊन प्रथम बाहेर पडला असतां मनांतून त्याला तिची खरोखरीच ' लाज ' वाटत असली, तरी वरून जसा तो मोराचा दिमाख

दाखवीत असतो, तसा ‘ सलज्ज ’ दिमाखानें फेश घातलेला दत्तू मुंबईच्या रस्त्यांतून चालला होता.

+ + +

तेल्या रंगाच्या इसमानें परीटघडीचे कपडे घातल्यामुळें पूर्वीच्या हॉटेलवाल्याच्या ‘ पराक्रमानें ’ धुरकटलेलें तें ‘ नवें स्वच्छ उपाहारगृह ’ दिसत होतें.

दरवाजांतून आंत गेल्यावर, दत्तूफत्तूला एक मोठें दालन लागलें. त्याच्या तोंडाशींच एका उंचशा कठड्यांत एक अगडबंब कळकट गुजराथी बसलेला होता. त्याच्या तोंडावर मनगटाएवढ्या मिशा असल्या तरी नाकांतून खालीं उतरणारे केसांचे झुबके त्यांवर स्पष्ट दिसत असल्यानें, वॉलरस नावाच्या प्राण्याप्रमाणें त्याची मुखशोभा दिसत होती. डोक्याला चोपडलेलें तेल, मुंबईच्या घामाच्या संगतीनें मिशांवरच्या गालगेंदांवर एकसारखें गळत असल्यामुळें नुकतींच कढईतून काढलेलीं काळसर–लाल भजीं त्या गुजराथ्याच्या वरभोंका नाकाच्या सांडग्याच्या डाव्या उजव्या बाजूला चिकटवून बसविल्याचा भास होत होता. त्याच्या अंगांतील मुंडा सद्रा केव्हातरी फारां वर्षांमागें पांढरा असावा, असें सुरकुत्यांमधील पांढरट पट्यांमुळें वाटलें असतें. पूर्वजांची स्मृति एवढाच भाग जसा हल्लींच्या संस्थानिकांच्या आयुष्यांत मंगलमय असतो, त्याप्रमाणें त्या गुजराथ्याच्या झुबकेबाज भुंवयामधील तुकतुकीत गंधाचा टिकलाच तेवढा काय तो त्याच्या पूर्वजांच्या जातीची साक्ष देत होता. गळ्यांतील जानव्याची साक्ष अगदीं जवळ गेल्याखेरीज पटण्याजोगी नव्हती. कारण एक तर तें त्याच्या गळ्याखालील पोळीच्या वळ्यांत अर्धेमुर्धे गडप झालें होतें; आणि दुसरें असें कीं, तें त्याच्या वर्णाशीं व अंगाशीं एकरंग व एकजीव झालें होतें. तो मालक कठड्यापलीकडील घडवंचीवर चौसोपी मांडी घालून बसला असून मांड्यांच्या उगमापर्यंत त्यानें आपलें धोतर वर घेतलें होतें. धोतराची बांधणी बरीच सैल केली असल्यानें, तें आपल्या नेहमींच्या स्थानापासून बरेंच खालीं घसरलें होतें. त्यामुळें, धोतराच्या नसणीचा, त्याच्या पोटाच्या ढेऱ्याभोंवतालचा कळकट करकोचा मधून

मधून स्पष्ट दिसत होता. त्याचें पोट पृथ्वीगोलासारखें होतें असें म्हटलें, तर तो नेसणीचा करकोचा भूमध्यरेषेसारखा वाटत होता असें सांगितल्यावांचून गत्यंतर नाहीं.

दत्तू आणि फत्तू त्या ' स्वच्छ उपाहारगृहांत ' शिरले, तेव्हां तो गलेलठ्ठ मालक आपल्या गळ्याखालच्या व मानेवरच्या वळ्यांतून मळ्या काढून त्याच्या गोळ्या वळण्यांत अगदीं गुंग होऊन गेला होता. तो त्या कामांत इतका तल्लीन झाला होता, कीं जसा कांहीं एखादा अट्टल गांजेकस गांजाची गोळी मळण्यांतच निमग्न होऊन गेला होता.

स्वच्छ उपाहारगृहाच्या मालकाचा तो स्वच्छ अवतार व निर्मळ उद्योग पाहतांच दत्तूला मळमळूं लागलें. त्याच पावलीं परत फिरावें असें त्याच्या मनांत आलें. तितक्यांतच त्या दालनांत जिकडे तिकडे, खालीं वर, सगळीकडे उदयूंच्या भडकरंगीं जाहिराती त्याला दिसल्या. आधीं दत्तूच्या मनांत उदयूंबद्दल उत्सुकता उत्पन्न झाली होतीच. तिला त्या जाहिरातींनीं जोर चढला; आणि दत्तूनें त्या स्वच्छ उपाहारगृहाचा सर्व घाणेरडेपणा डोळ्यांआड करावयाचें ठरविलें.

\+ + +

हॉटेलच्या मालकासमोर लांबीनें पुरेपूर व रुंदीनं दालनाच्या एकतृतियांशाइतका लांकडी आडोशानें एक स्वतंत्र भाग पाडला होता. लांकडी आडोशाला मधून मधून तीन चार लांडेमुंडे दरवाजे दिसत असल्यामुळें, त्या स्वतंत्र विभागाचे अलग अलग पोट-भाग पाडून स्वतंत्र खोल्यांची व्यवस्था करण्यांत आली असावी असा तर्क करणें कांहीं अवघड नव्हतें. त्या विभागाच्या तोंडालाच एक ठळकशी पाटी लावली असून तीवर ' हा भाग फक्त हिंदूच्यासाठींच राखून ठेवला आहे. इतरांना तिकडे जाण्याची सख्त मनाई छे. ' असें गुजराथींत ठळठळीतपणें लिहिलेलें होतें.

ती पाटी फत्तूच्या आड राहिल्यामुळें असो कीं, उदयूंच्या भडक जाहिरातींनीं इच्छेला भडकविल्यामुळें असो, दत्तूचें तिच्याकडे मुळींच लक्ष गेलें नव्हतें. फत्तू प्रथम एका खोलींत शिरला.

दत्तू त्याच्या मागून त्या खोलींत शिरूं लागला.

कठड्यांत बसलेला हॉटेलचा मालक दत्तूकडे डोळे फाडून बघूं लागला.

" ए साहेब, तिकडे जाऊं नको. " गुजराथी मालकानें दत्तूला दटावलें.

आपल्यालाच ती दटावणी असेल, असें दत्तूच्या लक्षांतही आलें नाहीं. तेवढ्यात एका हॉटेलवाल्या पोऱ्याचें लक्ष मालकाच्या दटावणीकडे व दत्तूकडेही एकदमच गेलें. तो दत्तूच्या शेजारींच होता. झटकन् पुढें होऊन तो दत्तूला म्हणाला, " साहेब, त्या खोलींत तुम्हाला जातां यायचं नाहीं. "

पोऱ्याच्या म्हणण्याचा अर्थ लक्षांत न येऊन मिस्किलपणानें हंसून दत्तूनें उत्तर दिलें, " जातां यायचं नाहीं ? पैज मार, मी या खोलींत सहज जाऊन दाखवतों बघ. "

" तसं नव्हे, तिकडे जायला तुम्हांला मनाई आहे. " पोऱ्यानें गुरकावतच दत्तूला सांगितलें आणि पाटीकडे बोट केलें.

पाटी वाचून दत्तूनें आश्चर्यानें तोंडच वांसलें. परंतु थोडक्यांतच आश्चर्याला मनांतल्या मनांत दडपून टाकून, उर्मटपणानें त्यानें हॉटेलवाल्या पोऱ्याला म्हटलें, " अरे ज्या ! " डोक्यावरच्या टोपीला शोभून दिसण्याजोगा दत्तूचा उर्मटपणा होता.

फिरून दत्तू खोलींत शिरूं लागला.

पोऱ्या त्याला आडवा आला. त्याला जोरानें बाजूला हिसकून दत्तू खोलींत शिरला. धांदलीनें दत्तू जवळच्याच दुसऱ्या एका खोलींत घुसला होता.

" ए मवाली, बाहेर 'एन्गेजड' अशी पाटी दिसली नाहीं काय ? " अशी त्या खोलींतून गुजराथी गर्जना ऐकूं आली.

घाबरट मुद्रेनें दत्तू बाहेर आला. त्याला मवाली म्हणणारा गुजराथी समोरच्या टेबलावर गार पेयाचे दोन ग्लास तस्से भरलेले ठेवून, दुसरेंच कसलें तरी पीयूष पिण्यांत दंग झाला होता. मुसंडी मारून दत्तू खोलींत

घुसलेला दिसतांच तें पीयूपाचें भांडें दचकून त्या गुजराथ्यापासून बाजूला झालें, डाव्या हातानें घरंगळलेला पदर डोक्यावर आणि डाव्या खांद्यावर ओढला, आणि खालीं मान घालून तें लाजून बसलें. आपल्या तोंडचें पीयूषपात्र दूर करणाऱ्या दत्तूवर तो गुजराथी खेंकसला, तें साहजिकच नव्हतें काय?

खोलीच्या बाहेर दत्तू पडला, तों हॉटेलवाला गुजराथी मालकच त्याच्यापुढें उभा असलेला त्याला दिसला. तेवढ्यांतच, आंतला पीयूषवाला गुजराथीही तावातावानें बाहेर आला आणि मालकावर ओरडून म्हणाला, " ए साला, एन्गेजड रूममदि घुसून समदा घोटाला माजवला! फगत हिंदूच्यासाठीं हा भाग हाय ना? मग हा लाडा मवाली कसा इकड येऊ सकला? हें काय मॅनेजमेंट हाय का मवालीगिरी हाये?"

" मेहेरबान, मला माफ कराना" मालक पीयूषवाल्या गुजराथ्याला अजीजीनें म्हणाला. पीयूपाची तहान लागली असल्यानें अधिक बकबक न माजवितां तो गुजराथी पुनः आपल्या खोलींत शिरला.

" ए साहेब, अशी मवालीगिरी आमच्या हॉटेलांत नाहीं चालायची. या खोल्या फक्त हिंदूंच्यासाठीं आहेत त्यांत तुम्हांला जागा नाहीं मिळायची. तुम्हाला काय पाहिजे तें या बाहेरच्या बाजूला बसून मागा; सर्व कांहीं तुम्हाला मिळेल. हॉटेल तुमचंच आहे."

" मीही हिंदूच आहें; मी माझ्या दोस्ताकडे जाणारच" दत्तूनें संतापानें सांगितलें!

" तुम्ही कितीही बडबड केलीत, तरी तूं हिंदु नाहींस, अशी माझी खात्री आहे. बसायचं असलं तर मुकाट्यानं बाहेरच्या बाजूला बैस. नाहीं तर चालता हो."

" मी बाहेर बसणार नाहीं; मी हिंदु आहें, मीं खोलींत जाणारच." असें सांगून दत्तू खोलीकडे वळला. हॉटेलवाल्या पोरानें दंडाला धरून त्याला मागें खेंचला.

दत्तूनें त्या पोऱ्याच्या खाडकन् श्रीमुखांत भडकाविली!

खाण्यापिण्यांत गुंतलेलीं हॉटेलमधील सर्व तोंडें आपला तो उद्योग सोडून, दत्तूनें भडकावलेल्या थोबाडीच्या आवाजाबरोबर आरडाओरडा करण्याच्या कामाला एकमुखानें लागलीं.

"कोण म्हणतो मी मुसलमान आहें म्हणून?" दत्तूनें मालकाला खेंकसून विचारलें.

"समोरच्या आरशांत बघ." एका खाबूनें मधेंच तोंड घातलें,

दत्तूनें आरशाकडे पाहिलें, तेव्हां आपण एखाद्या मुसलमान गुंडाकडेच पहात आहोंत असा त्याला भास झाला.

डाव्या कानाकडे झुकलेल्या डोक्यावरच्या मुसलमानी टोपीनें तो घोंटाळा उडविला होता अशी त्याची तेव्हांच खात्री झाली. त्याबरोबरच त्याचें तोंड उर्मटपणावरून खालीं उतरूं लागलें!

"आहेस कीं नाहीं तू मुसलमान?" मालकानें विचारलें.

"मी नाहीं मुसलमान; आधींच त्या खोलींत जाऊन बसला आहे तो तुझा बाप मुसलमान आहे." दत्तूनें मालकाला ठांसून सांगितलें.

"साला तो तुझा बाप हिंदूच आहे. जंटलमन् काय आमाला ओळखत नाहीं कीं काय? मवाली तो मवाली आणि माझा बाप काढतो? ए पोऱ्या, या मवाल्याची गचांडी धरून याला हॉटेलच्या बाहेर ढकलून दे." हॉटेलच्या मालकानें हुकूम सोडला.

दोघां चौघां हॉटेलवाल्या पोऱ्यांनीं दत्तूला जवळ जवळ उचललाच.

"हकला, लाथा द्या चार त्या मवाल्याला." खादाडांनीं आपल्या निष्कारण हुकुमांचे फवारे हवेंत सोडले.

"सबूर, सबूर!" बाहेर येऊन फत्तू मोठ्यानें ओरडला.

सर्वांचें लक्ष त्याच्याकडे वळलें.

"मेहेरबान, माफ करा, तो इसम माझा दोस्त आहे." फत्तू हॉटेलवाल्याला म्हणाला, "त्याच्याकडून कांहीं आगळीक झाली असल्यास मी तुमचीं क्षमा मागतों.

नंतर दत्तूजवळ येऊन, त्याच्या खांद्यावर हात टाकून फत्तू म्हणाला, "कासीम, मी तुला सांगितलं नव्हतं बजावून, आमच्या

हिंदूंच्या खोलींत येऊं नको म्हणून? पण भलता हट्ट धरून नसती धूम तूं माजविलीस. काय म्हणावं तुला? अरे, आपली दोस्ती असली, तरी धर्माच्या बाबतींत असला दांडगेपणा केलेला आपल्याला अगदीं आवडत नाहीं बुवा. धर्माच्या बाबतींत तुम्ही मुसलमान तरी दोस्तीबिस्ती ओळखतां का? धर्म तो धर्म आणि दोस्त तो दोस्त! कासीम, जा त्या समोरच्या इराण्याच्या दुकानांत जा. तिथं चहा पुडिंग घे, तोंपर्यंत मी इथला परोठा आणि उदयुं संपवून येतों."

दत्तूनें पट्कन् आपल्या डोक्यावरची फेझ्-टोपी हिसकली, ती ताड्दिशीं फत्तूच्या तोंडावर मारली, आणि तो त्या हॉटेलांतून बाहेर पडला.

"साला मवाली तो मवाली"–दत्तूकडे पहात हॉटेलवाला म्हणाला.

"छे, तो मवाली नाहीं–" फत्तूनें त्याला आर्जवी आवाजानें सांगितलें.

"साला मुद्दाम हिंदूंत घुसायला बघतो—"

"तें एक त्याला वेड आहे, पण तो माझा दोस्त आहे—"

"कशाला साल्याची दोस्ती केली? तुमच्यासारखा अस्सल हिंदु जंटलमन मधें पडला, म्हणून आम्ही त्याला सोडला, नाहीं तर पोलीसाच्याच हवालीं केला असता."

"मी हिंदु आहें, ही तरी तुमची खात्री आहे ना?" हंसून फत्तूनें हॉटेलच्या मालकाला विचारलें.

"अरे साहेब, काय हें विचारतां? इंग्रजी पोषाख केला, म्हणून काय आम्हांला हिंदु माणूस ओळखत नाहीं कीं काय?"

"मग ठीक आहे–नाहीं तर—"

"छे छे!" हॉटेलच्या मालकाच्या सांगण्यांत खात्रीचा सूर खणखणत होता. हिंदूंच्या खास खोलींत बसून, गुजराथी पदार्थांवर यथेच्छ ताव मारून फत्तू त्या हॉटेलमधून बाहेर पडला.

\+ + +

त्या रात्रीं दहा वाजण्याच्या सुमारास, भीत भीत आणि दबकतच फत्तू वसतिगृहाच्या खोलींत आला.

त्याला पाहतांच, दत्तू अगदीं मनापासून आणि गडगडून हंसला; "खूप केलीस तूं माझी ! याचं नांव बनविणं !"

फत्तूच्या खात्या मनाला दत्तूच्या त्या शब्दांनीं कांहीं मोकळेपणा आला नाहीं.

दत्तूला आपल्या मित्राच्या मनाची ठेवण माहित असल्यानें, त्यानें विषयाला एकदम गभीर रूप दिलें आणि निराळ्या वळणाघोरणानें तो बोलूं लागला.

"फत्तू, आजच्या प्रकारानं मला एक गोष्ट चांगली शिकविली. उगीच आपण धर्म धर्म म्हणून नाचतों. अंगावरच्या कपड्यांत आणि मानलेल्या धर्मात काय फरक आहे रे ? मी तुझी टोपीच तेवढी क्षणभर-डोक्यावर ठेवली, तर त्या घाणेरड्या गुजराथ्यानं मला मुसलमान ठर-विला ! तुझं डोकं मोकळं सुंड होतं तेवढ्याच आधारावर तो बिनडोक्याचा मनुष्य तुझ्या माथ्यावर कायमची हिंदुधर्माची टोपी आहे असं बिन-धोकपणें मानायला तयार झाला ! फत्तूची फक्त टोपी घातल्यानं दत्तू कांहीं फत्तू होत नाहीं. कपडे बदलले म्हणून कपड्यांतला माणूसहि कांहीं बदलत नाहीं. तसंच धर्माचं आहे. त्या गुजराथ्यानं हजार माणसं बरोबर घेऊन जरी एकमुखानं 'तूं हिंदु आहेस' म्हणून दवंडी पिटवली, तरी तूं हिंदु असणं शक्य आहे का ? साराश काय, धर्म म्हणजे टोपी. हवी तेव्हा घालावी आणि वाटेल तेव्हां काढावी. त्या टोपीवर कांहीं माणुसकी अवलंबून नाहीं. पण होतं असं कीं, हिंदु आणि मुसलमान, दोघेही त्या मठ्ठ गुजराथ्याप्रमाणं, धर्माच्या टोपीलाच महत्त्व देतात; आणि माणसांना लाथा मारतात--फत्तू फत्तू, हें रे काय--"

फत्तूला केव्हांच गाढ झोंप लागली होती; आणि एखाद्या मोटा-रच्या विजेरी कर्ण्याप्रमाणें त्याचें ढाराढुरी घोरणें सुरू झालें होतें !

"या मठ्ठ फत्त्याचा उद्धार होणें कधींच शक्य नाहीं." असें पुटपुटत दत्तू आपला बिछाना साफसूफ करूं लागला. तेव्हां त्याच्याच उशीखालीं त्याची घडीची काळी टोपी त्याला सापडली.

उशीखालीं टोपी दिसतांच फत्तूच्या कारस्थानाची सारी कल्पना दत्तूला आली.

दत्तूनें फाड्दिशी आपली टोपी फत्तूच्या तोंडावर मारली.

"काय-काय-" अर्धवट जागा होऊन फत्तूनें चांचरत विचारलें.

"कुशीवर नीज! रावणासारखा उताणा पडून घोड्याच्या खिंकाळण्यासारखा घोरतो आहेस!! पोटभर खायला मिळालं नाहीं तर नाहीं, आतां नीटपणें शांत झोंप तरी घेऊं देशील कीं नाही?—"

"पोट-भरलं-नसेल-तर-उ-द-यूं-खा—"

पुन: फत्तू घोरूं लागला!

आपुलिया बळें नाहीं मी बोलत।
सखा कृपावंत वाचा त्याची॥
काय म्या पामरें बोलावीं उत्तरें।
परि त्या विश्वंभरें बोलविलें॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा।
वागवी पांगळा पायांविण॥

———

# - शेवटचें पान -

सात वर्षांपूर्वी माझ्या गोष्टींचा पहिला भाग प्रसिद्ध झाला. इच्छा असूनही दुसरा भाग आजवर प्रसिद्ध होऊं शकला नाहीं. कारणें समजण्यास सुलभ; विशेषतः लेखक म्हणविणाऱ्या सर्व प्राण्यांस सदोदित जाणविणारें-जाचणारें एकच कारण म्हणजे प्रकाशकाचा अभाव!

महाराष्ट्र-कुटुंब-मालेचे प्रकाशक रा. **विठ्ठलराव खाडिलकर** व संपादक, सुप्रसिद्ध लेखक रा. **नारायणराव कुलकर्णी** यांनीं पुरस्कार केल्यामुळेंच आज हा दुसरा भाग प्रिय वाचकांच्या सेवेला सादर करण्याचें सद्भाग्य मला लाभत आहे. योग्यसें संपादन करून शक्य तितक्या उत्कृष्ट स्वरूपांत हा भाग प्रसिद्ध करण्याचें मित्रकार्य केल्याबद्दल रा. खाडिलकर रा. कुलकर्णी याचा मी अत्यंत आभारी आहे.

मजवर बंधुवत् प्रेम करून, अक्षय्य माझ्या पाठीशीं असणारे, प्रसंगीं सहाय्यास धांवणारे माझे मित्रोत्तम रा. **शंकर कृष्ण** ऊर्फ **बाबूराव देवभक्त** यांनीं सदर भागाचा प्रस्ताव केला आहे; त्याबद्दल त्याचे आभार मानण्याच्या उपचाराच्या भरीस पडून, त्यांच्या मजवरच्या अकृत्रिम, म्हणून निरपेक्ष, प्रेमाला व्यवहारी उणेपणा आणण्याचे पातक मी कां करावें?

पहिल्या भागांतील गोष्टींवर बरें वाईट लिहिणाऱ्या सर्व परीक्षकांचा मी आभारी आहें. त्यांपैकीं कांहींना इतकीच नम्र विनंति कीं, लेखकाकडे पाहून व लेखनाकडे मुळींच न पाहून याही भागावर अभिप्राय देण्याची करामत त्यांनीं करूं नये. सात वर्षांच्या काळांत त्याची ती मासलेवाईक खोड मोडली असेल, असा मला भरंवसा आहे.

गोष्टी लिहिण्याकडे आताशा माझा तितकासा ओढा नसतांही वर्षाकांठीं दोन-तीन गोष्टी तरी लिहावयास मला उद्युक्त करणाऱ्या माझ्या दोन संपादक मित्रांचा मी ऋणाईत आहें.

या संग्रहांतील गोष्टी वाचकांना रंजविण्यास थोड्या फार समर्थ होतील तर मला लिहिण्याचें थोडेसें सार्थक झाल्यासारखें वाटेल.

सांगली
ता. ४ मार्च १९३९

सर्वांचा नम्र सेवक
**सरस्वतीकुमार.**